ॐ तत्सत् ।

वैदिक संस्कृति माला पुष्प २ रें.

वैदिक संस्कृतीची

# पुनर्घटना.

भावी वैदिक संस्कृतीचे द्रष्टे



ब्रह्मर्षि श्रीअण्णासाहेब पटवर्धन.

मूल्य २ रु. ]

[ ले. अप्रबुद्ध.

# अनुक्रमणिका.



" When he returned to India, he felt anew too forcibly the beauty and the living verity of the mythological forms of the people to sacrifice them to any preconceived idea of a radical signification for which he had been perhaps disposed in America under the direct pressure of the Western spirit. The problem thenceforward was *how to harmonise everything without renouncing anything.* " ( इटालिक्स आमचें आहेत. ) **Vivekananda by R.R.** *page. 96*

# शुद्धिपत्र.



[ विराम चिन्हें व शब्दांची यथायोग्य जुळणी व फाळणी यांच्या बाबतींत निरूपायास्तव केवळ वाचकांच्या औदार्याची याचना करणेंच भाग आहे ! ]

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शु |
|---|---|---|---|
| १६ | १३ | स्कृतीचें | संस्कृतीचें |
| ४८ | २३ | सर्वेषांतु | सर्वेषांतु स |
| ५७ | २५ | लागलीच | लागलीच असावें |
| ६२ | २६ | चारक | चारच |
| ६५ | १० | मूत्र | सूत्र |
| ६६ | २४ | स्थाणुस्यं | स्थाणुरयं |
| ६८ | २३ | मुख्य | मुख्य |
| ९० | २७ | remmerated | remunera ted |
| ९५ | २६ | वर्ड्स्वर्थसारख्या | तर वर्ड्स्वर्थसारख्या |
| १०९ | १ | पोकळ | कोमळ |
| १११ | कंसांतील मराठी उतारा १३ व्या ओळींत world पुढें पाहिजे. | | |
| १२० | २० | निःशास्त्रीकरण | निःशस्त्रीकरण |
| १३९ | १५ | यशोवर्धन् | यशोधर्मन् |
| १४७ | २७ | नदूषण मदुग्रस्य | नदूषणमदुग्रस्य |
| १६८ | १७ | त्रैदिकसंस्कृति | वैदिकसंस्कृति |
| १८० | १९ | निष्ठा तुका कृष्ण | निष्ठा तु का कृष्ण |
| १८३ | २० | अदित्य | आदित्य |
| २०६ | ७ | होऊन सुमंघटित | होऊन स्वतःस सुसंघटित |
| २१९ | २७ | यशाशास्त्र | यथाशास्त्र |

## शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २२० | २७ | ज्या ‘ आबादी ’ | ज्यांना ‘ आबादी ’ |
| २३१ | २ | ‘ चातुर्वर्ण्य मया सृटं ’ | ‘ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं ’ |
| २३१ | २३ | अपार्थित | अपार्थिव |
| २३२ | ८ | स्यांत | त्यांत |
| २४५ | २६ | सृतींत | श्रुतींत |
| २४९ | १ | सह्रोहर | सहोदर |
| २५२ | १४ | सव | सर्व |
| | प्रस्तावना | शके १८५३ | शके १८५२ |



# प्रस्तावना.



देवाच्या इच्छेप्रमाणें हा ग्रंथ आषाढमासीं पुरा होऊन त्याच्याच कृपेनें आज लोकांपुढें येत आहे. एवढ्यानें ह्मणजे काम होईल असें मुळींच नाहीं. वैदिक संस्कृतीचें संपूर्ण स्वरूप दाखविण्यास आणि तिच्यासंबंधीं सध्यां उपस्थित होणाऱ्या सर्व प्रश्नांच्या समाधानाची दिशा ठरविण्यास असे कैक ग्रंथ लिहावे लागतील. तें काम करण्यास खऱ्या अधिकारी माणसांनींच पुढें आलें पाहिजे. तसें होईपर्यंत यथाशक्त्या आपलें कर्तव्य करण्यास वाव सांपडावा ह्मणून ही माला गुंफण्याची कल्पना काढण्यांत आली आहे. ब्रम्हर्षि श्रीअण्णासाहेब पटवर्धन यांचें चरित्र हें या " **वैदिक संस्कृतिमालें**"तील पहिलें पुस्तक समजलें जावें.

हल्लींच्या काळच्या कार्यकर्त्यांचें एकंदर धोरण, समाजस्थितीचा ओघ, विचारवंतांच्या ठरलेल्या समजुती व लोकांची अभिरुचि यांना सांभाळण्याच्या ऐवजीं, कमीअधिक प्रमाणानें, त्यांच्यावर शस्त्र धरण्याकरितांच पुस्तक लिहिल असल्यामुळें, तें अनेक मतांच्या लोकांस अनेक कारणांनीं अप्रिय होण्याचाच जास्त संभव आहे, हें मी जाणून आहे. परंतु त्याला उपाय काय ? ' I shall not leave uuless bodily removed ' ' उचलून टाकल्याखेरीज जागचा हालणार नाहीं, ' या तयारीनें उभे राहणाऱ्यांनें डोक्यावर काय पडणार, याचा विचार न करणेंच बरें.

' आईपेक्षां दाई जास्त, ' या ह्मणीप्रमाणें हा ग्रंथ लोकांपुढें मांडण्याचें खरें श्रेय माझे सर्वतोपरि आदरणीय स्नेही, भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस या पुस्तकाचे कर्ते येथील मराठी हायस्कुलांतील लोकप्रिय शिक्षक श्रीयुत नरहर रामचंद्र परांजपे यांनाच आहे. मी तर त्यांचा ऋणी आहेच, परंतु या पुस्तकापासून जर महाराष्ट्रास थोडाबहुत फायदा झाला, तर त्याकरितां त्यानेंही रा. नरूभाऊंचे आभार मानले पाहिजेत. त्याचप्रमाणें माझे स्नेही रा. बाबासाहेब नावलेकर, वकील, पांढरकवडा, रा. कृष्णराव पांडे, मास्तर, न्यू हायस्कूल उमरावती, रा. लक्ष्मणराव गर्दे, हेडमास्तर, प्रायव्हेट स्कूल बुलढाणा, रा. नीळकंठ गणेश गर्दे, पुणें, इत्यादिकांनीं जी सक्रिय सहानुभूति दाखविली, व जें प्रोत्साहन दिलें, त्याबद्दल मी त्यांचा सदैव आभारी आहे.

'सोमेश्वर प्रेस' च्या मंडळींचें अभिनंदन करणें, हें तर माझें कर्तव्यच आहे. 'नाकपुडींत हरिकीर्तन' ह्मणतात, त्याप्रमाणें, लहानसा कारखाना, त्यांतच 'भोळा शेतकरी' या मासिकाचें काम अंगावर घेतलेलें, आणि वेळ अगदींच थोडा, असें असतांना ग्रंथ छापण्याची जबाबदारी अंगावर घेऊन, केवळ व्यापारी दृष्टि न ठेवतां, घरोब्याच्या जिव्हाळ्यानें परिश्रम करून, ठराविक मुदतींत ती इतक्या संतोषकारक रीतीनें पार पाडल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केल्यावांचून राहवत नाहीं. 'वैदिक संस्कृति' मालेंतील पहिलें पुष्प श्रीअण्णासाहेब यांचें चरित्र अतिशय अशुद्ध रीतीनें छापलें गेलें आहे. मालेचें दुसरेंच पुष्प सर्वांगसुंदर झाल्यास, न जाणो, तिला दृष्ट लागेल अशा भीतीनेंच कीं काय, हा ग्रंथही त्या दोषापासून अलिप्त राहिला नाहीं. परंतु, त्याचा सर्व दोष माझ्याकडे आहे. 'सोमेश्वर प्रेस'च्या मंडळींनीं तें सर्वांग सुंदर करण्याची जी कळकळ दाखविली तिच्यावद्दल मी त्यांचे पुन्हां एकदां आभार मानतों. कांहीं ना कांहीं कारणानें अशुद्धतेचा दोष, व क्वचित् कोठें चमत्कारिक वाक्यरचना हीं या ग्रंथांत, आणि विशेषतः त्याच्या पहिल्या अर्धांत जास्त आढळून येतील. मात्र इतकेंच कीं, जेथें केवळ अर्थविपर्यास होतो, अशी स्थळें फार थोडीं आहेत, व त्यांचें शुद्धिपत्र ग्रंथास प्रारंभीं जोडलें आहे. इतर सर्वत्र संदर्भानें शुद्धाशुद्धता सहज समजून येईल. त्याचप्रमाणें विशेषनामें व कांहीं महत्वाचे शद्ब जाड टाइपांत घालण्यासंबंधींही एक धोरण सांभाळलें न गेल्यामुळें कांहीं घोंटाळा झालेला आढळून येईल. तरी, वाचतांना या गोष्टी लक्षांत ठेवूनच वाचावें, अशी वाचकांस विनंति आहे.

ग्रंथांत आह्मी स्पष्टपणें ठिकठिकाणीं ह्मटलेंच आहे तरी पण येथें एकदा पुनः सांगून ठेवणें योग्य वाटतें कीं, प्रतिपादनाकरितां ग्रंथांत ठिकठिकाणीं वर्तमान व भूतकालीन मोठमोठाल्या थोर व्यक्तींवर प्रसंगानुसार निर्भीडपणानें उघड उघड टीका करावी लागली आहे. ती केवळ त्या विषयापुरतीच आहे. तिच्यामुळें त्या व्यक्तींच्या थोरपणास कमीपणा आणण्याचा अगर त्यांचा अनादर करण्याचा यत्किंचितही हेतु नाहीं. भार्गव गुरूंच्या चरणीं भीष्मांनीं वाहिलेल्या पहिल्या बाणाप्रमाणेंच या टीकेकडे ते सकौतुक पाहतील अशी आशा आहे.

सरतेशेवटीं, यथाशक्त्या घडलेली ही वाङ्मयसेवा. त्या देवाधिदेवास अर्पण करून, माझ्या बोबड्या वाणीनें काढतां येतील तशा बोलांनीं, श्रुतिमातेनें शिकविल्याप्रमाणें त्याची प्रार्थना करून, त्याचे चरणीं विराम करतों.

* उत वा यो नो मर्चयात् अनागसः
अरातीवा मर्तः सानुको वृकः ॥
बृहस्पते अप तं वर्तया पथः
सुगं नो अस्यै देववीतये कृधि ॥

(मं २; सू. २३. ऋ ७.)

॥ शांतिः शांतिः शांतिः ॥

उमरावती.
माघ शु॥ पौर्णिमा
सोमवार. १८५३

'अप्रबुद्ध.'

---

* अथवा आमच्याशीं वैर धरणारा आणि गर्वानें ताठून जाऊन अपहार करणारा, असा जो जो मनुष्य, आह्मी जे तुझे निरपराधी भक्त, त्यांना पेचांत आणूं पाहील, त्याला हे वाक्पते, तूं आमच्या वाटेंतून कायमचा उखडून टाक, आणि देवसेवा आमच्या हातून व्हावी, ह्मणून आमचा मार्ग सुगम कर.

# विस्तृत अनुक्रमणिका.

## १ विषयप्रवेश.



## २ अधिकार.



## चातुर्वर्ण्य व वेदमार्ग.

## ४ चातुर्वर्ण्य व वेदमार्ग ( पुढें चालू. )

## ५ व्यक्तीधर्म.

वसुंधरा वगैरे उदाहरणांचें कारण—मोहाची व्याख्या—श्रीअण्णासाहेब यांची एक सूचना—सामर्थ्य अखंड टिकविलें पाहिजे—महात्माजींचें उदाहरण—ज्यू लोक व प्रस्तुतचे ब्राह्मण—सारखाच प्रसंग—एका ज्यू लेखिकेचें मार्मिक अवलोकन—मुख्य जबाबदारी ब्राह्मणांवर आहे. पृ० १७८—१९९.

## ६ ब्राह्मणांचें कर्तव्य.

द्वेषाचे पोटांत श्रेष्ठत्वाची जाणीव—श्रेष्ठत्व खपतें; त्याची जाणीव करून देणें खपत नाहीं—ब्राह्मण ज्येष्ठ आहेत, श्रेष्ठ नव्हे—अध्यात्मशास्त्रांतील निरहंकारीपणाची किल्ली—थोर पहाणें; साधें रहाणें—मान आपोआप मिळतो—प्रेमानें भेद विसरणें—ब्राह्मणांवरील दुर्धर प्रसंग—निराशेनें प्रयत्नदुर्बलता येते—मिथ्याचार टाकणें हाच तेजस्वितेचा उपाय—भिक्षुकवर्गाच्या ऱ्हासाचें कारण दारिद्र्य—दारिद्र्याचा गुण व दोष—भिक्षुकवर्ग हा हुजुरपागेसारखा आहे—त्याची पुनः रचना झाली पाहिजे—तेवढ्याकरितां स्वयंसेवकांची गरज. पृ० २००—२१२.

## ७ उपसंहार.

चार प्रकारचे चळवळे व त्यांचा चौरंगी सामना—वर्णाश्रमांच्या अभिमान्यांचें कर्तव्य—I shall not remove unless bodily removed! मागील विवेचनाचा सारांश—संस्कृतीच्या दोन अवस्था-संशोधनाचे नियम, त्यांना धरून वेगळे वेगळे हवे-संशोधनाच्या अनेक दृष्टी नकोत—तत्व समन्वय करा—मागील प्रतिपादनाचा सारांश—नवीन स्मृतीची ओरड—स्मृति ह्मणजे निव्वळ कायदा नव्हे—Hands off!—धर्म सांप्रदायांची वर्तुळ परिषद—रा. नरुभाऊंचें निरपेक्ष साह्य—परमेश्वरास प्रार्थना. पृ० २१३–२२२.

## परिशिष्ट १.

परिशिष्टाची आवश्यकता—वर्णशद्ब जातिबोधक कसा झाला–वर्ण ह्मणजे चातुर्वर्ण्य विशिष्टच जात—सृष्टं, गुण, कर्म आणि वर्ण या शद्बांचें महत्व—'चातुर्वर्ण्य' या श्लोकाचा मागला पुढला संदर्भ–'ममवर्त्मानुवर्तंते०' व 'क्षिप्रं हि मानुषे लोके०' यांचें तात्पर्य—'तस्य कर्तारमपि मां विध्यकर्तारमव्ययम्'—मनुष्यलोकांतच चातुर्वर्ण्य कां- -टिळकांस संबंध लागला नाहीं—प्रत्येक अवतारांत देव चातु-

## परिशिष्ट २.



## परिशिष्ट ३.







॥ श्री ॥



धर्मकार्यार्थ सदैव उद्यत असणारा परमात्माच वाजवूं लागला तर, फुटकें मडकें देखील खणूखणू वाजूं लागेल. मग, मजसारख्या मूर्खाच्या तोंडून सुभाषित बाहेर यावें, यांत नवल तें काय आहे? त्या श्रीगुरु--रूपाचें चरणीं एवढेंच मागणें आहे कीं:—

परं त्वदीयेन कृपालवेन
कृता मया वाक्पटुता यथैषा ।
तथैव पादांबुजयोर्विलीना
भक्तिं दृढां मे त्वयि संतनोतु ॥

आर्याणामपि सर्वेषां द्रुतं योगेश्वर प्रभो ।
संहृत्याशेषदारिद्र्यं यत्कल्याणं प्रयच्छ तत् ॥

उमरावती.
आषाढ शु॥ ८,
सोमवार, शके १८५२.

'अप्रबुद्ध.'

# वैदिक संस्कृतीची
# पुनर्घटना.



## विषय प्रवेश.



आजकाल जिकडे पहावें तिकडे एकच धूम माजलेली दिसते. विचार करावयाचें सामर्थ्य ह्मणून ज्या कोणा मेंदूंत आहे, तो प्रत्येक मेंदु आपल्या परीनें कांहीं तरी मोठ्या अडचणींत सांपडून धडपडत असल्या सारखा दिसत आहे. मानवी जीवनाशीं प्रत्यक्ष संबंध असलेल्या व नसलेल्या अशा लक्षावधि विचारांच्या गर्दींत बहुतक प्रत्येक जण अगदीं अचानक पणानें सांपडला असून, भाऊसाहेब पेशव्याप्रमाणें त्या गर्दींतच मरून जावें, कां मल्हार होळकराप्रमाणें त्यांतून कसा बसा रस्ता कांपावा, हा प्रश्न प्रत्येकापुढें उभा आहे. कंपनी सरकारनें हिंदुस्थान पादाक्रांत केल्यानंतर सुरू झालेल्या झगड्यांत आर्य संस्कृतीचें काय होणार याचा कोणासच निर्णय होईना. जुन्या लोकांना असें वाटलें, कीं चार दिवसांची गोष्ट आहे. तुमती मान खालीं करून कांहीं काळ स्वस्थ राहिलों तर ही लाट वरून सहज निघून जाईल व आर्य संस्कृति पुनः सरळ उभी राहील. जवळ जवळ १२५ वर्षें होत आलीं, परंतु पाश्चात्य संस्कृतीची लाट कांहीं ओसरत नाहीं, व आर्य संस्कृति ही अत्यंत जर्जर झाली असली तरी, मरून न जातां जीव धरून आहे. यांचें आतां काय होणार हा प्रश्न आहे.

जुन्या लोकांना वाटलें तों, पाश्चात्य संस्कृति हें एक वारेंच नसल्यामुळें लवकरच तिनें आपले काम करण्यास सुरवात केली, व त्यामुळें हिंदु समाजांत एक नवीच हिंदु मानवजाति उत्पन्न झाली. जी गोष्ट जपानमध्यें झाली, अथवा चीन-मध्यें घडेलसें वाटत आहे, तीच गोष्ट हिंदुस्थानांत घडून आली. दूर दृष्टीनें मेकॉलेनें ह्मटल्या प्रमाणें इंग्रेजी शिक्षणानें खरोखरच हिंदु हाडामासांत परकी अंतःकरणें उत्पन्न केलीं. या बांडगुळी अंतःकरणांत स्वतःचें असें कांहींच तत्त्व नसल्यानें अर्थीतच

त्यांना पाश्चात्य संस्कृति ही आर्य संस्कृतीपेक्षां सर्व प्रकारें श्रेष्ठ व श्रेयस्कर वाटते. तिच्या वांचून हिंदुस्थानची उन्नति होणें शक्यच नव्हे. हिंदुस्थानच्या कल्याणाकरितां ईश्वराकडून आलेला हा दिव्य संदेशच आहे, अशा दृढ श्रद्धेनें ते अगदीं पाश्चात्यांचे पाऊलांवर पाऊल टाकून जात आहेत, व त्यामुळें आतां कुठें आमचें जीवन थोडें बहुत सुधारून आह्मी उन्नतीच्या मार्गास लागलों आहों, असे त्यांचे उद्गार निघतात.

सत्ता, संपत्ति आणि सरस्वती या सुंदर देवतात्रयीच्या कुटिल कटाक्षानें उन्मत्त बनलेल्या पाश्चात्यांला, इतर सर्व जग अधःपातांत गढलेलें असून पाश्चात्यांच्या प्रयत्नानेंच हळू हळू वर येत आहे असें वाटावें, हें साहजिकच आहे. परंतु आमच्या इकडील त्यांच्या ' मानस पुत्रांना ' असें वाटत नाहीं, कीं पाश्चात्य शिक्षणानें आमच्या जीवनक्रमांत ही जी उच्चता आली आहे, तिच्यामुळें मनुष्य प्राणी या नात्यानें आमची किंमत वाढत आहे कीं कमी होत आहे? उच्च प्रतीच्या जीवनक्रमा-वांचून उच्च प्रतीच्या संस्कृतीचें अस्तित्व संभवत नाहीं हें खरें आहे. तशा प्रकारचा उच्च जीवनक्रम व उच्च संस्कृति यांची रचना हजारों वर्षांपूर्वी या राष्ट्रांत घडून आलीही होती. अगदीं परवां परवां पर्यंत आचार विचारांत सभ्यता, उदात्तपणा आणि सुखोपभोग यांचें प्रमाण, तिला धरूनच असत. आजच्या जीवनक्रमांतील ' उच्चता ' ह्मणून जी वाटते ती वस्तुतः उच्चता नसून, एका आधिभौतिक संस्कृतीच्या प्रकाशानें दिपून गेल्यामुळें सभ्यता, स्वच्छता, सुखसोयी इत्यादिकांत झालेला नकली फरक आहे. अल्लाउद्दीनाच्या गोष्टीप्रमाणें जुना दिवा देऊन विकत घेतलेला नवा दिवा आहे. याचें प्रत्यंतर पोषाखासारख्या बारीक गोष्टीपासून दिसून येतें. येथील हवा पाणी यांचें मान पहातां, खादीची बंडी व पंचा हाच पोषाख युरोपियन तऱ्हेच्या सरोदी पोषाखापेक्षां आरोग्यदृष्ट्या सर्वथैव हितावह कसा आहे, हें अलीकडे पुष्कळांच्या लक्षांत आलें आहे.

जन्मापासून केवळ पाश्चात्य शिक्षणांतच वाढल्यामुळें या ' मानस पुत्रांची ' स्थिति अशीच बनून जाते कीं, युरोपियन लोकांच्या आधाराशिवाय कोणतीही गोष्ट त्यांना पटतच नाहीं, सुचत नाहीं, मग करणें तर लांबच राहिलें. त्यामुळें त्यांच्याद्वारें घडून येणाऱ्या सर्व गोष्टी केवळ पाश्चात्यांचे प्रतिध्वनीच असतात. हिंदु आचार विचार हे नुकतेच रानटीपणा टाकून सुधारलेले आहेत, असें त्यांनीं ह्मटल ना, झालीच यांची ओरड सुरू. मग त्यामुळें आर्थिक दृष्ट्या राष्ट्राचें कितीही

कां नुकसान होईना !

घराला आग लागली ह्मटलें, तर ' थांबा, अशा वेळीं काय करावें तें पहातों. पाणी घालणें चांगलें कीं काय, या विषयीं युरोपीय पंडीतांचें कुठें मत आहे कीं काय पहातों, असें ह्मणणारे हे उन्नत मनुष्यप्राणी आपल्या तुताऱ्यांतून पाश्चात्यांच्या स्वैरालापांचे ध्वनी काढूं लागले, व स्वतःची निंदा करणारें पांडित्य निर्लज्जपणानें प्रतिपादून त्यावर शुद्ध बुद्धीचा मुलामा चढवूं लागले. प्राश्चात्यांना आमचें ' चातुर्वर्ण्य ' ह्मणजे ब्राह्मण वर्गाच्या सर्व प्रकारच्या चढेलपणाचें प्रदर्शक असें एक राष्ट्रैक्य संहारक यंत्र वाटतें ना ? बस्स, झाली यांची कोल्हेकुई सुरुं ! भारतवर्षाच्या हजारों वर्षांच्या अप्रतिहत सार्वभौम वैभवाच्या आड कधींही न आलेलें चातुर्वर्ण्य प्रस्तुतच्या पारतंत्र्याचें जबाबदार ठरलें. पारतंत्र्यांत खितपत पडलेले इतर सावर्ण्य समाज विचारांत घेण्याची त्यांना आवश्यकताच वाटत नाहीं. आर्यस्त्रियांची रानटी स्थिति पाहून एकादा साहेब कळवळतो ना ? बस्स ठरलें, स्त्रीस्वातंत्र्या खेरीज तरणोपाय नाहीं! जणुं काय प्रत्येक स्त्रीला प्रेम—पत्रें लिहितां येऊं लागलीं, व प्रत्येक विधवेला वाटेल तेव्हां नवरा मिळूं लागला, कीं इंग्लंडच्या फौजा मुकाट्यानें उठून जाणार ! साहेब ह्मणतो हिंदु स्त्रिया अडाणी आहेत. चला, करा कॉंग्रेस मध्यें ठराव. प्रत्येक स्त्रीला सुशिक्षित होऊं द्या, कीं दुसऱ्या तारखेला स्वराज्य ! सारांश लाट अशी उठली, कीं सत्यविजयाच्या कांडीसरसें नाचणाऱ्या भुतासारखी आमच्यांतल्या कर्त्या ह्मणविणाऱ्या धुरीणांची पिढी प्राश्चात्यांच्या बोटांवर ' ऊठ बैस ' ' ऊठ बैस ' अशी नाचूं लागली! त्यामुळें सर्व हिंदु समाज आंदोळून गेला. काशीची कळा केव्हांच गेली. मथुरेचीही मशीद झाली. सर्वत्रांची एकजात सुनत—( खरें ह्मटलें तर बाप्तिस्मा ! ) होते कीं काय ? असा पुनः प्रसंग आला. परंतु दुर्दैवानें तेवढी मात्र भीति राहिली नाहीं. दुर्दैवानें ह्मणावयाचें कारण येवढेंच कीं, सृष्टिक्रमाप्रमाणें अशा भीतिबरोबर श्री शिवाजी महाराजांसारखे शककर्ते आणि भूषण कवीसारखे सरस्वतीभूषण निर्माण होण्याची सुदैवी आशा असते. असो श्री शिवाजी महाराज होण्याची आशा नाहीं, पण निदान त्या हिमप्रळयांत पूर्ण बुडून मरण्याची, अथवा आमच्या प्राचीन पूर्वजांप्रमाणें स्थार्थत्याग करून पळून जाण्याची, पाळी येते कीं काय, अशी भीति वाटत होती, ती तरी दूर झाली, हें तरी सुदैवच समजलें पाहिजे.

हें सुदैव वाट्यास येण्याचें कारणही तसेंच झालें. तरवार हा मुसल-

मानांचा मुत्सद्दीपणा होता, तर मुत्सद्दीपणा ही इंग्लीश लोकांची तरवार आहे. देशांतील साधारण प्रत्येक मनुष्य एक वेळ तरवार बहादुर होणें शक्य आहे. पण देशांतील प्रत्येक मनुष्य कांहीं मुत्सद्दी असूं शकत नाहीं. त्याच प्रमाणें त्याचे मार्गही वेगवेगळेच पडतात. तरवार तुटून पडून रस्ता काढते, तर मुत्सद्दीपणा सर्व गोष्टी अंगावर घेऊन हळूं हळूं त्यांचा अडथळा नाहींसा करतो. अशा स्थिती-मुळें आर्यसंस्कृतीवरील. या मुत्सद्दी * हल्यांत सर्वच प्राश्चात्यांना एकजात भाग घेतां येईना व साथ करितां येईना. हळूं हळूं मुत्सद्दीपणा, दुरभिमान, बुद्धीची अप्रगल्भता इत्यादि अनेक कारणांनीं घडलेल्या वस्तुविपर्यासाला आळा पडून आर्य संस्कृतींतील कित्येक उत्कृष्ट चिजा प्राश्चात्य सरस्वतीच्या रंगणांत चमकूं

( *Italics are our own* )

* A political motive has worked strongly at the back of hostile critisism, both in this class of literature and the press. The motive is to show that notwithstanding claims and appriciations to the contrary, India is unqualified for the political advancement which rightly or wrongly She seeks. It is obvious that, if it can be established, that India on this and other account is not civilized but barbarous, that is an argument against Her capacity for political autonomy...... *It is necessary in particular to deny the alleged Spiritual character of Indian civilization. It would never do to admit this. For Spirituality is honoured of all men and where it exists, there are other excellences.*

**Justice Woodroff.**

"अशा प्रकारच्या वाङ्मयांतून व वर्तमानपत्रांतून वगैरे जी द्वेषमूलक टीका येत असते, तिच्या मुळाशीं वस्तुतः राजकारणाचा डाव असतो. तो असा कीं हिंदुस्थान हें इतर किती ही रीतीनें जरी योग्य व श्रेष्ठ भासत असलें, तरी स्वराज्य मिळविण्यास तें अपात्र आहे असें दाखविणें. अयोग्य असो अथवा योग्य असो, स्वराज्य मिळविण्याची हिंमत त्यानें धरली आहे. अशा वेळीं जर या किंवा त्या रीतीनें, तें सुधारलेलें नसून अर्धवट स्थितींत आहे असें दाखवितां आलें, तर त्यास स्वराज्य देणें हें वेडेपणाचें आहे असें सहजच ठरेल ......... त्यांत त्याच्या आध्यात्मिक

लागल्या. इतकेंच नव्हे तर अप्रतिम व सर्वोत्कृष्टही ठरूं लागल्या. कित्येक त्यांनीं दिपून गेले. कित्येकांना त्यांनीं वेड लाविलें. झालें. लागलेंच मनु फिरला. आर्य संस्कृतीच्या नांवानें होणारा शिमगा थांबून प्राश्चात्य डोंबाऱ्यांचे हे हंडीबाग पुनः आर्यप्रणालिकांचा डंका बोलूं लागले! शोपेनहॉरनें आपल्या आध्यात्मिक उन्नतीचें व आत्मशांतीचें रहस्य उकलून दाखवितांच, नादान ठरलेलीं उपनिषदें शहाणपणाचे बोल बोलूं लागली. मॅक्समुल्लर, डॉयसेन वगैरेंनीं वेदांताची स्तुति गाईल्याबरोबर, बदसूर होऊन कोपऱ्यांत पडलेली वेदांतांची वीणा पुनः सुरांत वाजूं लागली. मेटनिकोव्हनें तारीफ करितांच भोजनांत ताकाला पुनः किंमत आली. अशाच इतर पंडितांच्या अनुभवांनीं प्राणायामाला महत्व आलें. बंगाली चितार्‍यांच्या कुंचल्या शुद्ध देशी तऱ्हेचीं चित्रें रंगवूं लागल्या.

याच सुमारास जुन्याचा अभिमान असलेले लोकही जागे होऊं लागले. पाश्चात्य संस्कृति हें एक वारें नसून भारत वर्षांत ठाणें दिलेला जबरदस्त समंध आहे, असें लक्ष्यांत येतांच या समंधास कसें गाडतां येईल याची चिंता सुरूं झाली व त्याला हकलून लावण्याचे यत्न सुरूं झाले. प्रतिकाराची एकच थोरली लाट उठली. बुटांत सोंवळें खुपसणारे लोक भस्माचे पट्टे ओढून अर्घ्यप्रदान करूं लागले. पिंडदानावरून आईच्या नवऱ्यांची चौकशी करणारे बृहस्पति पायांत चाळ बांधून नाचूं लागले, व वेड्या वांकडया सुरांत सद्गुरूच्या आरत्या करूं लागले. विवेकानंद रामतीर्थाचा जयजयकार होऊं लागला. पाश्चात्य संस्कृतीचें सुंदर दोषाविष्करण होऊन ' पुराणमित्येवहि साधुसर्वं ' असा एकच घोष चालला. राष्ट्रीय शिक्षणाचीं *बंडें निघालीं. धार्मिक संस्था निघाल्या, जीर्णोद्धारक वाङ्मय उत्पन्न होऊं लागलें

---

उन्नतीविषयीं व वैदिक संस्कृतीच्या आध्यात्मिकतेविषयीं तर जरूरच वाद केला पाहिजे, कारण जेथें कोठें आध्यात्मिक श्रेष्ठता दिसून येते, तेथें सर्वकालीं सर्व मनुष्य जातीचा आदर दिसून येतो. म्हणून कांहीं झालें तरी या दोन गोष्टी अज्जीबाद नाकबूल केल्या पाहिजेत.

***टीपः—** हे शद्ब अर्थातच समर्थ विद्यालय व त्यासारख्या कित्येक प्रामाणिक संस्था यांना लागू नाहींत. अलिकडे म्हणजे सन १९२० च्या असहकारितेनंतरच्या चळवळींत ठिकठिकाणीं ज्या शिक्षण संस्था निघाल्या, त्या जरी आमच्या मतानें सर्वच राष्ट्रीयशिक्षणांत बसत नसल्या, तरी तीं बंडें खास नव्हत.

असाही कांहीं काळ गेला. परंतु कांहींच निष्पन्न होईना. जुनें वर येईना व नवेंही मागें हटेना. येवढेंच झालें कीं कांहीं ही केलें तरी जसें अज्जीबाद जुनें मरून जाणें शक्य नाहीं, तसेंच नवेंही पण आतां कपाळाचें सुटत नाहीं, येवढा सिद्धांत ठरला. हा सिद्धांत कसा ठरला, नव्या जुन्याचा झगडा कसा झाला, वगैरे इतिहास मनोरंजक असला तरी आपल्या विषयास धरून नाहीं, ह्मणून आपण त्याला फांटा देऊन पुढें चालूं.

जेव्हां हा सिद्धांत ठरला, तेव्हांच असा पक्ष निर्माण झाला कीं चालू परिस्थितींत जर राष्ट्र या नात्यानें जगावयाचें असेल, तर या दोन टोंकांत कोठें तरी मध्यम मार्ग काढला पाहिजे. ह्मणजे राष्ट्रदृष्ट्या विचार करणाऱ्यांचे सांप्रत तीन सांप्रदाय राष्ट्रांत आहेत. हे तीनही प्रकारचे लोक आपआपल्या परीनें हिंदु राष्ट्राची पुनर्घटना करूं पहात आहेत. एकंदर हिंदु समाजाची विभागणी केली तर असें दिसून येतें.

जेव्हां नव्याचा बीमोड करून जुन्याचा पुनरुद्धार करण्याची चळवळ सुरू झाली, तेव्हां अर्थातच तिचा पुष्कळसा परिणाम झाला; पण ही जागृति उत्पन्न होऊन तिचा परिणाम होईपर्यंत पाश्चात्य संस्कृतीनें आपलें विघटनात्मक काम करून टाकलें होतें. ‘ राजा कालस्य कारणम् ’ अथवा ‘ सत्तेपुढें शहाणपण ’ नाहीं, हे सिद्धांत अबाधित आहेत. व्यक्तिस्वातंत्र्याचें रक्त आंगांतून खेळविणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांच्या जीवनाचें जर सूक्ष्म अवलोकन केलें तरी देखील हा सिद्धांत खरा ठरतो.

---

पूर्वींच्या पेक्षां त्या फारच सुधारलेल्या आवृत्त्या असून त्यांच्या चालकांचा स्वार्थत्याग व चिकाटी हीं तर खरोखरच आदरास पात्र आहेत. या दृष्टीनें महात्मा गांधींच्या चळवळीचे मोटेच उपकार ह्मटले पाहिजेत. आज मध्यप्रांत, वऱ्हाड, व महाराष्ट्र यांत जितक्या स्वावलंबी शिक्षण संस्था आहेत, त्यांतील बहुतेकांचा जन्म १९२० च्या कॉंग्रेस मध्यें आहे. अगदीं नाहीं ह्मटलें तरी, त्यांनीं लोकशिक्षणांचें काम किती केलें याची कल्पना येण्यास, अकोला ( वऱ्हाड ) येथील श्रीकृष्णधाम व सरस्वती मंदिर या टुमदार संस्थांचें काम पाहावें! आह्मी राष्ट्रीय बंडें असें जें मुद्दाम ह्मटलें आहे, तें विशेषतः त्यापूर्वींच्या २० वर्षांत याविषयीं ज्या औटघटकांच्या व इंग्रजी शाळांची मराठी नक्कल असलेल्या अनेकहेतुमूलक संस्था निघाल्या, त्यांना अनुलक्षून आहे, परंतु हे सर्वही लोक वरील तीन प्रकारांत पडतात. कसें तें आपण पुढें पाहूं.

## आजच्या हिंदी समाजाची स्थूल विभागणी.

- **हिंदीसमाज.**
  - **हिंदु.**
    - **वैदिकधर्मी**
      - (व्यक्तिनिष्ट जीवन) **अजागृत.**
      - **जागृत** (जीवनाची व्यापक कल्पना.)
        - (ज्यांना या ग्रंथांत पुढारी म्हटलें आहे ते) **विवेचक।**
          - **राजकीय.**
            - निर्मळ राजकीय
              - निराश. कुंठित. कर्मयोगी.
            - धर्म व राजकारण यांची जोडी आहे अशी श्रद्धाच असलेले
              - निराश. कुंठित. कर्मयोगी.
                - **१ पुनर्घटनावादी.**
            - श्रद्धा नसलेले पण उपयोगाच्या दृष्टीनें ती ठेवणारे.
              - निराश. कुंठित कर्मयोगी.
                - **२ पुनर्घटनावादी.**
          - **सामाजिक**
            - निर्मळ सामाजिक
              - निराश. कुंठित. कर्मयोगी.
            - धर्म व समाज यांची जोड मानणारे
              - निराश. कुंठित. कर्मयोगी.
                - **३ पुनर्घटनावादी.**
            - सोयीची बाब म्हणून तसें करणारे.
              - निराश. कुंठित कर्मयोगी.
                - **४ पुनर्घटनावादी.**
          - **धार्मिक**
            - निर्मळ धार्मिक
              - केवळ कट्टर
                - निराश. कुंठित. कर्मयोगी.
              - शास्त्र न मोडतां, परंपरा ठेऊन, सुधारणा इच्छिणारे.
                - निराश. कुंठित, कर्मयोगी.
                  - **५ पुनर्घटनावादी.** तत्वसमन्वयी)
            - देशकाल व धर्म यांची सांगड मानणारे.
              - कोठेंतरी शास्त्र वचन आढळलें कीं त्याला धरून फरक करणारे.
                - निराश. कुंठित. कर्मयोगी.
                  - **६ पुनर्घटनावादी.**
              - आपल्याच मतानें शास्त्राचा अर्थलावून सुधारणा करणारे.
                - निराश. कुंठित. कर्मयोगी.
                  - **७ पुनर्घटनावादी.**
        - **अविवेचक.** (ज्यांना या ग्रंथांत अनुयायी म्हटले आहे ते)
          - एका सांप्रदायास चिकटून असणारे
          - केवळ सद्धेतूनें पुढें येईल त्यास मदत करणारे त्यागी.
      - **ढोंगी.** (वस्तुतः अजागृत; पण अनेक प्रकारच्या हीन हेतुंस्तव जागृततेचें दंभ करणारे.)
    - **अवैदिक**
  - **अहिंदु.**

टीपः— या वरून पुनर्घटनावादी यांच्या सात प्रकारच्या भुमिका कळून येतील. निराश=यश विषयीं हताश होऊन प्रयत्न-दुर्बळतेनें उदासीन बनलेले. कुंठित=दारिद्र्य, बंदिवास वगैरे अनेक कारणांनीं असमर्थ व उदासीन बनलेले.

मध्यआशियांतील एका कामेलपाशानें सत्तेच्या चाबकाखालीं तुर्की अस्वलांना कसें चटचट वाटेवर आणून माणसाळलें तें पाहिलें ह्मणजे हीच गोष्ट पटते. निरपवाद असें कांहींच नाहीं. त्याप्रमाणें याही सिद्धांताला क्वचित् कोठें अपवाद सांपडेल; नाहीं असें नाहीं. तरी पण बहुतांशीं तो खराच आहे. त्या राजसत्तेचा आणि पाश्चात्य संस्कृतीचा एकजीव झाल्यानें, जाग्या झालेल्या गलिव्हराला चिमुकल्या लोकांच्या चिमुकल्याच भासणाऱ्या पण असंख्य पाशांनीं जखडून गेल्यानें आंग देखील हलवितां येईना. तेव्हां असें प्रत्यंतरास आलें कीं, कांहीं झालें तरी आर्यसंस्कृतीस अगदीं पूर्वीच्याच स्वरूपांत चिकटून राहणें अशक्य झालें आहे. उत्तरचरित्रांत ह्मटल्या प्रमाणें पिसाळलेलें कुत्रें डसून गेलें आहे. आतां तें जरी मरून गेलें तरी त्याचें विष जें शरिरांत भिनलें आहे तें आहेच. तें आपलें काम, कांहीं झालें तरी, केल्या खेरीज सोडीत नाहीं. अर्वाचीन वैद्यकाप्रमाणें त्या विषाचेंच रसायन बनवून जर टोंचतां आलें तरच कांहीं तरणोपाय आहे. ही जीवंत जाणीव जी झाली तिचा परिणाम 'हिंदुसंघटना' 'धर्मशास्त्राची पुनर्रचना' 'नवीन स्मृति' वगैरे शेंकडों तऱ्हेनें दिसत आहे. हा प्रयत्न त्या मानानें नवाच आहे. पण आहे त्या स्थितींत असें स्पष्ट दिसतें कीं, नवीन तऱ्हेची जोमदार संस्कृति व नवीन आर्यराष्ट्र निर्माण करण्याच्या दृष्टीनें यांचे ही प्रयत्न निष्फळच होत आहेत. एकी होण्याच्या ऐवजी बेकीच कमालीची वाढत आहे, समर्थपणाच्या ऐवजीं हीनदीनताच उत्पन्न होत आहे. जुनीं कोडीं न सुटतां नवीं कोडीं मात्र उत्पन्न होतील असें स्पष्ट दिसत आहे.

सोबत जी विभागणी दिली आहे त्यावरून एक गोष्ट लक्षांत येईल कीं त्यांत समाज आणि धर्म या शब्दांचा संकर फार झालेला आहे. आणि तें ठीकच आहे. कारण माणुस ह्मटला कीं तो जणूं एक तिपायीवरला घडा आहे. जसें त्याला सामाजिक अस्तित्व असतें, तसेंच त्याला राजकीय व धार्मिक अस्तित्व ही आहेच. त्यांना सोडून त्याला राहतां येतच नाहीं. परंतु पाश्चात्य देशांत यांचा परस्परांशीं फारच थोडा संबंध असतो. राजकीय दृष्ट्या अवश्य असलेल्या गोष्टी खेरीज करून इतर गोष्टी व्यक्तिविषयकच समजण्यांत येतात. त्यामुळें त्यांच्यांत राष्ट्रांराष्ट्रांचें राष्ट्रीयत्व हें बहुतांशीं राजकीय अस्तित्वावरच अवलंबून आहे, व पुष्कळसे प्रश्न त्याच धोरणावर सुटतात. पण आज आह्मांला राजकीय दृष्ट्या स्वतंत्र अस्तित्वच नसल्याकारणानें व हा जो नवीन तडजोड पक्ष निघाला, याचा उगम बहुतेक करून राजकीय चळवळींत असल्यामुळें, त्यांना साहजिकच असें वाटतें कीं कोणीकडून

तरी राजकीय दृष्ट्या उन्नति झाली, म्हणजे त्यांचे राजकीय उन्नतीचें शिखर जें स्वराज्य अथवा स्वातंत्र्य तें गांठलें म्हणजे राष्ट्रकार्य झालें. तें तें मिळविण्यास व टिकविण्यास जें जें अनुकूल तें तें उचलणें, याचेंच नांव हिंदुसमाजाची पुनर्घटना, संस्कृतीकरण अथवा राष्ट्रीयत्व. त्यामुळें इतर गोष्टी ते गौण समजतात. हाच त्यांच्यांत व पूर्वीच्या संहारक ' मानस पुत्रांत ' फरक आहे. राजकार्य हें सर्वस्वीं लोकांच्या सहकार्यावर अवलंबून आहे. थोड्या तरी लोकरंजनाखेरीज लोक सहकाय कधींच करूं शकत नाहींत, हा अनुभव असल्यानें त्यांच्या संस्कृतीकरणाची भाषा होतां होईल तों जुन्यांच्या वळणावर बोलणें, येवढ्यापुरतेंच त्यांचें पुराणत्व आहे. हें लक्ष्यांत ठेवून आपण त्यांच्या प्रयत्नांचें परीक्षण करूं.



# प्रकरण २ रें.

# अधिकार.



"पुराणमित्येवहि साधु सर्व," अथवा 'मनःपूतं हि साधुत्वं' कोणत्याहि बाण्याचे लोक असोत, आर्य संस्कृति व आमचें राष्ट्रीयत्व यांचा विचार करावयास लागल्याबरोबर धर्माची ही धोंड जी मार्गांत उभी राहते, ती कांहीं टळत नाहीं धर्माचा हा विंध्याद्रि जो एकदा गगनचुंबन करून बसला आहे, तो कांहीं केल्या नम्र होतच नाहीं. त्याला आडवा कसा पाडावा, त्याला आडवा पाडणारा अगस्ति कोठें सांपडेल, हा मोठाच विचार आहे. संशोधनाच्या, संस्करणाच्या व पुनर्घटनेच्या सुरावटी जुन्या सतारीवर 'पूर्वी'च्याच थाटावर वाजविल्या असतां, हें काम होईल, असें पुष्कळांस वाटूं लागलें आहे. मागील प्रकरणांत ह्मटल्याप्रमाणें, संस्कृतिकरणाची भाषा जुन्या वळणावर बोलणें हाच अगस्ति आहे, असें पुष्कळांस वाटत आहे. त्यांत काय तथ्य आहे, तें आपण पाहूं.

परंतु तें करण्यापूर्वी आपणांस थोडें खोलांत जाऊन मनुष्य स्वभावाचें सामान्य परीक्षण केलें पाहिजे. डॉ. पाल कॅरस यानें नीतिशास्त्राविषयीं असें ह्मटलें आहे कीं, Our Proposition is that the leading principle in ethics must be derived from the philosophical view back of it The world-Conception, a man has can only give character to the principle in his ethics.

आमचें मत असें आहे कीं नीतिशास्त्राच्या मूळ सिद्धांताचा उगम तत्त्व-ज्ञानांतूनच झाला पाहिजे. एकंदर विश्वाविषयीं जर कांहीं निश्चित कल्पना माणसाजवळ असेल तरच त्याच्याजवळ कांहीं यथार्थ व जिवंत नीतितत्त्वें असूं शकतील. एरवी ही गोष्ट अशक्यच आहे.

ह्मणजे मनुष्याचें नीतिशास्त्र या जगताविषयीं त्याची जी कल्पना असते, त्याच्या आधारावरच उभारलें जातें. ह्मणजे या जगताचें कोडें जगाचा व मनुष्याचा संबंध मानवी जीविताचें रहस्य व त्याचें पर्यवसन आणि मृत्यूनंतरची त्याची व्यवस्था वगैरेसंबंधी त्याच्या ज्या कल्पना असतील, त्याला धरूनच तें असणार. या सर्वांचा विचार न करतांही व्यवहारी जीव नीतिमान असूं शकतो, पण ती संवयीनें आलेली

एक सहज क्रिया होय. अशा क्रियांचें शास्त्र बनवावयाचें म्हटलें म्हणजे वरील सर्व प्रश्नांचा यथाशक्ति उमज पडलाच पाहिजे. माणूस नुसता नीतिमान असला म्हणजे पुरे, मग त्या शास्त्राची काय आवश्यकता आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. व्याकरणशास्त्र, अथवा न्यायशास्त्र यांचें अवाक्षरही ठाऊक नसतां माणसें व्याकरणशुद्ध व तर्कशुद्ध बोलतात, म्हणून तीं शास्त्रेंच नकोत, असें कोणीही म्हणत नाहीं. असा डॉ. कॅरस यांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. जी गोष्ट नीतिशास्त्रासंबंधानें, तीच मनुष्याच्या एकंदर कृतीसंबंधानेंही व्यापकपणानें म्हणतां येईल, आणि म्हणून आपणांस ही प्रथमतः मनुष्यस्वभावाचें थोडेंसें अवलोकन केलें पाहिजे. कारण, परिस्थितींतून मार्ग काढावयाचा म्हणून जसा तिचा विचार करावयाचा, त्याचप्रमाणें परिस्थितींतून मार्ग काढणारा मनुष्य देखील, आपल्या ‘ दुष्परिहर ’ स्वभावाला सोडून कर्म करूं शकत नाहीं, म्हणून त्या स्वभावाचाही विचार केला पाहिजे. अर्थातच, हा स्वभाव ज्या मूल घटकांचा बनलेला असतो, त्यांचाही केला पाहिजे. एवढ्याच करितां विशिष्ट परिस्थितींत विशेष तऱ्हेनें वागलेलीं माणसें पाहून त्यांच्या स्वभावावर शेरा देण्यापूर्वी तो स्वभाव डॉ. कॅरसच्या म्हणण्याप्रमाणें, कोणत्या तऱ्हेच्या समष्टीज्ञानावर ( World conception वर ) आधारलेला आहे, याचा विचार केला पाहिजे.

विशिष्ट परिस्थितींतून विशेष तऱ्हेनें मनुष्य मार्ग कसा काढतो, याची आपण कांहीं थोडीं उदाहरणें पाहूं. भारतामध्यें भीष्माचार्यांनीं आपली भीष्म प्रतिज्ञा ज्या रीतीनें पार पाडली, तें याचें एक उदाहरण होय. युक्तायुक्ततेचा विचार न करतां केवळ शब्दासच चिकटून राहण्यांत ‘ भीष्मांची जी भयंकर भूल ’ झाली, त्याबद्दल अर्वाचीन प्रोफेसरांनीं पुष्कळच पांडित्य प्रगट केलें आहे. त्यांच्या समजुतीप्रमाणें भीष्माचार्यांनीं दुर्योधनाचा निग्रह करून त्यावेळेस कौरवकुळ वांचवावयास पाहिजे होतें. म्हणजे, थोडक्यांत बोलावयाचें तर, राष्ट्राकरितां स्वतःच्या व्यक्तित्वाचा त्याग करावयास पाहिजे होता. कारण जें व्रत अथवा जो धर्म कोणाचेंच हित साधीत नसून केवळ क्लेशकारकच आहे, असें दिसतें, त्याच्या योगानें एका व्यक्तीचा मोठेपणा कितीही वाढला तरी राष्ट्रीयदृष्ट्या तो व्यर्थच आहे. अर्वाचीन प्रोफेसरास असा मोह पडणें कांहीं मोठें नवल नाहीं. पूर्वकाळीं महाराणा प्रतापसिंहसारख्या धैर्यमेरूलाही असाच विकंप झाला होता. ज्याला जगाच्या इतिहासांत कोठें तोडच नाहीं, असल्या अपूर्व स्वाभिमानानें, देशधर्मांकरितां केलेल्या न भूतो न भविष्यति अशा झगड्यानंतर, एका भाकरीच्या तुकड्याकरितां पोटच्या गोळ्याला रडतांना पाहून त्याच्याही

बुद्धीला क्षणमात्र असाच भ्रम झाला होता. अनंतकालपर्यंत तसल्या तऱ्हेची खडतर तपश्चर्या करूनही जर आपल्या लाडक्या जिवाला अन्नाचा साधा घास देखील घालतां येईना, तर त्या करण्याचा उपयोग तरी काय ? इतकें सारें करावयाचें तरी कशा-करितां ? अशा विचारांनीं दुर्बळ होऊन रणत्याग करण्याचा विचार करीत असतां बिकानेरच्या कविश्रेष्टानें त्याला त्याचा मार्ग कसा दाखवून दिला तें सुप्रसिद्धच आहे. याच्या उलट प्रत्यक्ष त्याच्या मुलावर हताश होण्याचा प्रसंग आला असतां, त्यानें त्यांतून पळवाट कशी काढली, तेंही प्रसिद्धच आहे. अशाच तऱ्हेचें उदाहरण काश्मी-रच्या कमलादेवीचेंही आहे. कांहीं काल पराक्रमानें यवनाशीं लढल्यावर तिला व तिच्या काश्मिरी लोकांना अशा रीतीनें झगडा करण्यापेक्षां आत्मसंरक्षण करणें बर, असा बुद्धिवाद सुचून नवऱ्याच्या मृत्यूकरितां ज्याचा ती सूड उगवणार होती, त्याच शहामिराची ती पट्टराणी बनून राहिली, व काश्मिरीलोकांनीं इस्लामाचा आदर केला. अशा तऱ्हेची वेगवेगळ्या परिस्थितींत वेगवेगळ्या रीतीनें वागल्याचीं वाटेल तितकीं उदाहरणें घेतां येतील, परंतु आपल्या विवेचनास आवश्यक अशीं थोडीशीं घेतली. त्यांची उपयुक्तता पुढें विषयानुरोधानें कळेलच.

आमच्या इकडील त्रिधाभेदी पद्धतीप्रमाणें पाहिलें तर मनुष्याचेंही तीन वर्ग पडतात. एक वर्ग, ज्यास आपण कोणत्याही तऱ्हेचे पुढारी म्हणतों, त्यांचा. याच्या उलट, अर्थातच दुसरा अनुयायांचा. यांच्यामध्यें ओघानेंच तिसरा वर्ग पडतो. पुढारी होण्याची त्यांची पात्रताच नसते, आणि अनुयायी तर ते कोणाचेच नसतात. जेणें-करून स्वतःची सुखसोय साधेल, त्याप्रमाणें वागत रहावयाचें, एवढेंच त्यांचें धोरण असतें. पूर्वीच्या काळच्या बाजारबुणग्यांप्रमाणें यांची स्थिति असते. लष्करभरतीच्या वेळेला सैन्याची संख्या फुगवून दाखविण्यास यांचा खासा उपयोग होतो. ज्या पक्षास जय मिळेल, त्या पक्षास मिळून वेळेनुसार वाटेल त्याचा गोट लुटून आपला योग-क्षेम चालवावयाचा, एवढेंच त्यांचें काम. समाजामध्यें अशा प्रकारच्या लोकांचीच संख्या जास्त असते. त्याचप्रमाणें या मध्यवर्ति वर्गांतच आणखीही एक प्रकारचे लोक पडतात. हे लोक अंतःकरणांत वर सांगितलेल्या वर्गांतील बाजारबुणग्यांप्रमाणे अप्रामाणिक नसतात. केवळ सुखसोयी पलीकडे आयुष्याला कांहीं तरी ध्येय असावें, त्या ध्येयाला अनुसरूनच आयुष्याची मांडणी करावी, व त्याकरितां स्वार्थत्याग करावा, असें यांना मनःपूर्वक वाटत असतें. परंतु येशु ख्रिस्तानें आपला पट्टशिष्य पेत्र याच्यासंबंधीं म्हटल्याप्रमाणें " अंतःकरण तुटतें पण शरीर वळत नाहीं. "

( ' The spirit indeed is willing, but the flesh is weak ' ) अशी यांची स्थिति असते. वाटेल तें करून आयुष्याचा ओघ आपणास पसंत असलेल्या मतांच्या पात्रांतूनच वाहावयास लावण्याइतका जोमदारपणा यांचेठिकाणीं नसल्यामुळें, आणि इतरही कित्येक प्रकारच्या दुर्बलतेमुळें यांचीही स्थिति परिस्थितीला वारा वाहील तशी पाठ देऊन काळ कंठण्याची असतें. हे दोन्हीही प्रकारचे लोक जरी अगदीं भिन्न टोकांस असले तरी परिणामतः त्यांची एकरूपता असल्यामुळें त्या दोघांचाही उपयोग राष्ट्रीयत्व, धर्म, असल्या तऱ्हेची अवघड कोडीं सोडविण्यास होत नाहीं. यांची संख्या मोठी असल्याकारणानें, ' असून अडचण, व नसून खोळंबा, ' अशी मात्र यांच्यामुळें पुष्कळ वेळां स्थिति होते.

हे मध्यवर्गांतले लोक जर टाकले, तर उरलेले लोक आपल्या मतासंबंधीं प्रामाणिक असतात, असें ह्मणतां येईल. प्रामाणिक ह्मणजे, जें त्यांना वाटतें, असें ते ह्मणतात तसें त्यांना जीवाभावानें खरोखरच वाटत असतें, आणि त्यामुळें आचार विचारादिकच तर काय, पण त्यांचें सारें अस्तित्वच कांहींही झालें, व कोणत्याही परिस्थितींत पडलें तरी त्या समजुतींना धरूनच असतें. अशा तऱ्हेनें मनुष्य अंतःकरणांत प्रामाणिक प्रवृत्तींचा असला, ह्मणजे त्यास कोणती अडचणच पडणार नाहीं, त्याचें आयुष्य केवळ दोरीसूत असतें, कोणत्याही गोष्टींचें त्यास कोडें पडत नाहीं, असें अर्थातच होत नाहीं. त्यालाही प्राप्त परिस्थितींत असल्या तऱ्हेची संकटें येतच असतात, व त्यांतून तो आपला प्रामाणिकपणा कायम ठेवून मार्ग काढीत असतो. अशा लोकांचे अर्थातच पुढारी व अनुयायी असे दोन वर्ग पडतात. कारण, एखाद्या अडचणींतून अथवा आयुष्यासंबंधीं सर्व प्रकारच्या प्रश्नांतून प्रामाणिकपणें मार्ग काढण्याची इच्छा, व त्याप्रमाणें पुढें वागण्याची धमक, जरी त्यांच्यामध्यें असली, तरी, असला मार्ग काढण्यास जी बुद्धीची वगैरे इतर सामग्री, जो रिकामा वेळ लागतो, किंवा याचप्रमाणें बाह्यपरिस्थितीची जी थोडीबहुत अनुकूलता लागते, ती त्यांतील प्रत्येकाजवळ असतेच, असें नाहीं. त्यामुळें साहजिकच एकानें शिजवावें, व बाकीच्यांनीं खावें असें त्यांच्यांत होतें. पूर्वी सांगितलेल्या मध्यवर्गींतील दोन्ही प्रकारचे लोक, यापैकीं कोणत्या तरी प्रकारचा पेशा उचलून सांप्रदाय वाढवितात, अथवा, केवळ तटस्थ राहून कालक्रमणा करतात. कोणत्याही समाजाची घटना साधारणतः अशा तऱ्हेची असते. ह्मणून त्या समाजाविषयीं सर्व प्रकारच्या क्यावाईट प्रश्नांची जबाबदारी पुढारी ह्मणविणाऱ्या असल्या विचारवान लोकांवरच

असते. त्यांच्या अनुयायांची अशी श्रद्धा असते, अथवा त्यांनीं असें गृहीत धरलेलें असतें कीं, कोणत्याही महत्वाच्या प्रश्नाच्या बुडाशीं असलेलीं मानवीजीवित व विश्व या संबंधाची कोडीं, या पुढाऱ्यांनीं उलगडलेलीं आहेत, व त्यांच्या पावलावर पाऊल टाकून बिनधोकपणानें जाण्यांतच आपल्या आयुष्याची सार्थकता आहे. निदान, आह्मी वर्गीकरण केल्याप्रमाणें जे सार्थ अनुयायी असतील, अथवा, ज्यांना त्या वर्गांत पडावयाचें असेल, त्यांनीं तरी ज्यास ते पुढारी ह्मणतात, तो, अशा तऱ्हेचा प्रामाणिक कार्यक्षम आहे किंवा नाहीं, व कोणत्याही कूटासंबंधानें त्यानें दाखविलेला उलगडा इतक्या आमूलाग्र संशोधनानंतर बनलेला आहे, अशी खात्री करून मगच त्यांचें अनुयायित्व पत्करलें पाहिजे.

याच्यावर कोणी असें ह्मणेल कीं, तत्वज्ञानासारख्या मोठमोठ्या विषयांची गोष्ट वेगळी, परंतु जेथें केवळ व्यवहाराचेच प्रश्न आहेत, त्या ठिकाणीं, मानवी जीविताचीं कोडीं आणि या विश्वाच्या रहस्याचा उलगडा, असल्या मोठमोठाल्या प्रकरणांची काय गरज आहे? कांद्याला बिसमिल्ला कशाला? व्यवहाराच्या दृष्टीनें जें समोर दिसतें, त्यांचे व्यवहारिक सदूबुद्धीच्या एका घावानेंच दोन तुकडे करून रस्त्याला लागणें चांगलें नाहीं काय? ही शंका वरवर पाहतांना मोठी चांगली व मार्मिक दिसते; आणि पूर्वोक्त मध्यमवर्गांतील व क्वचित् अनुयायी वर्गांतील लोकांचेंही हिच्यामुळें समाधान होईल. परंतु, पुढारी ह्मणून जो वर्ग आह्मीं काढला त्यांतील माणसास, असें वाटणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर, त्यास ही शंका उद्भवच होणार नाहीं, कारण त्याच्या प्रामाणिकतेमुळें कोणत्याही गोष्टींचा आमूलाग्र उमज पडल्याखेरीज त्यांचें समाधान होणेंच शक्य नाहीं, आणि मनुष्यजीविताशीं संबंध असलेली, अशी कोणती गोष्ट आहे, कीं जिचा विचार करूं ह्मटलें असतां, माणूस या मूलप्रश्नांशीं जाऊन भिडत नाहीं? टेनिसननें ह्मटल्याप्रमाणें भिंतीवर उगवणारें यःकश्चित् फूल तें काय? परंतु त्याचा नीट विचार करूं ह्मटलें, तरी, विश्वाच्या कोड्याचा उलगडा केल्याखेरीज भागत नाहीं. ' पिंडीं तें ब्रह्मांडीं ' ही तर आमच्या तोंडांत खेळणारी नेहमींचीच ह्मण आहे.

व्यवहारांत उत्पन्न होणाऱ्या अनेक प्रश्नासंबंधीं प्रत्येक वेळेला मनुष्य इतका सर्व विचार करतांना दिसत नाहीं. जें काय समोर दिसत असेल, त्याचा आपल्या बुद्धीप्रमाणें व्यवहार्यतेच्या दृष्टीनें निकाल लावूनच तो चालत असतो. परंतु जेव्हां कोणत्याही गोष्टीस अनेक जीवांच्या उपयोगी पडावें ह्मणून शास्त्रीयता

आणावयाची असते, तेव्हां असें करून भागत नाहीं. कोणताही एखादा नवीन मार्ग प्रवर्तित करणाऱ्यांस आपल्या पंथाची उभारणी एकाद्या विशिष्ट तत्वाच्या पायावर करावी लागते व त्या तत्वाच्या सारणींत मनुष्याच्या मनांत येणारे असल्या तऱ्हेचे प्रश्न कोणत्या तरी तऱ्हेनें बसवावे लागतात, तें एवढ्याच करितां. तसें केल्याखेरीज पूर्वोक्त मध्यवर्गीतील या नाहीं त्या प्रकारच्या लोकांनीं, तो पंथ कितीही फुगलेला दिसला तरी त्यांत जोमदारपणा उत्पन्न होत नाहीं. राष्ट्रहिताकरितां अखंड तळमळणारे डॉ. मुंज्यांसारखे वीर, राष्ट्र हिताच्या दृष्टीनें धर्माची कोडीं उलगडू पाहणारे डॉ. कुर्तकोटी सारखे शंकराचार्य अथवा केवळ समाजदृष्ट्या झटणारे महादेवशास्त्री दिवेकरांसारखे पंडित, यांच्या प्रयत्नांस जोमदार स्वरूप न येतां महात्मा गांधी यांचा सांप्रदाय मात्र फार थोड्या वेळांत जोमदार रीतीनें वाढूं शकतो याचें कारण हेंच आहे. म. गांधी यांचें व्यक्तित्व तर खरेंच, परंतु त्याबरोबरच ज्या तत्वज्ञानाच्या पायावर त्यांनीं आपल्या सांप्रदायाची उभारणी केली आहे, त्याच्या साह्यानें मनुष्याच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या वरील तऱ्हेच्या अडचणींचा उलगडा ते आपल्या परीनें करून दाखवितात, हेंहीं एक महत्वाचें कारण आहे. म. गांधींच्या तत्वज्ञानाविषयीं व व्यक्ती विषयींही कोणाचा कितीही मतभेद असला तरी प्रचलित अनेक देशधुरीणांपेक्षां त्यांच्या सांप्रदायांत निष्ठावंत व प्रामाणिक अनुयायी जास्त आहेत, आणि त्यामुळेंच तो सांप्रदाय जास्त जोमदारपणानें, मधल्या काळांत मरून न जातां, पुन्हां वर डोकें काढीत आहे, ही गोष्ट कोणासही नाकबूल करतां यावयाची नाहीं.

सांप्रदायप्रवर्तनास आवश्यक ह्मणूनच केवळ एवढ्या बिसमिल्ल्याची गरज आहे, असें नाहीं. वर आह्मीं सांगितलेंच आहे कीं जो कोणी प्रामाणिक विचारप्रवर्तक असेल, त्याला इतक्या खोलांत जाऊन आमूलाग्र प्रश्न सोडविल्याखेरीज समाधानच व्हावयाचें नाहीं. सामान्य माणसें देखील व्यवहारांत एवढा विचार कोणत्याही गोष्टींत केल्याशिवाय वागतांना दिसतात, तरी, सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां असें आढळून येईल कीं त्यांसही या विचारांची गरज असतेच. कशी तें आपण पाहूं.

सध्यांचा काल विशेषतः राजकीय चळवळीचा आहे. ईश्वरी इच्छेनें, चक्रनेमिक्रमानें, दुर्दैवानें, कोणत्याही कारणानें कां होईना, आह्मांस पारतंत्र्य आलें, आणि पारतंत्र्यानें कमालीची दुर्बलता आली. या दुर्बलतेमुळें आमचा पुष्कळ प्रकारांनीं अधःपात झाला आहे, असें लक्षांत आलें. जर ही दुर्बलता आली नसती, तर

हा अधःपात, कदाचित, आह्मांला जाणवलाही नसता. परंतु अधःपाता खेरीज असें सुखासुखी पारतंत्र्यांत पडणें शक्य नसल्यामुळें अधःपात झाला असला पाहिजे, अशी खात्री पटून त्याचीं कारणें आह्मीं शोधू लागलों. निरनिराळ्या विचारसरणी-प्रमाणें अनेक गोष्टींच्या माथीं त्याचें खापर फोडण्यांत आलें. तें कांहींही जरी असलें, तरी, ज्या एका गोष्टीविषयीं आजकाल अगदीं एकमत आहे, अशी गोष्ट ह्मणजे, स्वातंत्र्य ही होय. कारणें कांहींही असोत, त्यांचीं निराकारणें कशाही रीतीनें होवोत, स्वातंत्र्य ह्मणजे राजकीय पूर्णता, हें एकच आज प्रत्येकाच्या पुढें ध्येय आहे. त्या स्वातंत्र्याच्या मार्गांत, आमच्यांत एकी नसणें, संघशक्तीचा अभाव हें एक बलवत्तर कारण आहे, अशी उघड कबुली सर्व मुखानें दिली जाते. आतां आपण असें पाहू कीं राजकीय स्वायत्ततेची जर सर्वांस एवढी सामान्य अवश्यकता भासत आहे, तर तिच्याकरतां एकी व्हावयास अडचण कोठें आहे? केवळ राजकीय स्वातंत्र्याचा लढा, अशा रीतीनें लढावयाचा कीं तशा रीतीनें, घाईनें लढावयाचा किंवा सावकाश लढावयाचा, अमानुषपणें लढावयाचा, किंवा सर्वप्रकारच्या मनुष्य धर्मास जपून लढावयाचा, इत्यादि प्रश्नांसंबंधाची मतभेदता हीच आड येते, असें कोणी ह्मणत नाहीं. उलट त्या व्यतिरिक्त असलेल्या—अस्पृश्यतेसारख्या-इतर कार-णांनाच त्यांच्या विचाराखेरीज स्वातंत्र्याचें कोडें उलगडणार नाहीं, इतकें महत्व देण्यांत येतें. जर स्वातंत्र्याची इतकी जरूर प्रत्येक विचारवान माणसांस भासते तर त्याच्याकरितां चटकन एकी न होतां, या असल्या अवांतर कारणांनीं राष्ट्राची गाडी ' सायडिंग'ला पडून रहावी याचें कारण काय? वावदूकतेनें मताभिमानी एकमे-कांस ह्मणतात त्याप्रमाणें हा काय खरोखर मूर्खपणाच आहे? असें नाहीं. याच्या मुळाशीं आह्मीं वर प्रतिपादन केलेला सिद्धांतच आढळून येतो.

राजकीयस्वातंत्र्याचा अर्थ मनुष्याला अनुकूल असलेल्या सर्वशक्तींच्या वाढीस योग्य प्रमाणानें वाव, त्यांच्या साह्यानें आपलें जीवन सुखमय आणि सुलभ रीतीनें कंठण्यास कराव्या लागणाऱ्या उद्योगाचें यथायोग्य प्रमाणांत फळ, व त्यामुळें उत्पन्न होणारें समाधान, हाच करतां येईल. आणि केवळ अशा रीतीनें जगावयाचें एवढीच जर मनुष्याची आकांक्षा असती, तर हा हेतु साध्य होण्यास लागणारी एकी चुटकीसरशी घडून येऊं शकती. कारण मग तेथें कांहीं अडथळा असण्याचें कारण नव्हतें. आजकालच्या राजकीयपरिस्थितींत एकीकरितां सुचविले जाणारे पुष्कळसे मार्गही याच धोरणास धरून असतात. मुसलमानांचें आणि आपलें पटत

नाहीं ना, आणि मुसलमान आपला हेका सोडावयास तयार नाहींत ना ? बरें तर; तुह्मीं आपलें जीवन त्यांच्यासारखें करा, ह्मणजे भिन्नता चटकन् निघून जाईल; एकी होण्यास पंचाईत पडणार नाहीं, व त्यांत कांहीं अडचणही नाहीं. कोणीकडून तरी सुख सोईनीं जगतां आलें कीं पुरे; अशा वळणावरच या सूचना असतात; मग त्या उघड उघड नागव्या असोत, किंवा शास्त्राधाराच्या वेषामध्यें असोत, त्यांचा अर्थ असाच असतो, निदान पुष्कळांच्या अंतःकरणांस तो तसाच भासतो ह्मणून एकी होत नाहीं. जगण्याकरितां आणि उपभोग घेण्याकरितां तर मनुष्याचा अट्टाहासच असतो, परंतु तेवढ्यावरच त्याचें भागत नाहीं. कांहीं विशिष्ट तऱ्हेनें उपभोग घेतला पाहिजे, आणि कांहीं विशेष संस्कारांस धरून जगलें पाहिजे, असा त्याचा प्रयत्न असतो. मनुष्यत्व ह्मणून ज्याच्या ठिकाणीं आहे, त्याला जर असें करतां आलें नाहीं, आणि नुसतें खाण्यापिण्याचें सुख व स्वास्थ्य वाटेल तितकें मिळालें, तरी तें नको, त्या पेक्षां मृत्यु पुरवला, असें त्यास होऊन जातें, हें बहुतेकांस पटण्याजोगें आहे. यामुळेंच निरनिराळीं राष्ट्रें उदयास येतात, त्यांच्या संस्कृतींचे उदयास्त होतात, आणि हें संसृतीचें चक्र आपल्या केंद्रापासून न ढळतां अखंड फिरत राहतें. ही जी विशिष्ट तऱ्हा आणि हे विशिष्ट संस्कार, यांच्याकरितां मरण्याची तयारी तेंच खरें मनुष्यत्व होय. याचा अर्थ असा नाहीं, कीं या विशिष्टपणांत फरक होऊं नये. कालाच्या ओघांत स्थिर गोष्ट अशी कोणतीच नाहीं. कोणत्याही एका विशिष्टस्थळीं नदींतील पाण्याची लाट खोळंबून राहिली आहे, असें थोडेंच होतें? जें पाणी आपण आतां तेथें पाहतों, तें क्षणभरानें तेथें नसतें, जें क्षणभरानें तेथें असतें, तेंही क्षणभरानें दृष्टीआड होतें; जें दृष्टीआड झालें, तें कांहीं केल्या परत येत नाहीं. असें जरी झालें, तरी, नदीच्या प्रवाहाला कधीं खंड पडला आहे, असें कधीं होत नाहीं. त्यामुळें पाणी कितीही बदललें तरी नदीचा प्रवाह बदलला, असें कधीं वाटत नाहीं, तो अखंडच असतो. आणि ह्मणूनच पाण्याचा बदल त्यांत कसा होतो, हें कोणाच्या लक्षांतही येत नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं मनुष्यप्राणी अनेक प्रकारच्या समानतेनें व्यवहार करावयास लागून त्यांचा समाज बनतो, तेव्हांच त्यास एक प्रकारची संस्कृति व त्या संस्कृतीच्या अभिमानामुळें, एक प्रकारचें राष्टीयत्व आलेलें असतें. त्यामुळें इतर मानव समाजांपासून त्यांचें भिन्नत्व उमटून पडतें. अव्याहत चालणाऱ्या जलौघाच्या एकरूपतेप्रमाणें ही भिन्नत्वाची धारा अशीच अखंड राहून मधल्या जलराशींचा मात्र वाटेल तितका फरक व्हावा, असें मनुष्यास

वाटतें, व तेवढ्याच करतां हे असले पुनर्घटनांचे वगैरे वाद पडतात. नाहीं तर सारेंच काम सोपें झालें असतें.

अशा प्रकारचें जें विशिष्टत्व मनुष्य पत्करतो तें इतक्या चिकाटीनें धरून ठेवण्याचा जो त्याचा यत्न असतो तो केवळ आवडीनावडीच्या दृष्टीनेंच असतो, असें ह्मणतां येणार नाहीं. एकाद्या अतीशय अडाणी मनुष्यापासून तों केवळ जड-वादी अशा अर्वाचीन पंडित शिरोमणीपर्यंतही प्रत्येकास जर कोणत्या गोष्टीची निर्विवाद जाणीव असेल, तर ती मानवी आयुष्याच्या क्षणभंगुरतेचीच. परंतु नुसतें तें क्षणभंगुर आहे, असें ह्मणून त्याचें समाधान होत नाहीं. मृत्युबरोबरच जर आपल्यास निःशेष विलयास जावयाचें असेल, तर हें आश्चर्यमय जीवन, नानातऱ्हेच्या आकांक्षा, सुखदुःखमय आणि मनुष्यास वेडें करणाऱ्या अशा अनेक कोमल भावना अपूर्णतेची सहज जाणीव पूर्णत्वास पोहोंचण्याची स्वाभाविक धडपड, आणि जिच्या तडाक्यांतून फारच क्वचित् कोणी सुटत असेल, अशी अनिवार प्रेमतृष्णा इत्यादि सर्व गोष्टींना कांहीं अर्थच राहणार नाहीं. आंग्ल कवयित्री मिसेस हेमान्स इच्या :——

" Alas for love, if thou wert all
O earth! and nothing beyond " *

या हृदयद्रावक ओळींनीं आपलें अंतःकरण घटकाभर वेडें कां होतें? किंबहुना, विशिष्ठ तऱ्हेनें जगण्याच्या अट्टहासाच्या मूळाशीं केवळ आवड नावडच अथवा, केवळ सोय आणि गैरसोयच असेल, तर, नीति वगैरे सारखीं महत्वाचीं शास्त्रेंच तर काय, पण आजची आमची धडपड जिच्या करितां आहे, ती देशोन्नति आणि देश यांत देखील कांहीं अर्थ राहणार नाहीं. आणि मनुष्याच्या जीवनक्रमांतून मानवी शिक्षण, ही एक जबाबदारीची बाबच गाळून टाकावी लागेल. कारण मग देश तरी काय, आणि उन्नति तरी कसली? कोठेंही रहावें, सोईला पडेल तो देश, आणि अभ्यासानें अथवा आवश्यकतेनें आवड पालटली कीं, जसें राहूं ती संस्कृति. राष्ट्रीय चळवळ तरी कशास पाहिजे ?

---

* या जडशरीराबरोबरच जर मनुष्याचें सारें अस्तित्व लयास जावयाचें असेल तर कशांत कांहींच अर्थ नाहीं. अरे! अरे! ही अनिवार प्रेमतृष्णा मानवी हृदयांत उत्पन्न होतेच तरी कां!

—" राजसत्तेचा वरवंटा सर्वांचें वाटोळें करीत असला तरी, मला त्याचें काय ? पलीकडे कांहींच नाहीं,—माझी स्वतःची कांहीं गैरसोय न होतां माझें आयुष्य गेलें ह्मणजे पुरे आहे;—" असें जर कोणी एकादा ह्मणूं लागेल, तर तें पटेल काय ? अशा मनुष्याच्या गळ्यांत कांहीं तरी एक कर्तव्य अडकवून देऊन आपण त्याची त्याला जाणीव करून देण्याकरितां धडपडतों, आणि युक्तीनें, गौरवानें, निर्भत्सनेनें, विलोभनानें, अथवा धाकानें त्याला तें कर्तव्य करावयास भाग पाडतों. याचें कारण एवढेंच कीं, एकाद्या डार्विननें अथवा आपल्या शोधांनीं जगाला आश्चर्यचकित करून टाकणाऱ्या एखाद्या पंडितानें कांहींही प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केलेला असला, तरी, मनुष्याच्या अंतःकरणामध्यें अगदीं खोलांतल्या खोलांत अशी एक खात्री नेहमींचीच असते, कीं, आपलें अस्तित्व, केवळ या मातीच्या साडेतीन हात घड्याबरोबरच नाश पावणारें खास नाहीं. आपल्या अस्तित्वाबद्दल तर कोणा-स्रच शंका नसते. युरोपियन तत्वज्ञानाचा देखील 'Ergo Cogito Ergo Sum' ह्मणजे—' मी विचार करतों, ह्मणून मी आहे, अर्थातच या विचाराहून कोणी तरी वेगळा आहे,—' हाच पाया आहे; आणि ज्याअर्थी आपल्या अस्तित्वाला वर्तमानकाल आहे, त्या अर्थी त्याला भूत व भविष्यकालही असलेच पाहिजेत, अशी, कोणी कांहींही ह्मटलें तरी, त्याचें अंतःकरण त्याला साक्ष देत असतें. याचा अर्थ असा कीं, या दिसणाऱ्या विश्वाच्या पलीकडे अदृश्य अनंत अस्तित्व असल्याखेरीज, मानवी जीवनाची पूर्णताच होत नाहीं. त्यामुळें अशा अस्तित्वाच्या अंतर्गत जाणिवेनें, आणि त्याच्या साह्यानें आपल्या अस्तित्वाची पूर्णता व्हावयाची आहे, या विश्वासानें मनुष्य आपलें इहलोकींचें आयुष्य, जेण करून तें अनंत अस्तित्व दुःखमय होणार नाहीं, सुखमय होऊन आपल्या जीवनाची परिपूर्णता सुलभतेनें होईल, अशा रीतीनें घालविण्याची इच्छा करीत असतो. या विषयींच्या त्याच्या सर्व प्रकारच्या प्रयत्नांनाच धर्म, तत्वज्ञान, नीतिशास्त्र-वगैरे वगैरे निरनिराळीं स्वरूपें प्राप्त होऊन, त्या सर्वांची मिळून एक संस्कृति बनलेली असते. ह्मणून, जेव्हां, मनुष्य एकाद्या विशेष धर्माचा अथवा संस्कृतीचा अभिमान धरून जगण्यांत कृतार्थता मानतो, तेव्हां, वरील सर्व प्रश्न त्या संस्कृतीनें अथवा धर्मानें समाधानकारक रीतीनें सोडविले आहेत, असें निदान गृहीत तरी धरून तो चालतो. देशांत राहणाऱ्या प्रत्येक मनुष्यास तेथील नियंत्रणाचे कायदे माहीत आहेत, असें कायद्यांत देखील गृहीत धरलेलें असतें. मग प्रत्यक्ष ते त्यानें समजून

घेतलेले असोत, वा नसोत. ती गोष्ट निव्वळ नियंत्रणाच्या सोईकरितां गृहीत धरलेली असते. तिच्यापेक्षां कितीतरी पटीनें आपल्या संस्कृतीनें अथवा धर्मानें हीं कोडीं सोडविलीं आहेत, असें, मनुष्य श्रद्धापूर्वक मानतो. असो; सारांश इतकाच कीं, ज्यांना आह्मीं पुढारी ह्मटलें, ते तर या सर्व गोष्टींचा विचार करतातच; परंतु सामान्य माणसें व्यवहारांत एवढा विचार कोणत्याही गोष्टींत केल्याविना वागतातसे दिसतात, तरी सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां, आह्मी मागें ह्मटल्याप्रमाणें, त्यांना या सर्व विचाराची गरज असते, असेंच आढळून येईल.

अशा प्रकारें मानवी जीवनाला आधारभूत असणाऱ्या ज्या प्रचलित संस्कृति अथवा जे धर्म आहेत, त्यांना अनुसरून मानवी समजुतीचे मुख्य तीन वर्ग पडतात. जास्त विस्तृत विवेचन न करतां थोडक्यांत, त्यांना देव मानणारे, ह्मणजे आस्तिक, देव न मानणारे नास्तिक, आणि यांच्यामधील एक कोटी, ह्मणजे देव मानणारे, परंतु मानवी व्यवहाराच्या पुष्कळ गोष्टींत, देवाचा कांहींच संबंध नसून तेवढ्यापुरता, मनुष्य अथवा जडसृष्टीच प्रमाण मानणारे. देव मानणाऱ्या लोकांची समजूत कशी असते, व ते कसे वागतात, आणि देव न मानणारे नास्तिक कसे वागतात, याचें विवरण ब्रह्मर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या चरित्राच्या उपसंहारांत केलें आहे. त्यांत सांगितल्याप्रमाणें आस्तिकाला त्यांच्या सर्व कृत्यांवर पहारा ठेवणारा कोणी सर्वज्ञ सर्वशक्तिमान असा देव आहे, असें वाटत असतें. त्यामुळें तो भर समाजांत सर्व मानवी मनोवृत्तींचें ओझें घेऊन जरी वागत असला, तरी त्यांत तो एकटाच असतो. बऱ्यावाईट मनोवृत्ती, आणि त्याला अनुकूल असणारें कर्म यांचा कारखाना त्यानें काढलेला असतो. परंतु त्यांत त्यांचें स्वतःचें प्राबल्य असें कांहींच नसतें कारखान्यापासून त्याला कांहींच मिळवावयाचें नसतें त्याला जें कांहीं मिळावयाचें असतें, तें त्याचा मालक जो देव, त्याच्यापासून मिळावयाचें असतें. कारखान्याचें बरें वाईट जें तो पाहतो, तें त्या देवाकरितां, आणि त्या देवाच्या सांगण्याप्रमाणेंच तो तें पाहत असतो. ( प्रत्येक धर्म हा देवाचें सांगणेंच आहे, अशी तो धर्म पाळणाऱ्याची श्रद्धा असते. ) तसें वागत असतांना तो कारखाना बुडूं लागल्यास, स्वाभाविकपणानें, कदाचित् त्यास स्वतःस थोडें वाईट वाटेल, नाहीं असें नाहीं. परंतु मालकाची इतराजी होण्याचें त्याला भय नसतें.

"Their's not to make reply
Their's not to reason why,
Their's but to do and die."*

असा त्याचा शिपाईबाणा असतो. कोणत्याही परिस्थितींत संशय उत्पन्न झाला असतां, हीं माणसें जो मार्ग काढतात, त्याचें उदाहरण देवव्रत भीष्मांचें आहे. याच्या उलटटोकाला ' नास्तिक म्हणजे देव न मानणारा असतो.' आयुष्य अशी त्याच्याजवळ एक वस्तु असते, पण तिचा जाब विचारणारा कोणीच नसतो. त्याला तें कोणी दिलेलेंच नसतें, तेव्हां त्याचा त्याला जबाब तरी कोण विचारणार ? इंद्रियसुखापलीकडे त्याचेपुढें कोणतेंही ध्येय खरोखरीच नसतें. आपलें ध्येय आणि जीवन आपल्याच कर्तृत्वावर अवलंबून आहे, याची जाणीव त्याला पक्की असल्यामुळें, सर्व प्रकारच्या मानवी शक्ति उपयोगांत आणण्याची संवय लागून, त्याची वाढ होते आणि त्याला कोणी पुसणारें नसल्यानें सर्व तऱ्हेच्या तीव्र कोमल मनोवृत्ति अरण्यांतील वेलींप्रमाणें यथेच्छ फोफावून ' पोटा** चा' कां होईना, पण तो एक ठसठशीत जोमदार माणूस तरी बनतो. मनांत आणल्यास भोगवासना तृप्त करण्यापुरता, जोमदारपणानें त्याला उपभोग तरी घेतां येतो. अशा मनुष्याची स्थिति, अर्थातच प्रतिकूल परिस्थितींत, अथवा जेथें संशय पडेल तेथें, पूर्वीच्या उदाहरणांतील, काश्मिरी कमलाराणीसारखी असते. वाटेल त्या परिस्थितीशीं लग्न लावून कृतार्थतेनें नांदण्याची त्याची तयारी असते. उदेपूरच्या उमरावसिंहाचें जें उदाहरण आह्मीं दिलें आहे, तें अर्थातच या दोघांच्या मध्यें असतें. कोणत्याही कारणानें कां होईना, वरील दोहोंपैकीं कोणतें तरी टोंक गांठणें त्याला शक्य नसल्यामुळें, अशा वेळीं कर्तव्याच्या सिंहासनावर परिस्थितीला बसवून तिच्या कपाळीं व्यवहार्यतेचा टिळा लावला कीं मनाच्या टोंचणीतून आपण सुटलों असें त्याला वाटत असतें. या वर्गीकरणाप्रमाणें पाहतां हल्लींच्या परिस्थितींतही विचारप्रवर्तकांचे मुख्य तीन वर्ग होतात. एक वर्ग—प. वा. लक्ष्मणशास्त्री द्रवीडां-प्रमाणें केवळ कट्टर पूर्वाभिमानी. यांची धारणा, देवव्रत भीष्मांप्रमाणें असावयास पाहिजे. याच्या उलट, धर्मशब्दाला अजिबाद फांटा देणारे बोल्शेव्हिकांचे अनु-

---

* मागे पुढें न पाहे न विचारी कां ? कसें ? असें कांहीं ॥
ठावें एक मरावें करिता कर्तव्य; अन्यमति नाहीं ॥ १ ॥ ' स्वच्छंद '

यायी, आणि अनेक प्रकारचे जडवादी आलेल्या परिस्थितींत पूर्णपणें मुरून जावें, मागें पुढें कांहीं नाहीं जेणेंकरून वर्तमानकाळ सुखमय होईल, तें करावें, तेथें साधनांच्या चांगलेवाईटपणाचा प्रश्न नाहीं, ह्मणून वाटेल तें सोडून देण्यास आणि अनुकूल पडेल तें उचलून धरण्यास एका पायावर तयार असणें, हेंच काय तें शहाणपण, या व्यतिरिक्त तें सारें मूर्खपण अथवा, मानसिक दुर्बलता अशी यांची धाटणी असते. जुन्या परिस्थितींतून नवीन मार्ग काढतांना या दोघांनाही फारशी पंचाईत पडत नाहीं. ह्मणून त्यांचा फारसा विचार करण्याचीही गरज नसते. प्रश्न पडतो मधल्या वर्गांतील लोकांचा. कारण, हे लोक देवाविषयीं कांहीं तरी कल्पना मान्य असलेले असतात. परंतु मानवी व्यवहाराच्या पुष्कळ गोष्टींत देवाचा कांहींच संबंध नसून त्यांच्या बाबतींत, मनुष्याची बुद्धि आणि जडसृष्टीच प्रमाण आहे, असें त्यांस वाटत असतें. तेव्हां देव अथवा धर्म यांचें फल त्यांस पाहिजे असतें, परंतु त्याचा मार्ग पूर्वपरंपरेचाच घेतला पाहिजे, असें त्यांस वाटत नसून, त्या तत्वाला सांभाळून आपल्या बुद्धीनें नवीन काढण्याचा, आणि असें करीत असतांना बाह्य परिस्थितीला तुच्छ करून न टाकतां, आपल्या नवीन मार्गास अनुकूल करून घेण्याचा त्यांचा स्वभाव असतो. परिस्थितीच्या मुशींत धर्माची आटणी करून चालू व्यवहारास उपयोगी पडेल, असें नाणें पाडण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. आणि ह्मणूनच पुनर्घटना वगैरे भाषा संभवते. एरवीं कट्टर नास्तिक आणि कट्टर आस्तिक यांच्या बाबतींत पुनर्घटना वगैरे शद्बच संभवत नाहींत. एकाच्या दृष्टीनें घटनाच नसते, व दुसऱ्याची घटना पालटण्यास तो स्वतंत्र नसतो. असो.

अशा रीतीनें पुढारी आणि अनुयायी या प्रामाणिक वर्गांतल्या लोकांचे वर सांगितल्याप्रमाणेंच तीन प्रकारच्या श्रद्धांनीं तीन भेद होतात. आह्मीं वर वापरलेल्या प्रामाणिकपणाच्या अर्थानें या दोनही वर्गांतले लोक कोणत्याही काळीं समाजांत अगदीं थोडेच असतात, आणि मधला जो अप्रामाणिक लोकांचा वर्ग सांगितला, तोच समाजांत प्रचंड असतो. असें जरी आहे तरी त्या प्रचंड वर्गाशींच यांचें काम पडतें. वनस्पती ज्याप्रमाणें खतांतूनच आपल्या पोषणास आवश्यक असलेलीं द्रव्यें वेगळीं काढून स्वतःचें अस्तित्व टिकवते, त्याप्रमाणें या पुढाऱ्यांच्या संप्रदायाचें अस्तित्व टिकण्यास अनुकूल असलेलें द्रव्य याच वर्गांतून त्यांस मिळत असतें. हे लोक स्वतः अप्रामाणिक असल्यामुळें त्यांच्या जीवनांत विचार आणि

कृति यांचा मेळ वस्तुतः नसतो; क्वचित् तो असल्यासारखा दिसेल अथवा दिसणार नाहीं. महानदीच्या विस्तीर्ण पात्रांत वाहणारा प्रवाह जसा इच्छेप्रमाणें केव्हां या तीरास, तर केव्हां त्या तीरास लपेटून असतो त्याप्रमाणें यांचीही तऱ्हा असते; ह्मणजे, दुर्बळपणानें असो, अथवा लबाडीनें असो, हे केव्हां आपल्या सोईप्रमाणें अनुयायित्वाचें तर केव्हां पुढारीपणाचेंही ढोंग आणतात. प्रायः पुढारीपणाच्या सदरांतच या वर्गांतील फार लोक मोडतात. कारण यांच्या अंगीं पुढाऱ्यांस अवश्य असलेले कर्तृत्व व गुण पुष्कळच प्रमाणांत असतात. फरक एवढाच असतो कीं पुढाऱ्याचे गुण आणि कर्तृत्व, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, त्याचा अंगभूत स्वभाव असतो, आणि त्यांचें अधिष्ठान कसल्यातरी प्रामाणिक श्रद्धेंत असतें. आणि यांच्या गुणकर्तृत्वास कांहीं तरी कमी प्रतीच्या दुसऱ्याच हेतूचें अधिष्ठान असतें. त्यामुळें यांची कास धरून जाणाऱ्या लोकांची गति, ह्मशीच्या पाठीवर बसून नदी उतरून जाणाऱ्यां इतकीच शाश्वत असते. कारण, या लोकांच्या सर्वच गोष्टींत मेळ नसल्यामुळें जें त्यांच्या जवळून मिळेल असा भास होतो, तें मिळेलच असा नेम नसतो, आणि स्वतः त्यांच्या गुणकर्तृत्वाचें पर्यवसान कशामध्यें आहे, याचीही खात्री नसते. सुप्रसिद्ध आंग्ललेखिका मेरी कोरेली इच्या ( Temporal Power या ) सुंदर कादंबरींत ही गोष्ट मोठ्या मनोहर तऱ्हेनें मांडून दाखविली आहे. त्या कादंबरींतील दांडग्या गुणकर्तृत्वाचा पुढारी सर्जेस् ग्रॉर्ड याच्या प्रयत्नांनीं लोकांचा जरी पुष्कळ फायदा झाला असें प्रथमतः दिसतें, तरी त्याच्या त्या पराक्रमाचा उगम अंगस्वभावांतून नसल्यामुळें त्याचें अधिष्ठान जें लोटिसच्या प्रेमाच्या प्राप्तीची आशा, तें नाहींसें झाल्याबरोबर त्याचा सारा पराक्रम ढांसळून गेला, आणि त्याच्या गुणकर्तृत्वाची माती होऊन, तो एक सामान्य खुनी बनला. कादंबरीचा वर्ण्य विषय भिन्न असल्यामुळें त्याच्या पंथाच्या लोकांचें पुढें काय झालें, याच्या वर्णनाची गरज नव्हती. परंतु तो पाण्यांतील गारेप्रमाणें विरून गेला हें उघडच आहे. आतां, असे लोक ह्मणजे सारे दुष्ट, अथवा वाईट असतात, असें नाहीं; त्यांची स्वतःचीच पुष्कळ वेळां फसवणूक झालेली असते. त्याचप्रमाणें कादंबरींतील पात्रांचा जो शोचनीय प्रकार झाला, तसा बाह्य जगांत होतोच असें नाहीं. सांगावयाची गोष्ट एवढीच आहे कीं, लबाडीनें असो, स्वतः फसल्यामुळें असो, अथवा दुर्बळपणामुळें असो ह्यांच्या ठिकाणीं जो मिथ्याचार उत्पन्न झालेला असतो, आणि तो जसा सूक्ष्म निरीक्षणाखेरीज लक्षांत येत नाहीं, तशीच त्यांच्या मतांचीही गोष्ट असते. तशाच

प्रकारचा मिथ्याचार त्यांच्यांतही असण्याचा संभव असतो. त्यामुळें सामान्यतः माणूस दिपून जाण्याचा व फसून जाण्याचा संभव असतो; ह्मणून कोणाचींही मतें अथवा विचार, केवळ तो पुढारी आहे, अथवा विद्वान आहे, किंवा अमुक गुण-कर्तृत्वाचा दिसतो, एवढ्यावरच न जातां, वर सांगितल्याप्रमाणें तीं मतें आमूलाग्र संशोधन करून बनलेलीं आहेत किंवा नाहीं, याचा निर्णय केल्याखेरीज, मान्य करणें शहाणपणाचें होणार नाहीं. केवळ त्या माणसाच्या अंतःकरणांत आपल्या सुखाविषयीं खरी कळकळ आहे, व तो आपल्या करतां वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार आहे, एवढें प्रमाणही पुरें नाहीं. कळकळ किंवा स्वार्थत्याग ही गोष्ट वेगळी, आणि ज्ञान ही गोष्ट वेगळी. कळकळ असली ह्मणजे त्याविषयीच्या ज्ञानाची पात्रता असतेच असें नाहीं. आईच्या अंतःकरणाइतकी मुलाच्या हिताची कळकळ, आणि स्वार्थ-त्यागाची तयारी दुसऱ्या कोठें सांपडणार आहे ? परंतु तो मुलगा आजारी पडला कीं त्या आईला स्वतःसच एखाद्या भाडोत्री वैद्याची कास धरावी लागते. तिला कळकळ आहे ह्मणून तिच्यावरच जर विसंबून राहिलें, आणि ती आपलीच बुद्धि चालवूं लागली, तर मुलाच्या जगण्याची फारशी आशा धरावयास नको.

या विषयाचा विस्तारपूर्वक एवढा प्रपंच करण्याचें कारण इतकेंच कीं हल्लींच्या सारख्या अनवस्थेच्या काळांत कोणी कोणास पुसेनासा होऊन मतामतांचा एकच गलबला होऊन जातो, वाटेल त्यानें उठून पांडित्याच्या, लोकप्रियतेच्या, सामाजिक दर्जाच्या अथवा असल्याच कांहीं तरी प्रकारच्या जोरावर विषय प्रतिपादन करावें, आणि साराच उथळपणा असल्यामुळें, त्याची मान्यता होऊन वाहवा व्हावी, असें होतें. यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र इत्यादि प्रत्यक्ष प्रयोगाच्या आणि तत्काल सिद्ध होणाऱ्या ज्ञानासंबधीं मनुष्याची पात्रता ओळखण्याची पुष्कळ साधनें असतात परंतु मानवी जीवनाशीं संबंध असलेलीं हीं अनेक प्रकारचीं कोडीं सोडविण्यास ज्या प्रकारचा व्यासंग, कळकळ निर्मळ बुद्धि, सूक्ष्म अवलोकन आणि दीर्घकालीन अनुभव लागतात, त्यांचें कांहीं माप नसल्यामुळें लेखकाची अथवा वक्त्याची पात्रता अनुमानण्यास कांहींच साधन नसतें. अशा वेळेला केलेलें प्रतिपादन अनेक प्रकारांनीं जरी डोलविणारें असलें, तरी तें यथार्थच असेल, असें नाहीं. संसारसुखाचा जिला वाराही लागलेला नसतो, प्रत्यक्ष जगाचा काडीइतकाही संबंध नसतो, संसाराच्या चक्रांतच अनेक अवस्थांचा अनुभव येऊन, हीं कोडीं सुटण्याची कशी गरज भासत असते, व तीं स्वतःपुरतीं तरी कशीं सुटलीं जातात, याची जिला यत्किंचितही

कल्पना नसते, अशी ठराविक लोकांच्या आणि ठराविक पुस्तकांच्या सहवासांत Maiden meditation, fancy free ( अल्लड कल्पना आणि गोड मनोराज्यें ! ) अशा रीतीनें वाढलेली एखादी वीस बावीस वर्षांची कोवळी पोर, बी. ए. च्या नाहीं तर एम्. ए. च्या डिग्रीबरोबरच वरील सर्व गोष्टींचें गुमदान पदरांत घेऊन, जेव्हां पोक्तपणाचा आव घालून 'विवाहसंस्थे'सारख्या गंभीर आणि बिकट विषयावर, ऐटदारपणानें बोलूं लागते, अथवा लिहूं लागते, तेव्हां क्षणभर विचारी मनुष्य थक्क होऊन जातो. 'ओठाच्या वरचाहि जार अजुनी नाहीं तुझ्या वाळला '–अशा प्रकारचीं अल्लड मुलें नानाप्रकारचीं सामाजिक, धार्मिक, वगैरे प्रकरणें भडाभड निकालांत काढतात, तेव्हां तर फारच मौज वाटते. जन्मभर दुसरा व्यवसाय करून अंगस्वभावानें कुत्र्याप्रमाणें ह्या त्या विषयांत हुंगून जेव्हां पूर्वी सांगितलेले प्रश्न सोडविण्याकरितां आधुनिक विचारप्रवर्तक उभा राहतो, तेव्हां एकंदर देशस्थितीची कींव येते. राजकारणाचा ओनामा ही ज्यास माहीत नाहीं, तो आपल्या राजकारणानें शंभर वर्षें साऱ्या जगाला झुलविणाऱ्या ब्रिटिश सरकारला राजकारणाचे धडे देऊं लागतो, आणि बंदुकांच्या जाती किती आहेत, हें देखील ज्यास ठाऊक नसतें, तो युद्धमंत्री होऊन युद्धशास्त्राची भाषा बोलूं लागतो. अशा वेळीं, त्यांचे विचार ग्रहण करतांना पात्रता ह्मणून कांहीं एक महत्वाची बाब आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे, अशी सूचना समाजास देण्याकरितां एवढें विवेचन केलें. आह्मीं केलेल्या वर्गीकरणाप्रमाणें, मनुष्य प्रामाणिक असल्यास, आपला कोणता वर्ग, हें त्यानें पारखून ठेवलें पाहिजे; आणि जर ते अनुयायी असतील तर, आपला पुढारी पूर्वी सांगितल्याप्रमाणें कार्यक्षम आहे किंवा नाहीं, तसेंच, त्यानें आपले सिद्धांत आमूलाग्र विचार करून ठरविले आहेत किंवा नाहीं, हेंही त्यांनीं पारखून ठेवलें पाहिजे. चातुर्वर्ण्य, जातिभेद, भक्ष्यविचार, विवाह संस्था, स्त्रीजातीचा प्रश्न असले गहन विषय केवळ आपल्या कल्पनेप्रमाणें,–हा केवळ सामाजिक प्रश्न आहे, हा आरोग्यशास्त्राचा प्रश्न आहे, हें भावनाशास्त्र आहे,–अशा तऱ्हेच्या विल्हेवारीनें सोडविले जातात, तेव्हां त्यांचें परीक्षण विचारी माणसांनीं कोणत्या दृष्टीनें केलें पाहिजे, तें दर्शित करण्याचा या प्रपंचाचा उद्देश आहे. उदाहरणार्थ आपण धर्म हा विषय घेऊं.

पृथ्वीच्या पाठीवरील कोणताही धर्म घेतला, तरी त्याची स्थिति, दोन तीरें सांधणाऱ्या पुलासारखी असते. सर्व धर्मांचें सूक्ष्म अध्ययन केलें, तर, तत्वतः

त्यांच्यांत कितीही भेद असले तरी, त्यांचें स्वरूप एकच आहे. सामन्यतः, नीतिमान् मनुष्याला धार्मिक समजण्याचा प्रघात आहे. चांगली शाहणीं माणसेंही असें ह्मणतांना आढळतात कीं, नीतिमान् होऊन नेटानें आयुष्य काढलें, ह्मणजे झालें. धर्म तो आणखी काय? या समजुतींत थोडा खरेपणाही आहे, परंतु ती सर्वांशीं खरी नाहीं. कामावर पाठविलेला मनुष्य जसा दूर जाऊन हुकुमाप्रमाणें काम बजावून आला, कीं एक दिवस आपण त्यास बक्षीस देतों, त्याप्रमाणें, मनुष्य हा काम करण्याकरितां आलेला आहे, काम बजावून देवापाशीं गेला, ह्मणजे त्याचें बक्षीस त्याला मिळेल, अशा श्रद्धेस धरून ही विचारसरणी आहे. व तेवढ्यांपुरतें त्यांत थोडें तत्थ्यही आहे. परंतु तें सर्वांशीं खरें नाहीं. तसें असतें तर, आमच्या इकडच्या विचित्रसंस्कारमय धर्मांची गोष्ट सोडा, पण यहुदी, खिस्ती, महमदी वगैरे साधारण वरच्यासारखी कल्पना असणाऱ्या धर्मांसही सामाजीक नीतिनियमांखेरीज नित्य करावयाच्या प्रार्थना, उपासतापास, ध्यानधारणा, जपजाप्य, व अनेक प्रकारचे विधिनिषेध सांगण्याची कांहींच गरज नव्हती. परंतु ज्याअर्थी अशा तऱ्हेचीं प्रकरणें कोणत्याही धर्मांत आहेतच, त्याअर्थी त्यांना कांहीं हेतुही असलाच पाहिजे. वस्तुस्थिति अशी आहे; साधारणतः नीतिशास्त्राच्या पूर्णतेपासूनच धर्माचा प्रारंभ होतो. अनीतिमान् मनुष्य खरा धर्माच्या कक्षेंतच नसतो. प्रत्येक धर्माचें कांहीं एक अंतिम असतें, व त्याला धरून त्यांतील तत्वज्ञानाची मांडणी असते. हें अंतिम तत्व आणि नीतिमान् मनुष्य यांच्यामध्यें कोणत्याही कारणानें उत्पन्न झालेल्या दूरतेला सांधणाऱ्या यत्नशास्त्राचा पूल, ह्मणजे 'धर्म.' नीतिमान् मनुष्य अवंचकतेनें कर्तव्य करीत असतांना इष्टानिष्टाविषयीं त्याच्याठिकाणीं एक प्रकारची तितिक्षा उत्पन्न होते, आणि हा आयुष्यरूपी प्रवास करीत असतां कर्तव्यतत्परते-मुळें त्याच्या चित्ताला नानाप्रकारच्या प्रतिकूल परिस्थितींतही अतिशय समाधान असतें. अशा प्रकारचें समाधान असलें, ह्मणजे धर्माचरणानें जें मिळवावयाचें तें मिळालें, असेंही पुष्कळवेळां समजलें जातें. * अशा मनुष्याच्या अंतःकरणांत हें जें

---

* महात्मा गांधी यांचा गीतेचा अनुवाद वाचलां असतां ही गोष्ट उत्तम तऱ्हेनें लक्षांत येईल. एकदा ११ व्या अध्यायालाच कल्पित काव्यांत काढिलें ह्मणजे जेथें कोठें गीतेंत अतींद्रियता, अपार्थिवता इत्यादिकांचा व तन्मूलक शास्त्रांचा संदर्भ आलेला आहे तेथें अनुवादकांची स्थिति विचित्र होणें साहजीकच आहे.

समाधान असतें तेंच वस्तुतः प्राप्तव्य नसून वर सांगितल्याप्रमाणें 'धर्म' नांवाच्या यत्नशास्त्रानें कांहींतरी जास्त * संपादावयाचें असतें. असें समाधान ही फार झाली तर त्या मार्गावरील सुखमयता ह्मणतां येईल. परंतु रस्त्यांत येणारे प्रत्यक्ष अनुभव आणि त्याचें अंतिमस्थळ हीं केव्हांही त्याहून भिन्नच असणार. नाहींतर वर सांगितलेंच आहे कीं ध्यानधारणा व तपस्या इत्यादिकांची धर्मशास्त्रास कांहींच गरज वाटली नसती. ह्मणजे त्या सर्व यत्नशास्त्रांच्या मुळाशीं परलोक, मनुष्याचें या देहापलीकडील अस्तित्व, इहलोक आणि परलोक यांचे परस्पर संबंध, या सर्वांस नियंत्रित करणारी कोणितरी एक प्रचंड शक्ति, आणि मनुष्य जीवाचें संकुचित मनुष्यपण जाऊन, त्याचे निरनिराळ्या धर्ममतांप्रमाणें कमी अधिक, परंतु अतिमानुषत्व, दिव्यत्व, शक्तिमत्व आणि सुख यांत होणारे प्रत्यक्ष रूपांतर हे जे सिद्धांत असतात, त्यांची प्रत्यक्षता, हीच त्या धर्मशास्त्रांची कमाई आहे.

अलिकडील काळांत लोकमान्यांचें गीतारहस्य वाचून, आणि त्यांचें प्रत्यक्ष उदाहरण पाहून पुष्कळांस असा भ्रम उत्पन्न झाला आहे कीं, गीतारहस्यांत प्रतिपादलेला कर्मयोग आचरिला असतां, वर सांगितलेल्या कर्तव्यनिष्ठेपासून मनुष्यास जें समाधान मिळतें, व इष्टानिष्टाविषयीं जें समत्व प्राप्त होतें तेंच साऱ्या धर्माचें प्राप्तव्य आहे. याचा अर्थ असा कीं, धर्माचें अंतिम फळ मिळविण्यास धार्मिक यत्नशास्त्राचीच गरज आहे, असें नाहीं. जगांत वाटेल तसें वागावें, आणि गीतारहस्यांत सांगितलेल्या कर्मयोगाप्रमाणें मनाची धारणा ठेवावी, ह्मणजे सारी कमाई पदरांत पडते. आपणांस गीतारहस्यांतील चकाराच्या वादाशीं § व टिळकांच्या आचार्य विरोधाशीं कांहीं एक करावयाचें नाहीं. परंतु एवढेंच सांगावयाचें आहे

---

यादृष्टीनें त्यांचा सारा अनुवादच कींव करण्याजोगा झाला आहे. अनुवाद कितीही बाळबोध असला तरी त्यांत यथार्थता हवीच!

* साधनपादांत यमनियमांचीं फळें सांगतांना पतंजलींनीं 'अपरिग्रह स्थैर्ये जन्मकथंता संबोधः' असें सांगितलें आहे. तें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. नुसतें चित्ताचें गोड गोड समाधान ह्मटलें नाहीं. यावरील भाष्य असें आहेः— 'कोऽहमासं कथमहमासं किंस्विदिदं कथंस्विदिदं के वा भविष्यामः कथं वा भविष्यामः इत्येवमस्य पूर्वांतपरांतमध्येष्वात्मभावजिज्ञासा स्वरूपेणोपावर्तते'

§ या 'च' काराच्या वादासंबंधीं खुद्द लोकमान्यांचें व आमचें पुष्कळ

कीं, वरील समजूत बाळगणारे लोक दोन गोष्टी विसरतात. एक गोष्ट अशी कीं गीतारहस्याप्रमाणें पाहिलें तर, मुळीं गीतेचा प्रारंभच ब्रह्मज्ञानानंतर ह्मणजे मुक्तदशे-नंतरचा आहे. तेव्हां, गीतारहस्यांतील कर्मयोगानें कांहीं मिळवावयाचेंच नसतें. जें

---

बोलणें झालें होतें. सामान्यतः सर्वांची वादाची अशी पद्धत होती कीं जेथें कोठें आचार्य चुकले असा भाव रहस्यकारांचा आहे तेथें तसें नाहीं असें दाखवावें; अगर एकंदर वेदांतसिद्धांताशी लोकमान्यांचें ह्मणणें जमत नाहीं असें ह्मणावें. लोक-मान्यांनीं या सर्व गोष्टी लक्ष्यांत ठेऊनच आपला सिद्धांत मांडण्याची खबरदारी घेतली असल्यानें या पद्धतीनें वाद मिटणें शक्य नव्हतें. मी थोडी वेगळी पद्धती अंगीकारिली. आचार्यांस थोडें दूर ठेविलें व लोकमान्यांचा 'च' काराचा आग्रह व तोही आत्मज्ञानोत्तर, हें प्रमाण मानूनच गीता सरळ लावूं लागलों तों कांहीं शंका अशा आल्या कीं त्यांचा निर्वाह कांही केल्या करितांच येईना. ह्मणून श्रीअण्णासाहेब यांचे चिरंजीव रा. बाबासाहेब पटवर्धन यांना बरोबर घेऊन लोक-मान्यांना भेटलों. त्यांचा थोडा परिचय होताच. त्यांनाच शंका विचारल्या. त्यावर त्यांचें व आमचें जें बोलणें झालें तें खाजगी असल्यानें येथें देण्यांत अर्थ नाहीं. तेथल्या तेथें त्यांना शंकांचें समाधान करितां आलें नाहीं व पुढें होमरूल लीग, चिरोल केस वगैरे अनेक कारणांनीं पुनः तसा योगच आला नाहीं ही खेदाची गोष्ट आहे. तसा आला असता तर कदाचित त्यांनीं केलेंही असतें. त्यांतील मुख्य ४।५ शंका खालीं देतो. त्यानंतर गीतारहस्याचा अभ्यास करून झाला असल्यानें एखाद्या विद्वानाकडून समाधान होण्याचा संभव आहे. आह्मांस सरळ उत्तर पाहिजे आहे. वकीली नको.

**शंका १ लीः**—पूर्ण प्रमाणबद्ध असलेल्या ईशसृष्टींत सांख्य व कर्म असें दोन विषम मार्ग उत्पन्नच कां झाले? त्यांत कांहीं तत्व आहे कीं ती केवळ देवाची सुलतानी लहर आहे ?

**शंका २ रीः**—लहर ह्मटली तर ती शास्त्राचा विषय होऊं शकत नाहीं. शास्त्री-यता ह्मटली तर मग ते मार्ग स्वीकारण्याविषयीं माणसाची लहर प्रमाण असूं शकणार नाहीं. त्या मूळ शास्त्रीयतेस धरूनच ते मार्ग स्वीकारण्याचेंही शास्त्र असणार नाहीं काय ?

**शंका ३ रीः**—देवाला जर लोकसंग्रहाचें येवढें महत्व होतें तर इतर रीतीनें

मिळवावयाचें, तें पदरांत पाडून घेऊनच, मग तें कोणत्याही कां रीतीनें असेना

त्यानें केवढेंही वेगळाले मार्ग अनेक काढिलें तरी त्या प्रत्येकांत लोकसंग्रह महात्मा गांधीच्या चरक्याप्रमाणें यावयास नको होता कां ? त्यांनींच उत्पन्न केलेल्या दोन निष्ठांपैकीं एकींत त्यानें लोकसंग्रहाला फांटा कसा दिला ? लोकसंग्रह हेंच तत्त्व ठेऊन काय त्याला वेगळे वेगळे मार्ग काढतां आलें नसते ? निष्ठा त्यानेंच केल्या हें तर ' पुरा प्रोक्ता मयानघ ' यांतील ' पुरा ' शद्वावरून उघड आहे. दोन मिनिटांपूर्वी सांगितलेल्या गोष्टींना कोणी ' पुरा ' असें ह्मणत नाहीं. ' पुरा ' शद्वाच्या या प्राचीनत्व' बोधकतेवर लोकमान्यांनीं आपल्या ' उत्तर ध्रुवनिवासां ' त बराच भर दिला आहे.

**शंका ४ थीः**—मानवी जीविताचें अंतीम पर्यवसान जें मोक्ष तें तर दोनही निष्ठावानांस सारखेंच आहे. एखादा धट्ट जर ह्मणूं लागला कीं ' नको तुमचा लोकसंग्रह ! मी आपला संन्यास मार्गानेंच जाणार' तर त्यालाही मोक्ष मिळणारच. देव त्याचें कांहीं वांकडें करूं शक्त नाहीं. मग तिसऱ्या अध्यायांत जें देवानें ह्मटलें आहे कीं

ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस्तां विद्धिनष्टानचेतसः ॥३२॥

हें काय बोटें मोडणाऱ्या ह्मातारीच्या तळ्तळाटाप्रमाणें व्यर्थ आहे?

**शंका ५ वीः**—चौदाव्या अध्यायांत,

' प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥

ह्मणजे सत्त्व, रज व तम हे तीन गुण अथवा त्यांचीं कार्यें उपस्थित झालीं असतां नको ह्मणतां नाहींत व निवृत्त झाली असतां त्यांची कांक्षा करीत नाहींत असें ह्मटलें आहे. लोकमान्यांचा 'च'काराचा आग्रह घ्यावयाचा ह्मणजे एकाद्याचा 'रज' व त्याचें कार्य जें 'कर्म' हीं निवृत्ति झालीं तरी त्यांची त्यानें कांक्षा केलीच पाहिजे. कारण 'रज' जर प्रवृत्त नसेल तर कर्मच कसें

गीतारहस्याचा कर्मवीर कर्मयोगाचें आचरण करावयास उभा राहिलेला असतो. दुसरी अशी कीं मनाच्या विशिष्ट धारणेनेंच निर्वाणाची शांति जर मिळवावयाची असेल, तर त्या धारणेचा अभ्यास तरी इतका जबरदस्त केला पाहिजे कीं, धर्मशास्त्रांतील इतर यत्नांनीं मिळणाऱ्या ब्रह्मस्थितीचा प्रत्यक्ष अनुभव आला पाहिजे. आणि ही गोष्ट तर सर्वांत अतिशय कठीण आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ह्मटल्याप्रमाणें 'तहानेची तहान पियावी' अशा तऱ्हेचा हा मार्ग ह्मणजे 'भातारेवीण नित्य नवा अस्रिंगू'च आहे. सारांश इतकाच कीं कोणत्याही धर्मास मान्य असलेल्या वरील परलोक वगैरे कल्पना मान्य असल्याखेरीज त्या धर्मांतील कोणत्याही गोष्टीविषयीं त्या धर्माचा मनुष्य ह्मणून बोलण्याचा कोणासही अधिकार नाहीं. मग त्या धर्मांत सुधारणा सांगण्याची गोष्ट तर दूरच राहिली. ज्याचा त्या गोष्टीवर विश्वास नाहीं, तो बाह्यतः त्या धर्माचीं बंधनें जरी पाळीत असला व त्या धर्माप्रमाणें आचारही ठेवीत असला, तरी खरोखर तो त्या धर्माचा माणूसच नव्हे. तो त्याचा निव्वळ मिथ्याचारच होय. त्यानें पाहिजे तर त्या साऱ्या धर्मासच उडवून द्यावें, परंतु त्यांत सुधारणा सांगण्याचा आव घालूं नये. या सर्व गोष्टी चित्तांत वागवूनच विचारप्रवर्तकानें आपल्या भूमीवर उभें रहावें, व ते विचार घेणारांनीं या सर्व गोष्टींच्या धोरणानें त्यांचें परीक्षण करून मग त्यांचें अनुयायित्व पत्करावें. असें न झाल्यास मतामतांचा कितीही गलबला झाला तरी जोमदार मनुष्यजाति उत्पन्न होत नाहीं; असतु.

अशा रीतीनें प्रामाणिक विचारप्रवर्तक आपलें मत ठरवावयास बसला ह्मणजे त्याच्यापुढें जो प्रश्न उत्पन्न होतो, व ज्याच्यामुळें, इतका सर्व प्रामाणिकपणा असूनही भिन्न भिन्न मतें उत्पन्न होणें टळत नाहीं, त्याचा आतां विचार करूं. कोणत्याही गोष्टीसंबंधानें सिद्धांत ठरवावयाचा ह्मणजे, तो प्रत्यक्ष, आप्त, आणि अनुमान यांतील कोणत्यातरी, अथवा या तीनही प्रमाणांच्या साह्यानेंच ठरवावा लागतो. धर्मसंबंधीं विवाद उत्पन्न झाला असतां, प्रत्यक्ष प्रमाणांनीं त्याचा निकाल

---

घडेल? 'कर्म केलेंच पाहिजें' ह्मणजे 'रज' प्रवृत्त व्हावा, निवृत्त होऊं नयें अशी कांक्षा केलीच पाहिजे. आणि भगवान तर ह्मणतात 'न निवृत्तानि कांक्षति।' तेव्हां हें कसें?
अशा अनेक शंका आहेत. पण त्याला स्वतंत्र लेखच लिहावा लागेल?

लागलेला इतिहासांत आपण ऐकतो. परंतु मनुष्यजातींत देखील, धर्मांतील गोष्टींची प्रत्यक्षता करून दाखविणाऱ्या परिपूर्ण विभूति ' यततामपि सिद्धानां कश्चित् ' इतक्याच असल्यामुळे, प्रत्यक्षतेच्या योगानें धर्मशास्त्रांतील, वाद मिटणें ही गोष्ट मत्स्ययंत्र भेदासारखी क्वचितच आहे. ह्मणून आप्त आणि अनुमान या दोन साक्षीदारांवरच सारी भिस्त ठेवावी लागते. परंतु त्यांत एवढेंच आहे कीं, अर्वाचीन आधिभौतिक शास्त्रज्ञांप्रमाणें प्रत्यक्ष प्रयोगानेंच पुढें पाऊल टाकण्याचा जर कोणी बाणा बाळगीत 'असतील, व दर वेळेस त्या नारायणास्त्रानें प्रतिपक्ष्यास नमविण्याची युक्ति करीत असतील, तर तशा प्रकारची प्रत्यक्ष प्रयोगानें तोंड वासण्याची जबाबदारी त्यांच्यावरही राहते, हें त्यानीं व इतरांनींही लक्षांत ठेवलें पाहिजे. प्रत्यक्ष प्रयोग ह्मटला ह्मणजे तेथें विचाराला जुळत नाहीं, बुद्धीला पटत नाहीं, असल्या तऱ्हेची भानगड नाहीं. अशा तऱ्हेच्या प्रत्यक्ष प्रयोग करण्याच्या सोयी धर्मशास्त्रांत आहेत, एवढेंच येथें सांगून ठेवावयाचें आहे. कारण हा एक स्वतंत्र विषय असल्यामुळे, आणि तोही पुन्हा वादग्रस्त असल्यामुळे, त्यावर लिहूं ह्मटलें तर, तोच एक स्वतंत्र ग्रंथ होऊन पांचशें पानेंही पुरणार नाहींत. तरी पण थोडें विषयांतर करून त्याविषयीं एक सूचना देऊन ठेवतों. ईश्वरी इच्छेनें योगायोग आल्यास कदाचित् त्याविषयीं स्वतंत्र ग्रंथही होईल.

प्रत्यक्षप्रयोगाची गोष्ट निघाली, कीं, या शास्त्रजिज्ञासूंचें गाडें धर्माच्या प्रांतांत श्रद्धेच्या बुजगावण्यापुढेंच अडून पडतें. कोणताही धर्म घ्या; त्यांतील एखादा अनुभव मिळविण्यास यत्न करावयाचा ह्मटला ह्मणजे, त्याची पहिली अट अशी असते कीं, जो श्रद्धापूर्वक हें अनुष्ठान करील, त्यासच त्याचें फल मिळेल, प्रथमग्रासांतच एवढा मक्षिकापात झाल्यावर या डिस्पेप्शियाच्या काळांतील माणसांना पुढच्या घासाकडे हात तरी नेववेल कसा? ही अडचण आहेच खरी जबरदस्त आधिभौतिक शास्त्राचा प्रयोग सिद्ध करीत असतांना ज्याप्रमाणें श्रद्धेची कांहींच गरज लागत नाहीं, क्रियायोगाचें केवळ तंत्र सांभाळलें कीं पुरें. श्रद्धेचिद्धेचें कांहीं लचांड नाहीं. प्रयोग करीत असतांना करणाऱ्याच्या मनांत त्या यंत्राचे तुकडे करून लाथेनें तुडवून टाकावे, असा जरी तिटकारा असला, तरी बिनचुक प्रयोग केल्यास, इष्ट फल पदरांत पडत नाहीं, असें होत नाहीं. फक्त, प्रयोग संपूर्ण होईपर्यंत लागणारी चिकाटी मात्र पाहिजे असते. इतका सरळ मामला या लोकांस पाहिजे असतो. आणि तेही बरोबर आहे. कारण श्रद्धा हा अंतःकरणाचा विषय असल्यामुळे प्रेम

वगैरे इतर वृत्तींप्रमाणें तो स्वयंभूच लागतो. शिकून अंगीं आणलेला अखेरीस कामास पडत नाहीं. ' सकळ कळा शिकों येती । प्रेम नाहीं कवणा हाती ' असें श्रीतुकाराम महाराजांनीं ह्मटलें आहे, तेंच श्रद्धेसही लागू आहे. परंतु विस्तार न करतांना सुचवावयाचें आहे, तें इतकेंच कीं, अशा लोकांकरितांही इकडील आत्मविद्याशास्त्रांत सोय आहे, तिचा विचार न करतां, त्यांनीं स्वतःस संशोधक ह्मणून घेणें, योग्य होणार नाहीं. योगशास्त्राच्या मूलतत्वांचे दिग्दर्शन करणारे भगवान् पतंजलि यांनीं तर ' ईश्वरप्रणिधाना 'लाच विकल्पांत काढून त्याच्याशिवायही प्रयत्नपूर्वक हे अनुभव कसे घेतां येतात, तें दाखविण्याकरितांच आपलीं सूत्रें रचिलीं आहेत. त्यांच्या सूत्रांत श्रद्धा हा शब्द जवळ जवळ ' चिकाटी ' या अर्थानेंच वापरला आहे, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. बौद्धासारख्या निरीश्वरवादी लोकांसही या अतिमानुष अस्तित्वाची खात्री होती, आणि त्याचा उपयोग साधनमार्गांत करून घेण्याकरितां त्यांनीं सांगितलेलीं सारीं ध्यानें आणि साधनक्रम यांतही श्रद्धेचा अर्थ जवळ जवळ ' चिकाटी ' असाच आहे. तेव्हां या विषयावर तोंड उघडून ठाम मतें सांगणाऱ्या लोकांवर पतंजलींच्या मताप्रमाणें, निदान संयमापर्यंत तरी प्रयत्न करून मग त्याविषयीं निर्णय करण्याची जबाबदारी आहे. तसें ते न करतील तर त्यांच्याकडे पाहून एखाद्यास ' उगाच भुंकोन गेलें । श्वान जैसें ' या श्रीसमर्थांच्या समर्थ शब्दांची आठवण झाली तर त्यांत त्याचा काय दोष?

या प्रत्यक्षाविषयीं आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अर्वाचीन शास्त्राचा एखादा विषय निघाल्यास कोणातरी मोठ्या पदवीधराचा अथवा शास्त्रज्ञाचा आधार आह्मांस पुरतो, व त्याच्या साहाय्यानें आह्मीं आमचीं मतें खुशाल बनवितों. याचें कारण इतकेंच आहे कीं, तशा तऱ्हेचे प्रयोग करणारे जगभर पुष्कळ असल्यामुळें त्यांचें ह्मणणें तावून सुलाखून निघालेलें आहे, असें आह्मांस वाटतें. परंतु त्या शास्त्रांचा इतिहास पाहिला असतां अशी तावून सुलाखून निघालेलीं मतें कांहीं कालानंतर निव्वळ वेडगळ कशीं ठरतात हें सहज लक्षांत येईल. असें असूनही आह्मीं चालू काळापुरतीं तीं मतें प्रमाण मानूनच संशोधन करतों ह्मणूनच शास्त्राचा विकास होतो. इतर कोणत्याही एका गोष्टीविषयीं एखादा पंडित पाश्चात्यविद्याप्रवीण असला ह्मणजे प्रमाणभूत होण्यास अडचण पडत नाहीं. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही आहे कीं ज्यांनीं पाश्चात्य विद्येंतले उत्तम प्राविण्य संपादून आत्मविद्या, योग, वगैरे शास्त्रांचें, आपलीं आयुष्यें त्यांत घालून, सप्रयोग ज्ञान संपादन केलें,

अशा ब्रह्मर्षि अण्णासाहेब पटवर्धन, बाबू अरविंद घोष, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ, बाबा भारती, इत्यादि विद्वानांचें, वरील गोष्टी त्यांना ' प्रत्यक्ष ' झाल्याचें जोमदार सांगणेंही, प्रयोग करण्यास लागण्यापुरतेंही, आप्तवाक्य ह्मणून आह्मांस उपयोगी पडत नाहीं. या लोकांचीं चारित्र्यें व सर्व प्रकारची योग्यता पाहूनही, त्यांच्या ह्मणण्यांत कांहीं तत्थ्य असेल, असें आह्मांस वाटत नाहीं; मग त्यांच्या प्रमाणें, स्वतःचें आयुष्य त्यांत खर्चून, स्वतः प्रयोग करून पाहण्याची बुद्धि होणें तर लांबच राहिलें.

प्रत्यक्ष प्रमाणाची ही वाट लागल्यावर, सारी भिस्त शाद्ब आणि अनुमान यांवरच राहते. आणि त्यांच्या साह्यानें नवी घडी बसविण्याचे पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रामाणिक अथवा अप्रामाणिक प्रयत्न होतात. यांच्या बहुतकरून तीन तऱ्हा असतात. एक अशी कीं पूर्वी सांगितलेल्या दृष्टांतांतील प्रवाहाच्या ओघाचें स्वरूप कायम राहून आंतील लाटा मात्र बदलावयाच्या. हें काम जास्त परिश्रमाचें व विचाराचें आहे. असें करतांना निर्विकारपणानें निरनिराळ्या शास्त्रवचनांचा व परंपरांचा प्रथमतः सोईचा प्रश्न सोडून, केवळ तत्वतः समन्वय करून, त्यावरून त्या धर्माची व संस्कृतीची जी प्रकृति ठरेल, ह्मणजे प्रवाहाचें जें स्वरूप ठरेल, तें जेणेंकरून बिघडणार नाहीं अशा रीतीनें बाकीच्या गोष्टींत फरक करावा लागतो. हा बिकट मार्ग पचावयास कठीण असल्यामुळें, पुष्कळजण, कोठेंतरी शास्त्रांत आधार सांपडला ह्मणजे पुरे, त्याप्रमाणें आपली सोय घडवून आणावी, असा पक्ष अवलंबितात. यांच्याखेरीज जो तिसरा पक्ष आहे, त्याची युक्ति तर, मोठीच खुबीची असते. सन १९२५ सालीं उमरावती येथें विदर्भातील हिंदुसभेचे अध्यक्ष या नात्यानें बॅ. जयकरांनीं केलेलें ' इंग्रजी ' भाषण आमच्याप्रमाणेंच पुष्कळांच्या लक्षांत असेल. त्यांत त्यांनीं हल्लींच्या बिकट स्थितींतून वाट काढण्याचा मार्ग, ह्मणजे हिंदुधर्मियांनीं धर्माच्या सामाजिक अंगाची परिणति करावी, ( Develope the social side of religion ) व इतर बाबी खाजगी समजाव्या, असें सांगितलें होतें. या साध्या वाक्यांत केवढी बॅरिस्टरी आहे, हें विचारवंतांस सांगणेंच नको. हाच तो तिसरा मार्ग. ह्मणजे, आपल्या सोईप्रमाणें हें धर्माचें केवळ सामाजिक अंग, हें केवळ नैतिक, असें बेशिस्तपणानें तुकडे पाडून, पुनर्घटनेच्या नांवांखालीं, पहिल्या प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें जुन्या कुडींत परकीं अंतःकरणें उत्पन्न करावयाचीं. अर्थातच हे दोनही मार्ग सोडून तत्व-

समन्वयाच्या कसोटीवर जें जें टिकेल तें ग्रहण करण्याचा, आणि होतां होईल तों मूळ स्वरूप कायम राखण्याचा मार्गच खरा श्रेयस्कर आहे.

या मार्गानें जावयाचें कारण असें कीं, केवळ एखादें वाक्य सांपडलें ह्मणजे त्या आधारावर एखाद्या कृतीचें मंडण करणें, जसें चुकीचें ठरण्याचाच पुष्कळ संभव आहे, त्याप्रमाणें शरीराच्या कणाकणांत चैतन्य जसें खेळतें, त्याप्रमाणें, ज्या संस्कृतीच्या कणाकणांत धर्म खेळतो, अशा वैदिक संस्कृतींतील परंपरांची त्या केवळ सामाजिक आहेत, अथवा अज्ञानमूलक आहेत, असल्या तऱ्हेची निवड करणेंही धोक्याचें आहे. कारण, शाद्ब ह्मणजे पूर्वग्रंथ यांचा अभ्यास करतांना कांहीं अडचणी केव्हांही टाळतां येणें शक्य नाहीं. ग्रंथ जुना झाला ह्मणजे त्यांत प्रक्षेप होतात, यांत कांहीं शंका नाहीं; आणि ज्याप्रमाणें प्रक्षेप होतात, त्याप्रमाणें त्यांत विक्षेपही असतात, हीही गोष्ट निर्विवाद आहे. त्याचप्रमाणें नामसादृश्यामुळें, कोणता ग्रंथ भगवान् मनूच्या ह्मणण्याप्रमाणें श्रुतीस 'प्रत्यक्षता' आणणाऱ्या महात्म्यांनीं लिहिला व कोणता डौलानें त्याचें नांव मिरविणाऱ्या एखाद्या पुस्तकी पंडितानें लिहिला, हें कळावयास कांहींच साधन रहात नाहीं. हजारों वर्षांच्या राष्ट्रीय आपत्तींत उडालेल्या अखंड संहारामधून आज जे ग्रंथ हातीं लागत आहेत, ते इतके थोडे आहेत कीं, त्यामुळें रेखाचित्राप्रमाणें मूळाच्या सौंदर्याची नुसती कल्पना मात्र येऊं शकते. व इतर व्यक्तींहून त्या व्यक्तीचा भिन्नपणा मात्र निःशंकपणें उमटून पडतो. तसेंच, आजच्या पद्धतीप्रमाणें इतिहास लिहिण्याची तेव्हां वहिवाट नसल्यामुळेंही अनेक तऱ्हेचे घोटाळे उत्पन्न होतात. हें लक्षांत न घेतां जेव्हां आधुनिक विद्वान् जणुं कांहीं पूर्वीचा लेखक अर्वाचीन इतिहासशास्त्रांत प्राविण्य मिळवून, व अर्वाचीन संशोधकाच्या भूमिकेवर आरूढ होऊनच लिहीत होता, अशा श्रद्धेनें जुनें ग्रंथ लावावयास बसतात, तेव्हां तर त्या अनर्थास पुसावयासच नको. त्याचप्रमाणें कित्येक महत्वाच्या गोष्टी सूत्रमय, संदिग्धपणानें अथवा रूपकांनीं लिहावयाच्या जुन्या पद्धतीमुळेंही मोठा त्रास होतो. ह्मणजे त्यांत मनुष्याच्या कल्पनेला व अनुमानाला वाटेल तितका वाव सांपडतो. अशा स्थितींत जर एखादेंच वाक्य कोठें सांपडलें, एकादें उदाहरण आढळलें, एखादा ग्रंथ विशेष विचाराचा वाटला कीं तेवढ्यास उचलून धरून ढोल पिटण्यानें स्वपक्षमंडणाचें तात्पुरतें कार्य जरी साधलें, तरी खरा उद्देश सिद्धीस जाणार नाहीं. तेवढ्याकरितां संशोधनाची पद्धति, प्रमाणांची प्रमाणता, अनुमानाचें शास्त्र--इत्यादि गोष्टी आधीं

निश्चित करून त्यावरून या संस्कृतीची मूळ प्रकृति काय, या ज्ञानाचें आद्यितत्व कोणतें, तें एकदां अढळपणें स्थापित केलें ह्मणजे त्याच्या प्रकाशांत, उत्पन्न होणाऱ्या सर्व प्रश्नांची वाट लावतां येते. एखादा ग्रंथकार प्रत्यक्ष व्यासांचें नांव मिरवीत असला, एखाद्या ग्रंथांत विशिष्ट प्रकारचीं वाक्यें अथवा उदाहरणें सांपडलीं, तरी तीं जर या प्रस्थापित केलेल्या मूलतत्वांस धरून असतील तरच त्यांना प्रमाणाचें स्वरूप येईल., व तसें नसल्यास प्रक्षेप वगैरे सदरांत त्यांस काढतां येईल. तसें न करतां उगीच एखाद्यानें आपल्या बुद्धीला पटत नाहीं, अथवा मागच्या पुढच्या संदर्भांत अगदीं दोरीसूत बसत नाहीं, ह्मणून वाटेल त्या भागास प्रक्षेपांत काढावें, हें कांहीं खरोखर संशोधन नव्हे. एकच मनुष्य वेगळ्या वेगळ्या कारणांनीं भिन्न भाषापद्धति लिहूं शकतो, हें अनेक उदाहरणांनीं सिद्ध करून देतां येतें. तरी देखील भिन्नभाषापद्धतीच्या पुराव्यास फार महत्त्व दिल्यानें बरेंच काम नासतें. आणि जेव्हां पूर्वी सांगितल्याप्रमाणें स्वतःच्या विशिष्ट मनोभूमीवर आरूढ होऊन संशोधक 'येथें हें यावयास पाहिजे होतें, परंतु तें नाहीं,' अशा प्रकारचे तर्क काढून ऐतिहासिक सत्यें स्थापित करूं पाहतो, तेव्हां तर सत्याचा नुसता खून पडण्याचा संभव * असतो. नेपोलियनचा सुप्रसिद्ध चरित्रकार ॲबट यानें एवढ्याचकरितां ह्मणून ठेवलें आहे कीं 'Historian treads upon dangerous ground,

---

* याचीं हास्यास्पद उदाहरणें वाटेल तितकीं देतां येतील. 'महाराष्ट्र सारस्वत' कर्ते प. वा. वि. ल. भावे यांनीं कांहीं वर्षांमागें 'मुमुक्षूंत,' नव वर्ष २, अंक ४, यांत श्री तुकाराम महाराज व शिवाजी राजे यांच्या पत्रव्यवहारासंबंधीं एक लेख लिहिला आहे. त्यांत 'विरिंचीनें केलें ब्रह्मांड सकळ' वगैरे अभंग क्षेपक असल्याचीं कारणें सांगतांना एक बाब अशी सांगितली आहे कीं 'ज्यानें येवढ्या गौरवानें पालखी घोडा पाठवून आमंत्रण दिलें त्याला हें असलें वाक्प्रहार तुकारामबुवा करणार नाहींत.' 'मुंगी आणि राव। आह्मां समानची जीव'॥ 'मानदंभ चेष्टा। हें तों सूकराची विष्ठा'॥ 'तुका ह्मणे धन। आह्मां गोमांसा समान'॥ असें ह्मणणाऱ्या श्री तुकारामांच्या तेजस्वीतेची कल्पना संपत्तीच्या गुलामगिरींत सडत पडलेल्या आह्मां पामरांना काय यावयाची आहे! असल्या सर्वज्ञतेनें इतिहासांतील 'गूढग्रंथी' किती सुंदरपणानें उलगडत असतील याची विचारवंतांनींच कल्पना करावी!

when he begins to judge of motives ' अशा प्रकारें लेखकाचे अंतः- करणाचा ठाव घेण्याचा यत्नही एकप्रकारें पुरवतो; परंतु अभावरूप पुराव्यास जेव्हां सर्वस्वीं उचलून धरलें जातें, तेव्हांच अभ्यासकांनीं जास्त खबरदारी घेतली पाहिजे.

याप्रमाणें पहिल्या प्रकरणांत सांगितलेल्या पुनर्घटनेच्या कार्यांत, ज्या लोकांकरितां ती करावयाची, त्यांच्या स्वभावधर्माप्रमाणें किती धोरणें सांभाळलीं पाहिजेत, यांचें सामान्य दिग्दर्शन केलें. आतां पुढील प्रकरणांत, ज्या परिस्थितींत तीं करावयाची आहे, व जी परिस्थिति पुनर्घटनेस निरनिराळ्या लोकांच्या दृष्टीनें निरनिराळ्या प्रकारानें नडते, तिचा थोडक्यांत विचार करूं; म्हणजे या भगड्यांतून सर्व-मान्य अशी काय निष्पत्ति निघण्याचा संभव आहे, व तशी निघेपर्यंत, व्यक्तीनें आपलें कर्तव्य पार पाडण्याकरितां काय केलें पाहिजे, याचा थोडाबहुत बोध होईल.



# प्रकरण ३ रें.

# चातुर्वर्ण्य व वेदमार्ग.

---

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आर्यसंस्कृति आणि वैदिक धर्म यांच्या पुनर्घटनेचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. आर्यसंस्कृति आणि वैदिक धर्म हीं उभयतां एक-जीव आहेत, हें सुप्रसिद्धच आहे. आर्यसंस्कृतीच्या पुनर्घटनेचा प्रश्न आज उभा राहिला कीं, धर्माची ही धोंड तिच्या मार्गांत कायमचीच कशी आहे, याचें दिग्दर्शन मागील प्रकरणांत केलें. आतां या प्रकरणांत पुनर्घटनेच्या या चळवळीचा व तिच्या मार्गांत धर्माची धोंड उभी राहते, याचा खरा अर्थ काय, त्याचा विचार करावयाचा आहे.

पुनर्घटनेचा प्रश्न कोणत्याही गोष्टींत मुख्यतः दोन कारणांनीं उत्पन्न होतो. एक तर, बाहेरची सारी परिस्थिति सर्व प्रकारांनीं अनुकूल असतांही, त्या गोष्टींतील कांहीं वैगुण्याची निर्विवाद जाणीव होऊन तिची पुनर्घटना करावीशी वाटते; किंवा बाह्यपरिस्थितीशी विरोध उत्पन्न होऊन, त्या दोघांचें अगदीं पटेनासें झालें, ह्मणजे तें पटवून घेण्याकरितां इष्ट फेरफार करणें अवश्य होतें. आपण पहिल्या प्रकरणांत पाहिलेंच आहे कीं, हा जो हल्लीं पुनर्घटनेचा प्रश्न निघाला आहे, त्याचा उगम मुख्यतः बाह्यपरिस्थितीच्या विरोधांत आहे. इंग्रजी शिक्षणानें जें पहिलें वारें येथें उठलें, त्या सामजिक सुधारणेच्या चळवळीचा उगम बहुतांशीं आपल्या संस्कृतींतल्या व धर्मांतल्या अनेक खऱ्याखोट्या वैगुण्याच्या जाणिवेंत होता. कालांतरानें ती लाट परतली, आज ही जी दुसरी सुरू झाली, ती तिच्यापेक्षां परतण्यास जास्त कठीण आहे. कारण, पहिल्या लाटेचा उगम वर ह्मटल्याप्रमाणें, खऱ्याखोट्या उणेपणांत असल्यामुळें, सुधारणावादी व पुराणवादी यांचा कित्येक वर्षे झगडा चालून, बौद्धिक चर्चेंत हा विषय निकालांत निघेपर्यंत राजकीय परिस्थितीनें लोकांच्या जीवनक्रमांत नाहीं नाहीं ह्मणतांही, मुकाट्यानें असला फरक करून टाकला कीं त्या चळवळींतून लोकांचें लक्ष निघून, तीं चळवळच निर्माल्यवत् झाली, आणि तिचें राष्ट्रीय स्वरूप जाऊन ती एक खाजगी बाब होऊन बसली. तिला मारणारी राजकीय चळवळ

पाहिल्यानें केवळ राजकीय स्वरूपानेंच वाढून अनेक स्थित्यंतरांतून जात जात हल्लींच्या सर्वव्यापी स्वरूपांत आली. असें करीत असतां, असा अनुभव आला कीं, तिचें ध्येय संपादण्यास निवळ राजकीय स्वरूपानें काम करून भागणार नाहीं, तर तिच्या जोडीला देशांतील लोकांची विशेष तयारी होण्याकरितां राजकीय चळवळीनें उत्पन्न केलेल्या जागृतीप्रमाणें लोकांचे जीवनक्रम पालटतील, अशी शिक्षणाची चळवळ जोरानें करणें भाग आहे. निबंधमालाकारांनींही ' आमच्या देशाची स्थिति ' या प्रख्यात निबंधांत ' लोकांस शिक्षण द्या, ' हाच सारभूत उपदेश अखेरीस केला. कारण, आर्यसंस्कृतींतल्या व धर्मांतल्या कित्येक गोष्टी, ती संस्कृती व धर्म यांचा एकजीवपणा, वगैरे राजकीय उन्नतीच्या मार्गांत जबरदस्त अडथळे आहेत, असा त्यांच्या प्रयत्नांतून निष्कर्ष निघाला. तेव्हां, पुराणकालीं ज्याप्रमाणें याज्ञवल्क्यांनीं आपल्या वेदाकरितां आपले ब्राह्मण तयार करून घेतले, त्याप्रमाणें सर्व प्रकारचें शिक्षण देऊन आपली एक जातच आपण तयार करावी, असें सहजच वाटलें. वाङ्मय हें शिक्षणाचें द्वार असल्यामुळें नानातऱ्हेनें चर्चा सुरू झाली, व त्यांतून राजकीय चळवळीच्या जरी आड येत असलें, तरी, जुनें मरणें शक्य नाहीं, व नवें तर घेतलेंच पाहिजे, अशी परिस्थिति प्राप्त होऊन, जुन्यानव्याच्या तडजोडीनें पुनर्घटनेचा सांप्रदाय उत्पन्न झाला. अर्थातच, आपण या प्रकरणांत याच सांप्रदायाच्या दृष्टीनें त्याचा विचार करूं. ह्मणजे आर्यसंस्कृति व धर्म हीं राष्ट्रीय उन्नतीच्या आड येतात, ह्मणजे काय, त्या खरोखरच आड येतात, हें ह्मणणें सर्वस्वीं बरोबर आहे किंवा त्यांत कांहीं आभास आहे, आणि खरोखरच आड येत असल्यास त्यांची वाट कशी लावणें शक्य आहे, व आभास असल्यास त्याचा परिहार कसा केला पाहिजे, याचा विचार करावयाचा आहे.

धर्मांतील कित्येक गोष्टी आड येतात, अशी जी ओरड आपण पाहतों, तिचा सरळ निष्कर्ष असा आहे कीं- १ चातुर्वर्ण्य, आणि जातिसंस्था, २ स्त्रियांचा प्रश्न, ३ विवाहसंस्था, ४ भक्ष्यविचार, आणि ५ स्पृश्यास्पृश्यता, या पांच नांवाखालीं मोडणाऱ्या सर्व गोष्टी राजकीय उन्नतीस अवश्य अशा एकीच्या आड येतात. इतिहासाचा अभ्यास करून या विद्वानांनीं असा सिद्धांत केला आहे कीं, हिंदुस्थानच्या अधःपाताचें मूळ मुख्यतः या पांच गोष्टींत आहे; आणि ह्मणून जोंपर्यंत या नाहीं त्या स्वरूपांत त्यांना आपण चिकटून राहूं, तोंपर्यंत हिंदुस्थानची एकी व उन्नति खरी केव्हांही होणार नाहीं. याशिवाय आणखी दुसऱ्या कित्येक गोष्टी

नसतील असें नाहीं, पण त्या किरकोळ होत. अपेशाचे मुख्य जबाबदार हे पांचच आहेत. तेव्हां, आपल्यालाही, या पांच गोष्टींमुळें अधःपात झाला कीं काय, त्या टाकल्याखेरीज आमचें जोमदार एक राष्ट्र खरोखरच बनणार नाहीं कीं काय, अथवा, त्या टाकल्याबरोबर खरोखरच जोमदार राष्ट्र बनेल, या गोष्टींचा प्रथमतः विचार केला पाहिजे. त्यांतल्यात्यांतही जातिसंस्था व स्पृश्यास्पृश्यता यांच्यावर अतिशय मारा केलेला असतो. तेव्हां प्रथमतः त्याचाच विचार करूं. या प्रश्नांचा पुष्कळसा खल अनेक रीतींनीं झाला आहे. तेव्हां त्याचाच अनुवाद पुष्कळसा येथें करावा लागेल, व त्याच्या अनुषंगानें जो कांहीं नवीन विचार सुचेल, त्याची चर्चा करतां येईल.

जातिसंस्था हिचा उगम चातुर्वर्ण्यांत आहे, ह्मणून या चळवळीच्या प्रारंभीं आणि पूर्वीच्या सामाजिक चळवळींतही प्रथमतः चातुर्वर्ण्यावरच जोराचा हल्ला करण्यांत आला. वर्षानुवर्ष मोठें जोरदार वाग्युद्ध होऊन जेव्हां कांहीं निकाल लागण्याचा रंग दिसेना, तेव्हां अशी युक्ति काढण्यांत आली कीं चातुर्वर्ण्य आणि जातिसंस्था यांची फोड करून, या दोन्हीही संस्था अगदीं वेगवेगळ्या आहेत, वाटल्यास त्यांतील चातुर्वर्ण्य (Class) ठेवावें, पण जातिसंस्था (Caste) तर मारलीच पाहिजे, व त्यालाच जोडून, असें मांडण्यांत येऊं लागलें कीं, चातुर्वर्ण्य हें मूळचें कितीही चांगलें असलें तरी, त्याचें मूळ स्वरूप वेगळें आहे, व आज आह्मीं समजतों तें वेगळें आहे. तेव्हां हल्लींचें हें विकृत स्वरूप टाकून, तें मूळ स्वरूप टेवल्यास, कांहीं मोठेंसें नुकसान होणार नाहीं. आतां, या ह्मणण्यांत कांहीं वकिली आहे, व कांहीं अज्ञानही आहे. तें स्पष्टपणें निवडून काढण्याकरितां थोडें त्याच्या मुळांत शिरणें भाग आहे.

चातुर्वर्ण्य हें कसें उत्पन्न झालें याविषयीं मुख्यतः दोन मतें आहेत. 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' असल्या शास्त्रवचनांवरील दृढविश्वासानें 'ती एक ईश्वरी योजना आहे, आणि मनुष्याला न कळणाऱ्या अनेक ईश्वरी योजनांप्रमाणें, तिचें रहस्य जरी कळलें नाहीं, तरी केवळ ईश्वरी योजना ह्मणूनच वाटेल तें सोसूनही तें सांभाळलें पाहिजे,' असें ह्मणणाऱ्या लोकांचा एक वर्ग आहे. दुसऱ्या वर्गांतील लोक, या संस्थेशीं ईश्वराचा अर्थाअर्थी संबंध नसून, तिचें मूळ मनुष्यजातीच्या बाह्य परिस्थितींत आहे, असें ह्मणणारे आहेत. या लोकांत दोन भेद आहेत. कांहीं लोक ऐतिहासिकदृष्ट्या हा प्रश्न सोडवितात; ह्मणजे कालक्रमांत वेगळेवेगळे मानववंश

जवळ जवळ येऊन त्यांनीं परस्परांस जिंकलें, व जितजेत्यामध्यें नेहमींच असणारा उच्चनीच भाव जबरदस्त प्रयत्नानें काढून न टाकल्यानें तो अखंड राहून ही संस्था उत्पन्न झाली, व पुढें तिला धार्मिक स्वरूप प्राप्त झालें. या पक्षाच्या लोकांचें काम फारच सोपें आहे. कोणीकडून तरी कांहीं मानववंश असे एकत्र आले, व त्यांनीं एकमेकांस जिंकलें, असें अनुमान करण्यास पुरेसा ऐतिहासिक पुरावा दाखविला कीं झालें. दुसऱ्या पक्षाचे, ह्मणजे चातुर्वर्ण्याची उत्पत्ति समाज शास्त्रास धरून झाली, आणि म्हणून जरी तें एके काळीं उपकारक असलें तरी आज हानिकारक असल्यामुळें टाकून दिले पाहिजे, नाहींतर, त्याला मिळालेली धार्मिक जातकुळी अमान्य करून पूर्वीसारखें केवळ सामाजिक स्वरूप त्याला दिलें पाहिजे, असें ह्मणणारे आहेत. या दोनही पक्षांच्या लोकांस सांप्रतच्या अधःपाताचें मूळ चातुर्वर्ण्यांत असल्या-मुळें, त्याला साफ उडवून दिले पाहिजे, असें मनापासून वाटतें. चातुर्वर्ण्याच्या या निरनिराळ्या उपपत्तींपैकीं कोणती खरी असण्याचा संभव आहे, अथवा या साऱ्याही खऱ्या असल्यास, त्यांतील कोणती जास्त ग्राह्य धरली पाहिजे, हें आपण पाहूं.

चातुर्वर्ण्याच्या जुनेपणाबद्दल पाहूं गेलें असतां, ' वर्ण ' हा शद्ब ' जाति ' या निश्चित अर्थानें निदान तीन वेळां तरी ऋग्वेदामध्यें आलेला आढळतो.* अगस्तीच्या ' उभौ वर्णौ ऋषिरुग्रः पुपोष,'या ऋचेवरून तर अगस्तीची बायको लोपा-मुद्रा ही क्षत्रिय कन्या होती, या पौराणिक कथेची सत्यता वाटूं लागते. ऋग्वेदामध्यें पुरुषसूक्तांत आलेल्या उल्लेखाखेरीज क्षत्रीय असा स्पष्ट शद्ब चार पांच ठिकाणीं आला आहे. § आणि ' विशःपूर्वीः प्रचरा चर्षणी आः' अशा तऱ्हेचे वैश्य द्योतक उल्लेखही आहेत. ब्राह्मणाच्या अर्थी ब्रह्मा, व विप्र शद्ब तर कित्येक वेळां आले आहेत. नाहीं

---

* ' न आ वक्षन् सुविताय **वर्णम्** '। मं १. सू. १०४. २.
' उभौ **वर्णौ** ऋषिर् उग्रः पुपोष '। मं १. सू. १७९. ६.
' यो दासं **वर्ण** अधरं गुहो कः '। मं २. सू. १२. ४.

§ ' ममद्विता राष्ट्रं **क्षत्रियस्य** '। मं. ४ सू. ४२. १.
' आ राजाना·········**क्षत्रिया** यातमर्वाक् '। मं. ७ सू. ६४. २
' धृतव्रताः·········**क्षत्रियां** '। मं. ८ सू. २५. ८
' त्यान्नु **क्षत्रियां**·········याचितामहे '। मं. ८ सू. ६७. १

ह्मणावयास, पुरुषसूक्ताखेरीज शूद्र शब्दाचा उपयोग मात्र कोठें आहे किंवा नाहीं, हें सांगतां येत नाहीं. परंतु यजुर्वेदांत ' शूद्रा यदार्यजारा ' अशा प्रकारचे स्पष्ट उल्लेख आहेत. आतां हे उल्लेख फार कमी आहेत, हें खरें, परंतु ते आहेत, हें कांहीं खोटें नाहीं. वेद हा कांहीं त्या काळचा कांहीं विशिष्ट पद्धतीनें रचलेला इतिहास नाहीं, तर भक्तीच्या उत्कट जिव्हाळ्यानें केलेल्या निरनिराळ्या लोकांच्या व निरनिराळ्या काळच्या लोकांच्या प्रार्थनांचा संग्रह आहे, असें समजलें जातें. तेव्हां, त्यामध्यें अमुक गोष्ट आलीच पाहिजे, व ती अशा तऱ्हेनेंच आली पाहिजे, असें कांहीं शास्त्र करतां येणार नाहीं. मात्र, जें कांहीं असेल, त्याचा मात्र, हमखास पुरावा ह्मणून उपयोग होईल. तुकाराममहाराजांच्या भक्तीच्या कळवळ्यानें निघालेल्या अभंगांत प्रसंगानें देशपरिस्थिति, समाज, लोक, त्यांच्या चालीरीति, त्यांच्या समजुती इत्यादि अनेक गोष्टींचा उल्लेख आलेला आहे. परंतु त्यावेळीं असलेल्या त्यांच्याच जोडीदार दुसऱ्या गोष्टी जर आपण त्यांत शोधूं लागलों, तर त्यांत आढळत नाहींत. ही एका व्यक्तीनें एका ठराविक कालांत एका ठराविक देशमर्यादेंत लिहिलेल्या ग्रंथाची गोष्ट झाली. जेथें कालाची, कल्पनेस कठीण अशी विस्तृतता, लेखकांचें अनेकत्व वारंवार बदललेल्या देशमर्यादा अशी सामुग्री आहे, तेथें जर, अमुक गोष्ट सांपडलीच पाहिजे, असा जर कोणी आग्रह धरूं ह्मणेल, तर तें कितपत शहाणपणाचें होईल कोण जाणे. असो; सारांश इतकाच कीं, ऋग्वेदकालींदेखील 'वर्ण' ह्मणजे 'जाति' होत्या, अशी कल्पना करण्यास सबळ आहे.

मग, त्यांची व्यवस्था कशीही असो. परंतु असें ह्मटल्यानें ती संस्था कीती जुनी आहे, एवढाच प्रश्न ठरतो. परंतु मूळ प्रश्न तसाच राहतो. कारण इतक्या जुन्या काळांत ती अनेण्यापूर्वी जेव्हां उत्पन्न झाली असेल, तेव्हां तिची उत्पत्ति वरील तीन प्रकारांपैकीं कोणतीतरी असूं शकेल. वर्ण हे ईश्वरानें उत्पन्न केले, असे मानणाऱ्या लोकांच्या मताप्रमाणें पाहूं गेल्यास अशी शंका येते कीं, एका धार्मिक श्रद्धेशिवाय हिला कांहीं दुसरा आधार असेल काय ? शरीराच्या दृष्टीनें पाहिलें तर माणसांमाणसांत कांहींच फरक दिसत नाहीं. ह्मणजे ती सृष्टिक्रमास धरून गोष्ट नाहीं. तसें असतें तर, सृष्टींतल्या इतर जीवकोटी ज्याप्रमाणें एकमेकांपासून स्पष्टपणें उमटून पडतात, तसें तेही आपली भिन्नता स्पष्टपणें दाखविते. बरें; याला कांहीं कारण नसून ती एक निवळ ईश्वराची लहर आहे, असें ह्मणावें तर अशा सुलतानी लहरीच्या ईश्वराची कल्पना करणें कठीण. क्वचित कोणाचीच त्याचेवर श्रद्धा

बसूं शकेल. तेव्हां तशीही कल्पना करतां येत नाहीं. ही गोष्ट लक्षांत येऊन उपलब्ध असलेल्या सर्व धर्मग्रंथांनीं भगवत्गीतेच्या 'गुणकर्म विभागशः' या तत्वाचा अवलंब करून हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला आहे. ह्मणजे निव्वळ समाजशास्त्रास धरून असलेल्या श्रमविभागाच्या तत्वापेक्षां मनुष्याच्या उत्तमाधम गुणांच्या धोरणानें झालेल्या श्रमविभागास धरून तें आहे. परंतु त्यांनेंदेखील वर्णव्यवस्था उत्पत्तिसिद्ध कां असावी, हा प्रश्न सुटत नाहीं. आणि या सर्व वादांत जी कांहीं पठाडी गोम आहे, ती तर तीच; अलीकडच्या भाषापद्धतीनें बोलावयाचें ह्मणजे Caste (वर्ण) आणि Class ( वर्ग ) या एकच असें ह्मटलें, ह्मणजे सर्व वादच मिटला. कारण मनुष्याचा Class ( वर्ग ) त्याच्या पराक्रमानें बदलूं शकतो, व Caste ( वर्ण ) कांहीं झाले तरी बदलूं शकत नाहीं. पौराणिक काळीं मनुष्याचा वर्ण स्वपराक्रमानें बदलल्याचें क्वचित कोठें आढळतें. परंतु त्याचेंदेखील अगदीं खडखडीत स्पष्ट असें उदाहरण फक्त एकच आहे. आणि तें विश्वामित्राचें. व्यास वगैरेसारखे अनुलोमानें उत्पन्न झालेले ब्राह्मणांतच मोडतात, परंतु तीं उदाहरणें वेगळ्या तऱ्हेचीं आहेत. बापही क्षत्रिय आणि आईही क्षत्रियच, असें उदाहरण विश्वामित्राशिवाय दुसरें आढळेलसें वाटत नाहीं. परंतु तें आहे, आणि त्याचें फार महत्व आहे. कारण, त्याचीं गोत्रें आहेत, व ब्राह्मणांचा मुख्य जो गायत्रीमंत्र त्याचें ऋषित्वही त्याच्याचकडे आहे. मुद्गलासारख्या दुसऱ्या पुराणांतून गृत्समद वगैरेंचीं अशा तऱ्हेचीं उदाहरणें आहेत. ते अपवाद सोडले तर वर्ण हे उत्पत्तिसिद्ध आहेत, असेंच बहुतेक संस्थापित झाल्यासारखें आहे, व तसें तें असण्यास गुणकर्मांचा जोडीदार विभाग हेंही कारण पुरेसें नाहीं. तेव्हां धर्मशास्त्राप्रमाणें ईश्वरानें ते केले' असें मानलें तरी, ईश्वराच्या इतर सर्व कर्तृत्वाप्रमाणें तें उत्पत्तिसिद्ध असण्यास त्यांत कांहींतरी शास्त्रीयता असावी, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. ह्मणजे पूर्वी सांगितलेल्या दोन पक्षांत हा एक तिसरा पक्ष उत्पन्न होतो. धर्मशास्त्र हें ईश्वरानें दिलेलें आहे, अशी श्रद्धा बाळगणाऱ्या लोकांसही एवढी गोष्ट पटतेच कीं, विश्वांतील यच्चयावत् गोष्टी जरी परमेश्वरी इच्छेनेंच चालतात तरी, ज्याप्रमाणें त्या अतिशय सूक्ष्म अशा नियमांनीं बांधलेल्या आहेत, त्याप्रमाणेंच धर्म ही जरी ईश्वराची इच्छा असली तरी त्यांत अरेरावी नसून, या विश्वाच्या अनेकविध नियमांचा जीवाचें सुलभ कल्याण व्हावें ह्मणून केलेला समन्वय आहे. अर्थातच, त्यांतील प्रत्येक गोष्टच आपणास ठाऊक असलेल्या अथवा नसलेल्या अशा कांहींतरी सृष्टिनियमांस धरून असली पाहीजे. आणि याच दृष्टीनें

' चातुर्वर्ण्यं मयासृष्टम् ' यांत भगवंतांनीं ' सृष्ट ' असें पद घातलें. आणि एकदां अशा रीतीनें त्यांत शास्त्रीयता आहे, असें ठरलें ह्मणजे, तो केवळ सामाजिक ह्मणजे सोईचा प्रश्न आहे, असें ह्मणून त्याची वाट लावतां येणार नाहीं, व मागील भागांत सांगितल्याप्रमाणें तशी वाट लावण्याचा अधिकारही वाटेल त्यास येणार नाहीं. ही शास्त्रीयता काय आहे, हें आपण थोड्यावेळानें पाहूं.

चातुर्वर्ण्याच्या ऐतिहासिक पक्षासंबंधीं जास्त विचार करण्याचें कारण नाहीं. त्याचें मूळ किती जुनें आहे, हें नुकतेंच आपण थोडक्यांत पाहिलें आहे, आणि त्यापेक्षां तें आर्वाचीन आहे असें जरी धरलें, तरी पुनर्घटना करूं ह्मणणाऱ्या लोकांतही या मतावर भर देणारे लोक थोडे आहेत. श्रमविभागाच्या तत्वावर याची मांडणी केली आहे, हाच प्रचलित सर्व मतांचा सारांश आहे. एका काळीं समाज जसजसा वाढत गेला तसतसे सहजच त्याचे विभाग पडून चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें, व त्यांतून पुढें जातिसंस्था उत्पन्न झाली. जातिसंस्थेला आज जें महत्व आहे, ते त्या रोटीबेटीबंद आहेत ह्मणून आहे. मूळ चातुर्वर्ण्य रोटीबेटीव्यवहार बंद नव्हतें, परंतु पुढें तें तसें झालें, आणि त्याची विकृतावस्था जी जातिसंस्था, तिच्यांत तर तें तसें कमालीचें होऊन सामाजिक उन्नति कुंठित झाली. द्वेष, मत्सर इत्यादिकांचा प्रभाव होऊन अधःपाताचा कळस झाला. करितां ही स्थिति जर सुधरावयाची असेल, तर प्रथमतः हा रोटीबेटीबंदपणा काढून टाकला पाहिजे. सध्यां बॅ. सावरकरांची केसरींतील लेखमाला, विवेकरशास्त्र्यांचीं व्याख्यानें व लेख, आणि डॉ. कुर्तकोटींचीं ' गंगासंमति ' इत्यादिकांवरून यांतील धोरण सहज समजून येतें. अशा रीतीनें ती संस्था निर्जीव केली कीं सर्व अडथळे दूर होऊन एकी होईल, व अशी एकी झाली कीं स्वातंत्र्य हें दार उघडल्याबरोबर ओटीवर बसलेलें सांपडेल, असा याचा भाव आहे. यावर अशी शंका येते कीं, ज्या तऱ्हेची एकी हे लोक ह्मणतात तशी ती या जगांत शक्य आहे काय, स्वातंत्र्यास तसल्याच एकीची आवश्यकता आहे काय, तशी एकी नसलेल्या समाजांचें राष्ट्रीयत्व नाहिसें होतें काय, तशी एकी नसलेल्या इतर राष्ट्रांनीं स्वातंत्र्य संपादन केलें नाहीं काय, आज जे स्वातंत्र्याचा आणि वैभवाचा पूर्ण उपभोग घेत आहेत, त्यांच्यांत तरी तसली एकी आहे काय, आणि तिच्यावांचून जर त्यांचें अडत नसेल, तर आमचेंच कां अडावें ? या साऱ्या प्रश्नांचा समाधानकारक विचार केला पाहिजे, ह्मणजे तशा तऱ्हेची एकी आमच्याकडे पूर्वी कधीं होती काय, ती तशी असल्यास चातुर्वर्ण्य

तिच्या आड कसें आलें नाहीं, व आड न येतां उपकारकच कसें झालें, तसें तें आतां कां होऊं नये, इत्यादि प्रश्न सोडवितां येतील.

समाजशास्त्राच्या दृष्टीनें वर्ण-व्यवस्थेकडे पाहणाऱ्यांत एक पक्ष तिचें समर्थन करणाराही आहे. हे लोक, मनुष्य हा सृष्टींतील एक प्राणी असल्याकारणानें, प्राणीशास्त्राचे दृष्टीनें त्याचा विचार करून, आनुवंशिकता, गुणविकास इत्यादिकांच्या धोरणानें ही संस्था निर्माण झाली आहे, ह्मणून ती राखिली पाहिजे, असें ह्मणणारे आहेत. परंतु केसरींतील लेखांत बॅ. सावरकरयांनीं थोडक्यांत दाखविल्याप्रमाणें, त्याकरितां तरी ती उत्पत्तिसिद्ध कां असावी, व रोटीबेटीव्यवहार कडक करून सीलबंदच कां राहिली पाहिजे, हें सिद्ध होत नाहीं.

याप्रमाणें वर्णव्यवस्था ही केवळ सामाजिक बाब असून तिचा धर्माशीं कांहींएक संबंध नाहीं, जो जोडला गेला आहे, तो अज्ञानमूलक आहे, ह्मणून तिला अजिवाद उडवून दिलें पाहिजे, असें ह्मणणारा एक; ती केवळ सामाजिक बाब असली तरी तिच्यांत सशास्त्रता आहे, ह्मणून शास्त्रीयतेच्या दृष्टीनें कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत ती टिकवावी, असें ह्मणणारा दुसरा; ती कशीही उत्पन्न झाली असली तरी, आज हजारों वर्षांच्या परंपरेंत समाजशास्त्राची श्रमविभाग वगैरे तत्वें, व धर्मशास्त्राचे आचार, विधिनिषेध, व तत्वें इत्यादिकांचें तिच्यांत बेमालूम मिश्रण झालें असल्यामुळें, व राष्ट्रहानीचें तिच्या माथीं मारलेलें अपयश निर्विवादपणें सिद्ध होत नसल्यामुळें, उलट अनेक तऱ्हेनें ती उपकारक झाली, असें निरनिराळ्या तऱ्हेनें दाखवितां येत असल्यामुळें, कांहींही झालें तरी ती टिकवावी, आणि राजकीय प्रगतींत तिच्यामुळें प्रस्तुतच्या परिस्थितींत जो कांहीं अडथळा होत असेल, तो अन्य रीतीनें भरून काढावा, असें ह्मणणारा तिसरा; तिची उत्पत्ति वगैरे कांहीं माहीत नाहीं, चातुर्वर्ण्य ह्मणजे वैदिकधर्म आणि वैदिकधर्म ह्मणजे चातुर्वर्ण्य, अशी स्थिति आहे खरी, तिचें कारण देवास ठाऊक, ती तशी आहे, ह्मणून ती टिकविली पाहिजे व पुराणधर्माची जोराची चळवळ करून, समाजांत पुन्हां मतपरिवर्तन केलें असतां तशी ती टिकेल, नव्हे, ती मरणें शक्यच नाहीं, असें मानणाऱ्यांचा चौथा; आणि वैदिक संस्कृतींतल्या, पाश्चात्य पंडितांना अजून अज्ञात असलेल्या अनेक शास्त्रांपैकीं एका शास्त्रास धरून तिची रचना झालेली आहे, व हळूहळू वैदिक शास्त्रांचीं रहस्यें अलीकडे त्यांना जशीं पटूं लागलीं आहेत तशींच, ज्या शास्त्रास धरून हिची रचना आहे, त्याचीं रहस्येंही त्यांच्या लक्षांत

येतील, व मग ते तिचा आदर करतील, इतकेंच नव्हें, तर स्वीकारही करतील, ह्मणून कांहींही झालें तरी ती टिकविलीच पाहिजे, असें ह्मणणाऱ्यांचा पांचवा—असे मुख्य पांच पक्ष याविषयीं झाले.

हा जो शेवटचा पक्ष सांगितला तो अर्थातच वर्णव्यवस्था हें वैदिक धर्माचें एक ' अव्यभिचारी अंग ' आहे ( inseparable accidence ) अशी श्रद्धा बाळगणाराच आहे. अर्थात् त्यांच्या मताचा विचार करणारास, वैदिक धर्मोचीं, इहलोक, परलोक, अतींद्रियता, योगशास्त्र इत्यादि जीं मूलतत्वें आहेत, तीं प्रथमतः मान्य असलीं पाहिजेत. त्यांना धरून जर या व्यवस्थेची उपपत्ति व आवश्यकता दाखवितां आली, तर तें वैदिक धर्माचें एक अव्यभिचारी अंग आहे, असें उघड होईल मग वैदिक धर्म मानतो ह्मणणाऱ्याला ' ती मी मानीत नाहीं, ' असें ह्मणणें शक्य नाहीं, आणि, तिच्यांत जो कांहीं फेरबदल करणें, तो त्या मूल-तत्वांना अनुसरून असाच असला पाहिजे, हें कोणीही कबूल करील. ज्यांना ती नको असेल, अथवा इतर शास्त्रांच्या दृष्टीनें तिची वाट लावावयाची असेल, त्यांनीं उघड उघड स्वतःस वैदिकधर्मबाह्य ह्मणवून घेऊन त्या धर्मासच उडवून द्यावें, ह्मणजे दोन्ही पक्षांचा उघड उघड सामना होऊन जें काय व्हावयाचें असेल तें होईल. मुत्सद्दी डावपेचांपेक्षां त्यानें कल्याण अधिक होईल.

अशा रीतीनें आतांपर्यंत हा विषय थोड्या पाल्हाळानें मांडण्याचें कारण इतकेंच कीं, सत्य ह्मणजे सत्य, आणि शास्त्रीय सत्य ह्मटलें ह्मणजे तेथें पसंती नापसंतीचा प्रश्न नाहीं. त्या शास्त्रास अभिप्रेत असलेला परिणाम हवा असेल, तर तें तसेंच्या तसेंच घेतलें पाहिजे. तेथें तडजोड नाहीं. तसें तें घेववत नसेल, तर त्या परिणामाची अपेक्षा सोडून दिली पाहिजे. तो इष्ट परिणाम घडवून आणण्यास दुसरा कांहीं मार्ग असल्यास तो पत्करा, परंतु मग तो भागच वेगळा, आणि त्याचें शास्त्रहि वेगळें. सारांश. येथें तडजोड होऊं शकत नाहीं; ह्मणून चातुर्वर्ण्य ही धर्माची बाब आहे, असें ह्मणणाऱ्यांनीं पक्कें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, चातु-र्वर्ण्याचा विचार करतांना निरनिराळीं शास्त्रवचनें एका ठिकाणीं गोळा करून, त्यांतून तडजोडीनें आपला अभिप्राय सिद्ध करून दाखविणें, हा खरा मार्ग नसून वैदिक धर्मास आधारभूत असलेलीं जीं शास्त्रें त्यांपैकीं कोणत्या शास्त्रास धरून त्याची रचना झालेली आहे, तें आधीं नीट ठरवून त्याच्या आधारानें या शास्त्र-वचनांचा समन्वय केला पाहिजे, व त्या शास्त्रास धरून असतील, तसेच फेरफार

त्यांत केले पाहिजेत. औषधाप्रमाणेंच हें आहे. वाटल्यास तोंड वेडेंवांकडें करून घ्या, नाहींतर गुळाच्या गोळींत लपवून घ्या; पण पोटांत औषध तेंच गेलें पाहिजे. तसाच, अनुपानांत थोडाबहुत फरक करतां आला, तरी तत्वदृष्टीनें, तडजोड हा शद्बच संभवत नाहीं.

आतां, असें करतांना, असें होण्याचा संभव आहे कीं या चातुर्वर्ण्याचा व बाह्य परिस्थितीचा अशा कट्टरपणानें मेळ न घालतां आल्यामुळें हे बाळगणारे लोक, आणि बाह्य परिस्थिति, व त्या परिस्थितींत राहणारे लोक यांची एक मोठीच लढाई लागून राहील. व शत्रूच्या अमर्याद सैन्याशीं मोठ्या धैर्यानें टक्कर देणाऱ्या मूठभर शूर सैनिकांप्रमाणें त्यांची स्थिति होईल. कदाचित् त्यांना लढतां लढतां मरून जावें लागेल, कदाचित् **चितोडच्या प्रतापसूर्या**प्रमाणें रानावनांत झाडपाला खाऊन आपलें आस्तित्व टिकवावें लागेल, पण त्यांतच त्यांचें मनुष्यपण आहे. सत्यनिष्ठा, आणि तत्वनिष्ठा या एकच होत.

मनुष्याचें मनुष्यपण त्याच्या तत्वनिष्ठेंत आहे, हें **दिवेकर** शास्त्र्यांनाच तर काय पण बॅ. सावरकर आणि डॉ. मुंजे यांनाही नाकबूल करतां यावयाचें नाहीं. कारण मनुष्यानें तत्वनिष्ठेकरितां जगावयाचें नसेल, आणि खाण्यापिण्याचें व सुखसोयीचें भौतिक आणि मानसिक सुख, जसें मिळेल तसें कोणीकडून तरी जास्त घ्यावयाचें, अंतःकरणास एक तत्व पटत असतां ‘ अनुष्ठेयतात्पर्य ’ मात्र वेगळेंच ठेवावयाचें, हेंच त्याच्या मनुष्यपणाचें अत्युच्च लक्षण असेल, तर मग त्याला स्वाभिमान, कुलाभिमान, देशाभिमान इत्यादि मर्यादा तरी कशास पाहिजे ? समाजव्यवस्थेंत आणि राजकीयसंस्थेंत मनुष्यांच्या परस्परांवरील दाबामुळें त्यांचीं मनें अनेक प्रकारच्या बंधनांनीं एकमेकांत गुंतून त्यांत एक प्रकारचा दुबळेपणा आलेला असतो. एवढा दुबळेपणा झुगारून दिला, ह्मणजे झालें. त्याच्या पराक्रमाची इतिकर्तव्यता संपली, आणि अशा पराक्रमानें त्यानें चैनींत आयुष्य काढलें, ह्मणजे तो कृतकार्य झाला, असें ह्मणावें लागेल. परंतु असा ध्येय पुरुष एकाद्या नास्तिक शिरोमणीसही पसंत पडत नाही. सारांश, अमर्यादतेनें जगण्यांत मनुष्यपणा नसून, कांहीं तरी मर्यादांच्या धोरणानें क्रिया करण्यांत व तसें करतांना वेळेला सर्वस्वाचा बळी देण्यांतच मनुष्याचें खरें मनुष्यपण आहे, हें कोणासही अमान्य नाहीं. तेव्हां वाद राहतो तो एवढाच कीं, अशा ज्या मर्यादा घालून घ्यावयाच्या, त्या कोणत्या व कशाकरितां? याचें उत्तर, अर्थातच, तत्वनिष्ठेकरितां तिला

अनुकूल अशा घालावयाच्या, हें आहे.

यावर कोणी असें ह्मणेल कीं, ' कां हो, तुह्मी मर्यादा घालून घेतल्या पाहिजेत असें ठरवितां, तर तत्वनिष्ठेस तरी मर्यादा कां नसावी? सत्य किंवा तत्व हें तरी बुजगावणें काय आहे? ' अशा रीतीनें तत्वनिष्ठेस मर्यादा घातल्यानें स्वतःचे व समाजाचें, व्यक्तीनें अथवा राष्ट्रानें हित केल्याचींही उदाहरणें आहेत. तेव्हां हा प्रश्न अप्रस्तुत नसून जास्त खोल विचाराचा आहे. परंतु आह्मी मागच्या प्रकरणांत ह्मटल्याप्रमाणें याचें समाधान अर्थातच मनुष्याच्या World conception मध्यें आहे. ह्मणजे हरदासाची कथा पुन्हां मूळपदावर येऊं पाहते. परंतु त्याविषयीं पिष्टपेषण करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. तत्वनिष्ठा ही वस्तूच अशी आहे कीं, तत्वनिष्ठ मनुष्य ' स्वभावस्तु प्रवर्तते ' याच न्यायानें तेथें वागत असतो. आणि तत्वनिष्ठेस कांहीं मर्यादा असावी किंवा नाहीं, हा प्रश्न इतका मोठा आहे कीं, त्याचाच एक स्वतंत्र ग्रंथ होईल. एवढ्याकरितां त्याच प्रश्नावर अडून न बसतां, हजारों प्रसंगांतून विशेष कल्याणाकरितां, किंवा ' सर्वनाशे समुत्पन्ने ' स्वतःचा बळी देण्याचें पांडित्य करण्याकरितां केलेला तत्वनिष्ठेचा त्याग, यदाकदाचित जरी भूषणावह ह्मटला गेला, तरी, तसले उदाहरण अपवादांत काढून, इतर प्रसंगीं, कांहींही झालें तरी, तत्वनिष्ठ असण्यांतच मनुष्याचें खरें मनुष्यपण आहे, हें सर्वमान्य आहे, असें धरून चाललें, व चातुर्वर्ण्यासंबंधानें, असा अपवाद करण्याचें कारण नाहीं, असें दाखविलें तरी पुरे आहे.

आपण वर पाहिलेंच आहे कीं, चातुर्वर्ण्यासंबंधानें हल्लीं जी एवढी अडचण भासते, ती त्यांतील रोटीबेटीबंदतेमुळेंच भासते, व तेवढ्याकरितां, चातुर्वर्ण्य हें **वैदिकधर्माचें** अव्यभिचारी लक्षण नाहीं, रोटीबेटीबंदता हें तरी निदान चातुर्वर्ण्याचें अव्यभिचारी लक्षण नाहीं, वगैरे पक्ष निर्माण झाले. ही अडचण चातुर्वर्ण्यांतील उच्चनीचतेच्या भावानें समाजांत उत्पन्न होणारे कलह, द्वेष, मत्सर यांनीं समाज सडून जाऊन मृत होतो, यामुळें भासते. हें खरें आहे कीं काय हें पाहण्यापूर्वी चातुर्वर्ण्य हें काय प्रकरण आहे, हें वैदिक धर्माच्या दृष्टीनें थोडक्यांत पाहिलें पाहिजे.

हल्लींच्या स्थितींत चातुर्वर्ण्य हा शब्द जरी वापरला, तरी त्याचा अर्थ खरोखर **डिकॉटमी**च्या तर्कपद्धतीप्रमाणें ब्राह्मण आणि ब्राह्मणे तर, असाच आहे. ह्मणून मुख्य ते दोन पक्ष धरूनच आह्मीं विचार करणार आहों, व जरूर पडेल तेथेंच

फक्त वैश्य आणि क्षत्रिय यांचा स्वतंत्रपणें निर्देश करणार आहों. हल्लींच्या काळीं वेदविद्येस महत्व नसल्यामुळें रोटीबेटीव्यवहार आणि मनुष्यजातीविषयीं बंधुभावाची हानी करणाऱ्या उच्चनीचतेच्या कल्पना, एवढीच फक्त ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांची विभागणी करणारी सरहद्द दिसते; व विशेषतः त्या तशा नव्हत्या, असें शास्त्रवचनें व पौराणिक कथा यांच्या स्वतंत्र साहाय्यानें दाखवून त्या उडवून देण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. परंतु यांत तिसरें महत्वाचें खरें अंग आहे, आणि वेदोक्त प्रकर्णासारख्या कांहीं प्रसंगांवरून त्याचीही जाणीव वादकरणाऱ्या लोकांस असावी असें दिसतें. रोटीबेटीव्यवहार आतांसारखेच पूर्वी असतील, किंवा नसतील. परंतु वेदाध्यापनाचा अधिकार, ( शास्त्राध्यापनाचा नव्हे ! ) हा मात्र अनादिकालापासून आजतागायत, ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांची विभागणी करणारी मुख्य बाब आहे. तेव्हां तिचाच विचार केला असतां, भक्ष्याभक्ष्य, स्पर्शास्पर्श, वगैरे नारे प्रश्न आपोआप सुटतील. शास्त्राध्ययनाचा अधिकार तर सर्ववर्णांना बहुतेक सारखाच होता. वेदाध्ययनही त्रैवर्णिकांना शास्त्रापरत्वें सारखेंच होते. येऊन जाऊन प्रश्न काय तो अध्यापनाचा होता. वेदांच्या अध्यापनाचें काम ब्राह्मणांनींच केलें पाहिजे, असें एकदां ठरल्यावर बाकीच्या शास्त्रांचें अध्यापनही साहजीकपणें त्यांच्याकडे आलें. उपनिषदांत व पुराणांतही कित्येक स्थळीं अध्ययनाकरितां ब्राह्मण क्षत्रिय राजांकडे, **तुलाधारा**सारख्या वाण्याकडे **सुलभे**सारख्या एखाद्या स्त्रीकडे शूद्राकडेही गेलेले आढळतात. परंतु तें वेदाध्ययन नसून नानाप्रकारच्या योगविद्या व तसलींच इतर शास्त्रें यांचें अध्ययन होतें. हें लक्षांत न घेतल्यामुळें, अध्यापनाचें काम देखील मूळ क्षत्रियांचें, असेंही कांहीजण प्रतिपादतात ! असो.

आतां हा जो अध्यापनाचा ' एकमेवाद्वितीयम् ' असा अधिकार ब्राह्मणांस प्राप्त झाला, यास कांहीं शास्त्रीयता आहे; ती निवळ व्यवहारीक गोष्ट नाहीं असें वैदिकधर्मीयांचें ह्मणणें आहे. वैदिकधर्मी लोकांच्या ह्मणण्याप्रमाणें वेदाला जें महत्व आहे, तें त्याच्या अपौरुषतेमुळें आहे, किंवा पौरुषतेमुळें आहे हा प्रश्न बाजूस ठेवला तरी कोणत्याही कारणानें कां होईना, पण वेद हे मंत्रमय आहेत ह्मणजे ती सिद्धवाणी असून तिच्यांत दृश्य अथवा अदृश्य असे परिणाम घडवून आणण्याचें सामर्थ्य आहे, या श्रद्धेमुळें आहेः हें कोणासही नाकबूल करतां यावयाचें नाहीं. या सामर्थ्यासंबंधीं **'स वाऋग्भ्योऽजायत' 'तस्मात् ऋचोऽजायन्त,** ' अशीं वाक्यें खुद्द वेदांतच आहेत वेद हे ईश्वरप्रणीत नसून ईश्वरस्वरूपच आहेत, अशा कल्पना खुद्द वेदांतच आहेत.

त्यांवरून असें दिसतें कीं शद्बांत, ह्मणजे अर्थातच शद्बोच्चार आणि शद्बांची अनुपूर्वी यांच्यांत उत्पादकशक्ति आहे, असा वैदिकधर्मीयांचा दृढविश्वास दिसतो. वेदांत असलीं वचनें सांपडतात, ह्मणून वर सांगितलेंच आहे. वामीय सूक्तांत तर मध्यकालीन मराठी वाङ्मयांत फार येणारा आणि गणपतिअथर्वशीर्षासारख्या उपनिषदांत आढणाळरा ' चत्वारि वाक्पदानि ' ह्मणजे, परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी हा चारी प्रकारचा वाचाभेद स्पष्टप्रकारें सांगितला आहे.

' चत्वारि वाक् परिमिता पदानि । ' तानि विदुर्ब्राम्हणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहिता नेंगयन्ति । तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति॥
१।१६४।४५,

यांत वाचेचे चार प्रकार असून, ते फक्त मनीषिण अशा ब्राह्मणांनाच कळतात, त्यांतले तीन गुप्त असून चौथा मात्र प्रकट आहे, ह्मणून ती वाचा माणसें बोलतात, असें स्पष्ट ह्मटलें आहे. आतां यावरही प्रक्षेपाचें शस्त्र आहेच, आणि त्याला कारणही जबरदस्त सांपडू शकेल. नाजुक ऐतिहासिक बुद्धीस या मंडलांतील सूक्तांतील ऋचांची संख्या ठरावीक रीतीनें २०।२५ ही असतां, याच सूक्तांतील ऋचा ५२ कशा, एवढें कारण, सारें सूक्त प्रक्षेपांत टाकण्यास खास पुरेसें होईल. परंतु अशारीतीनें सारा वेद प्रक्षेपांत काढावयाचें सोडून, व अशा लोकांस कित्येक सूक्तें केवळ ५।६ ऋचांचींच आहेत, ' जातवेदसे सुनवाम ' ( १९९ ) हें सूक्त तर केवळ एकाच ऋचेचे आहे, हेंही त्यादृष्टीनें तितकेंच महत्वाचें आहे, असें सुचवून, आपण पुढें चालूं.

सारांश इतकाच कीं, वेदामध्यें शद्ब हा मानुष व दिव्य, असा दोन्ही प्रकारचा असून त्यांत उत्पादन सामर्थ्य आहे, असें आढळतें. महाभारत व मनुस्मृति यांतही ' अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभुवा ।
आदौ वेदमयी दिव्या यतःसर्वाः प्रवृत्तयः ।
नामरूपंच भूतानां कर्मणांच प्रवर्तनम् ।
वेदशब्देभ्य एवादौ निर्ममे स महेश्वरः ॥ शांति २३३।२४।२५॥
सर्वेषां तु नामानि कर्माणि च पृथक् पृथक् ।
वेदशब्देभ्य एवादौ पृथक् संस्थाश्च निर्ममे ॥ मनु १।२१ ॥
असें ह्मटलें आहे.

त्रयमिदं नामरूपं वा कर्म तेषां नाम्नां वागेव उक्थम् हें शतपथ ब्राम्हणांतील वचन प्रसिद्ध आहे.

ऋग्वेदांतील आठव्या मंडलांत ' वाक् ' ही नित्य असून तिच्यापासूनच सर्व झालें आहे, असें स्पष्ट म्हटलें आहे. त्याचप्रमाणें भगवान् **बादरायणांनींही ब्रम्हसूत्रांत** वेदांस '**प्रत्यक्ष**' असें म्हटलें आहे, हीही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. '**शब्द इतिचेन्नातः प्रभवात् प्रत्यक्षानुमानाभ्याम्**' १।३।८।२८ या सूत्रावरील भाष्यांत शब्द आणि अर्थ यांच्या संबंधीं विशेष चर्चा करून आचार्यांनीं '**स्फोटवाद**' खोडून काढला आहे, परंतु त्याबरोबरच जगाचें ' शब्द-प्रभवत्व ' हें कोणत्या रीतीनें घ्यावयाचें याचा वाद काढून, ' न चेदं शब्दप्रभवत्वम् ब्रह्मप्रभवत्ववत् उपादानकारणाभिप्रायेणोच्यते '–असा आपला निर्णय दिला आहे. त्याचा विचार या आपल्या विषयासंबंधानें पुष्कळ करण्याजोगा आहे. सारांश गोष्ट एवढीच कीं, शब्दाची मंत्रमयता म्हणजे उत्पादनसामर्थ्य यावरील विश्वासांतच वेदांचें महत्त्व आहे. वैदिक धर्मापासून उत्पन्न झालेल्या झरतुष्ट्री, शीख, वगैरे धर्मोविषयीं तर सांगावयासच नको, परंतु त्यांतून फुटून निघणाऱ्या जैन बौद्ध वगैरे निर्ग्रंथ धर्मोसही शब्दांतील ही शक्ति मान्य असून तिच्यावर पुष्कळशा साधनक्रिया बसविलेल्या आहेत. जैन लोकांचा जपावर पुष्कळच भर असतो. ' ओमीपामीहूं ' ( मणी पद्मे हुं ) ही बौद्ध लोकांची गायत्री तर सुप्रसिद्धच आहे. मुसल्मान लोकांचे साधनमार्ग बहुतेक जपावरच बसविलेले आहेत. राज्यव्यवहार करीत असतांनाही मोगल बादशहा हातांत जपाच्या लांब लांब रत्नमाला वागवीत. ख्रिश्चन धर्मातही मंत्रजपाचें महत्व अतिशय आहे. In the beginning was the Word, and the Word was with God, and the Word was God हें जॉनचें वाक्य तर ख्रिस्त्यांच्या गुप्त विद्येचें आणि गुप्त तत्वज्ञानाचें मूळ सूत्रच आहे. त्याचें द्योतक असलेला ***Logos*** हा ग्रीक शब्दच मूळ ' **ऋक्** ' शब्दाचें रूपांतर दिसतो. असो. सारांश गोष्ट इतकीच कीं, केवळ वैदिक धर्मासच नव्हे तर जगांतील सर्व धर्मोस सत्यभूत असलेलें हें मंत्रशास्त्र केवळ भावनेचें बंड म्हणून उडवून देतां येत नाहीं. मंत्राचा गुण त्याच्या शब्दांतील उत्पादकतेमुळें येतो, किंवा मंत्र जपणाऱ्याच्या भावनेमुळें येतो, या वादांत येथें शिरण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारची शक्ति शब्दामध्यें असते, असें सर्व धर्मोस मान्य आहे, एवढेंच येथें पुरे आहे. परंतु तेवढ्यावरून फार झालें तर वेदांची मंत्रमयता दाखवित येईल, पण अध्यापनाचा अधिकार एकाद्या विशिष्ट वर्गाकडे कां रहावा, याचा बोध होणार नाहीं. उलट अध्यापनाच्या अधिकारासंबंधानें असला निर्बंध असलेला

त्यांवरून असें दिसतें कीं शद्वांत, म्हणजे अर्थातच शद्वोच्चार आणि शद्वांची अनुपूर्वी यांच्यांत उत्पादकशक्ति आहे, असा वैदिकधर्मीयांचा दृढविश्वास दिसतो. वेदांत असलीं वचनें सांपडतात, म्हणून वर सांगितलेंच आहे. वामीय सूक्तांत तर मध्यकालीन मराठी वाङ्मयांत फार येणारा आणि गणपतिअथर्वशीर्षासारख्या उपनिषदांत आढणाळरा ' चत्वारि वाक्पदानि ' म्हणजे, परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी हा चारी प्रकारचा वाचाभेद स्पष्टप्रकारें सांगितला आहे.

**' चत्वारि वाक् परिमिता पदानि । ' तानि विदुर्ब्राम्हणा ये मनीषिणः ।**
**गुहा त्रीणि निहिता नेंगयन्ति । तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥**
१।१६४।४५,

यांत वाचेचे चार प्रकार असून, ते फक्त मनीषिण अशा ब्राह्मणांनाच कळतात, त्यांतले तीन गुप्त असून चौथा मात्र प्रकट आहे, म्हणून ती वाचा माणसें बोलतात, असें स्पष्ट म्हटलें आहे. आतां यावरही प्रक्षेपाचें शस्त्र आहेच, आणि त्याला कारणही जबरदस्त सांपडू शकेल. नाजुक ऐतिहासिक बुद्धीस या मंडलांतील सूक्तांतील ऋचांची संख्या ठरावीक रीतीनें २०।२५ ही असतां, याच सूक्तांतील ऋचा ५२ कशा, एवढें कारण, सारें सूक्त प्रक्षेपांत टाकण्यास खास पुरेसें होईल. परंतु अशारीतीनें सारा वेद प्रक्षेपांत काढावयाचें सोडून, व अशा लोकांस कित्येक सूक्तें केवळ ५।६ ऋचांचींच आहेत, ' जातवेदसे सुनवाम ' ( १९९ ) हें सूक्त तर केवळ एकाच ऋचेचे आहे, हेंही त्यादृष्टीनें तितकेंच महत्वाचें आहे, असें सुचवून, आपण पुढें चालूं.

सारांश इतकाच कीं, वेदामध्यें शद्ब हा मानुष व दिव्य, असा दोन्ही प्रकारचा असून त्यांत उत्पादन सामर्थ्य आहे, असें आढळतें. महाभारत व मनुस्मृति यांतही **' अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभुवा ।**
**आदौ वेदमयी दिव्या यतःसर्वा प्रवृत्तयः ।**
**नामरूपंच भूतानां कर्मणांच प्रवर्तनम् ।**
**वेदशब्देभ्य एवादौ निर्ममे स महेश्वरः ॥** शांति २३३।२४।२५॥
**सर्वेषां तु नामानि कर्माणि च पृथक् पृथक् ।**
**वेदशब्देभ्य एवादौ पृथक् संस्थाश्च निर्ममे ॥** मनु १।२१॥
असें म्हटलें आहे.

**त्रयमिदं नामरूपं वा कर्म तेषां नाम्नां वागेव उक्थम्** हें **शतपथ ब्राम्हणां**तील वचन प्रसिद्ध आहे.

असल्याचें आपण पाहिलेंच आहे. परंतु असें म्हटलें म्हणजे वाचा ही जगाचें मूळरूप अथवा उपादान कारण ठरूं पाहते. आणि तसें म्हटलें तर शद्ब हा नित्य व सत्य होऊन अध्यासवादास धक्का बसतो. त्याचप्रमाणें ' जन्माद्यस्य यतः, ' या सूत्राप्रमाणें ब्रम्ह हें जगाचें उपादानकारण म्हटलें आहे, त्याचा व या सिद्धांताचा घोटाळा होतो. यामुळें व इतरही * कारणांमुळें हा जो वेदसंबंधीं शद्ब आणि अर्थ यांचा संबंध कोणत्या प्रकारचा, याविषयीं आजपर्यंत अनेक प्रकारांनीं वाद झाले आहेत. आजच्या भौतिक शास्त्रांनीं सिद्ध होणारे ध्वनीचें आंदोलनात्मक स्वरूप, त्याकाळीं, म्हणजे आचार्योच्या काळीं, माहीत नसल्याकारणानें, व ज्या वेदपूवकालीं त्या शास्त्रांचा पूर्ण विकास होऊन **चातुर्वर्ण्य** वगैरे संस्था उत्पन्न झाल्या, तो काळ फारच प्राचीन असल्यामुळें, मध्यंतरीच्या काळांत, इतर अनेक शास्त्रांप्रमाणें, या विषयीचें शास्त्रज्ञानही नाहींसें झालें. त्यामुळें भगवान् **पतंजली, आचार्य**, वगैरेसुद्धां सर्वांनीं केवळ **मीमांसकादि**कांचीं मतें खोडून टाकून, शद्बाचा व अर्थाचा नित्यसंबंध हा शद्बदृष्ट्या नित्य नसून त्या अर्थाचा जो भाव, त्या दृष्टीनेंच नित्य आहे,—म्हणजे वेदवाणींतील शद्ब हे मनुष्यकृत मानावेत व त्यांतील अर्थ नित्य मानावा, असा सिद्धांत केला. परंतु **आचार्योच्या अध्यासवादास** धक्का न लागतां, अर्वाचीन शास्त्रांच्या साह्यानें देखील हें सिद्ध करून दाखवितां येईल कीं वाचा ही जगाचें उपादान कारण नसलें, तरी, कोणत्या तरी एका उपादान कारणाचीं तीं अभिन्न रूपें आहेत. केवळ कार्य—कारणाप्रमाणें त्यांच्यांत संकोच विकासाचा संबंध आहे.

ब्रह्मांडाची जी ही घडामोड अखंड चाललेली आहे, ती आमच्या शास्त्राप्रमाणें, सर्व आकाश तत्वांत आहे. या सर्वाचें मूलरूप आकाशतत्व. अर्वाचीन शास्त्रांप्रमाणेंही सर्व प्रकारच्या घडामोडीला कांहीं तरी एक आधारभूत द्रव्य आहे, व त्या द्रव्याच्या परमाणूंचा हा खेळ आहे. परंतु दोघांनाही एक गोष्ट पटलेली आहे, ती ही कीं या सर्व खेळाचें मूलरूप या मूळ परमाणूंचें गतिस्वरूप होय. अर्वाचीन

---

* यांतील मुख्य म्हणजे वेदाच्या अपौरुषतेयतेची व नित्यत्वाची आणि शाखाभिन्नत्वाची कांहीं केल्या पूर्वपंडितांस सांगड घालतां येईना हें होय. शेवटीं त्यांनीं ' यद्यप्यर्थो नित्यो या त्वसौ वर्णानुपूर्वी साऽनित्या । तेभ्देदादेतद्भवति काठकं, कालापकं, मौदकं, पैप्पलादिकमिति ' । अशी त्याची वाट लाविली !

शोधाची अंतिम सीमा जी Electrons *ची कल्पना तिच्या प्रकाशांत पाहूं लागलें तर, जड वस्तु म्हणून कांहीं आढळतच नाहीं. खोल दरींत पाहणाऱ्या माणसाची नजर फिरून त्यास भोंवळ येते, त्याप्रमाणें मनुष्याच्या बुद्धीस भोंवळ आणणाऱ्या कल्पनातीत वेगानें निरनिराळ्या गतींनीं फिरणाऱ्या Electrons चे संघ म्हणजे कोणतीही वस्तु. या भयंकर गतिमुळें आधारभूत असलेलें जें आकाशासारखें तत्व, तें अखंड आंदोळलें जात असतें. परंतु ही गोष्ट इतकी सूक्ष्म आहे कीं, अत्यंत सुधारलेल्या यांत्रिक साधनांचा फायदा घेऊनही अजून ती इंद्रियगोचर होत नाहीं. मानवी इंद्रियांस त्यांतील अतीशय स्थूल अशा कांहीं आंदोलनांचेंच प्रत्यक्ष ज्ञान होऊं शकतें. प्रकाश आणि ध्वनि हीं, वस्तुतः वर सांगितलेल्या एका मूलद्रव्यांत ठराविक वेळांत घडलेल्या आंदोलनांच्या निरनिराळ्या संख्या आहेत. एका सेकंदामध्यें अमुक एक प्रकारचीं आंदोलनें झाली असतां कानाच्या पडद्याच्या अथवा दातांच्या वगैरे द्वारांनीं त्यांचें संवेदन कर्णेंद्रिया ( Auditory nerves ) मधून होतें, असा आजकालचा सिद्धांत आहे. ही कर्णेंद्रिया ( Auditory nerves) ची शक्ति, जशी मायक्रॉस्कोपनें नेत्रेंद्रियाची शक्ति वाढविली आहे तशी जर कांहीं उपायानें वाढवितां आली, तर, ज्याप्रमाणें आज, पदार्थांतील निरनिराळ्या प्रकाशांचा शोध लागत आहे, त्याप्रमाणें, पदार्थांतील निरनिराळ्या ध्वनींचा शोध लागेल. म्हणजे, या व्यक्तसृष्टींत जड अशी कांहींच वस्तु नसून सर्वत्रा अनंत, अपरिमित, गति आहे. काल, क्रम आणि, ती गति यांच्या परस्पर प्रमाणांवरून सृष्टींतील पदार्थांचा वेगळेपणा भासतो. खुद्द मनुष्य शरीर, ज्यांच्याद्वारें या गतीचा ज्ञानरूप परिणाम मेंदूवर होतो, तीं इंद्रियें, व स्वतः मेंदु, हीं सर्वही या अखंड एकरस गतिसागराचेच अभिन्न भाग आहेत. येथपर्यंत अर्वाचीन शास्त्रज्ञांनीं मजल गांठली आहे. § परंतु असे ते अभिन्न भाग

---

* इलेक्ट्रोन म्हणजे गतिस्वरूप विद्युत्परमाणु.

§ The tendency of modern physics is to resolve the whole material universe in to waves, and nothing but waves. These waves are of two kinds: bottled up waves, which we call radiation or light. If annihilation of matter occurs, the process is merely that of unbottling imprisoned wave energy and setting it free to travel through space. These concepts

असतां, इतर गतींचें व क्वचित् स्वतःचेंही§ भिन्नपणानें भान त्यांस कां होतें, व तें कोणास होतें; हा प्रश्न अजून कोणासही सुटत नाहीं. आकाशांत विमानें उडवून आणि परमाणूंच्या अंतःकरणाचा ठाव घेऊनही 'ज्ञान ही काय वस्तु आहे ?' म्हणून शोधास निघालेला तत्ववेत्ता उलट हताश होऊन पुन्हां मूळपदावर 'रामाची सीता कोण ?' असा प्रश्न घोकतांना दिसतो. वनस्पतींच्या अंतःकरणांत शिरून, प्रेमळ सखीप्रमाणें त्यांच्या सुखदुःखाच्या कहाण्या ऐकणारे जंगदीशचंद्रासारखे त्रिखंड-पंडितही, सर्व शास्त्रीय प्रगतींनीं या गूढाचा उलगडा न होतां, उलट तें अधिक अधिक गूढ होत आहे, ( The mystery * is deepened ) असेच उद्गार काढतात ! असो. याप्रमाणें, Electrons सारख्या परमाणूंची गति, आणि त्यामुळें आकाश–तत्वांत होणारें अखंड आंदोलन, हें जगाचें खरें स्वरूप ठरल्यामुळें, आणि आंदोलन हें ध्वनिरूप असल्यामुळें दुसऱ्या रीतीनें असें म्हणतां येतें कीं, सारें जग ध्वनिरूप आहे. तंत्रशास्त्र जगाचें मूळरूप 'नाद' आहे, असें मानतें, सांख्यशास्त्राप्रमाणेंही आकाश हें 'शब्दगुण' आहे. असा एवढ्यापुरता तरी अर्वाचीन शास्त्रें व आमचीं शास्त्रें यांचा जुळता सिद्धांत आहे. परंतु आमच्या शास्त्रांनीं जास्त पलीकडे जाऊन ही सर्व गति, केवळ स्वयंभू नसून तिला नियंत्रित करणारी तिच्या पलीकडील, व तिला व्यापून असणारी, आणि जिला या गतीचें ज्ञान होतें, अशी अखंड ज्ञानमय अशी 'इच्छा' आहे, असा शोध लावला, आणि त्यामुळें शब्दांतील उत्पादक शक्तीचें रहस्य त्यांना कळूं शकलें. कोणतीही व्यक्त वस्तु शब्दाचेंच एक व्यक्त रूप आहे, हाच 'पदार्थ' या शब्दाचा भाव आहे; कोणत्या

---

reduce the whole universe to a world of light, potential, or existent, so that the whole story of its creation can be told with perfect accuracy and completeness in the six words "God said 'let there be light.'"

**The Mysterious Universe.**

**Sir James Jeans.**

p. 77 - 78.

§ 'In this vision of truth the final mystery of things will, by no means be lessened but greatly deepened.'

Preface. Plant autographs and their revelations.

**Dr. J. C. Bose.**

तरी शद्वाची मानवी ज्ञानास वेगळ्या रीतीनें प्रतीत होणारें स्वरूप आहे, ह्मणूनच त्यास पद=शद्व, त्याचा अर्थ=प्रतीति, असें ह्मटलें, व त्या शद्वावरूनच कोणत्याही 'अर्था'ला कारण कांहीं तरी 'पद' आहे, असें सिद्ध होतें. कालांतरानें 'पद' आणि 'अर्थ' यांचा हा कार्यकारणसंबंध विसरून जाऊन तो केवळ सांकेतिक आहे, अशी समजूत राहिली. असो. येथपर्यंत मजल गांठल्यावर या सृष्टीची गतिमयता आणि, नादमयता यांच्यासंबंधीं शोध करून त्यांच्याहून आपलें वेगळेंपण भाविणारा ज्ञान आणि इच्छामय जो जीव, त्यानें, त्या अखंड इच्छा आणि ज्ञानशक्तीशीं जर आपलें तादात्म्य केलें, तर त्यालाही या नादमय आणि गतिमय विश्वास नियंत्रित करतां येईल, असा सिद्धांत स्थापित करून निरनिराळ्या प्रकारांनीं तें तादात्म्य संपादून आपल्या इच्छेप्रमाणें विश्वांत घडामोड कशी घडून आणावी, याचें जें शास्त्र ठरलें गेलें, त्याचें नांव योगशास्त्र. याचा सिद्धांत असा आहे कीं या गतिमयता आणि नादमयता या जरी अभिन्न भासतात, तरी त्या दोन वेगळ्या स्वतंत्र शक्ति असून, त्यांचें एकमेकांत रूपांतर करतां येतें. पातंजलसूत्राच्या विभूतिपदाचा उद्देशच याचें ज्ञान देण्याचा आहे. त्यांतील निरनिराळे 'परिणाम' आणि विशेषतः '**क्रमान्यत्वं परिणामान्यत्वे हेतुः** ॥' हें सूत्र, व चौथ्या पादांतील '**जात्यंतरपरिणामः प्रकृत्या पूरात्**' यामध्यें हेंच मोठें तत्व सांगितलें आहे. तें खोटें आहे, असें ह्मणण्याचा, 'संयमा'पर्यंत पातंजलाच्या पद्धतीनें अनुभव घेतल्याखेरीज कोणत्याही शास्त्रसंशोधकास अधिकार नाहीं. आतां हें काम आपल्या आटोक्याबाहेरचें वाटत असेल तर, या त्र्यंबकचापास दुरूनच नमस्कार करा. परंतु 'त्यांत काय आहे ? एक जुनें कुजकें कांबीट,' असें ह्मणून स्वतःस उपहासपात्र करून घेऊं नका.

या ठिकाणीं थोडें विषयांतर करूनही पातंजलासंबंधीं एक दोन शद्व लिहिणें जरूर आहे.

गीतारहस्यांतील 'गीतेंतील कर्मयोग प्रवृत्तिपर तर पातंजलयोग त्याच्या अगदीं उलट ह्मणजे निवृत्तिपर आहे, (आवृति १।५२६) हें विधान वाचून या शास्त्राची आधुनिक विद्वानांनीं केवढी हेळसांड केली आहे, तें लक्षांत येतें. 'सत्वपुरुषयोः शुद्धिसाम्यम्' हें त्याचें ध्येय आहे, ह्मणून त्याला जर निवृत्तिपर ह्मणावयाचें, तर 'न द्वेष्टि न कांक्षति' असा पुरुष 'शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति' असें सांगणारी गीताही निवृत्तिपरच ह्मटली पाहिजे. एरवीं,

अनुष्ठानाच्या दृष्टीनें पाहिलें तर, ज्या जगाकरितां निष्कामकर्म करावयास गीता शिकविते, त्या जगाचे सर्व व्यापार प्रत्यक्ष चालविण्याइतकी क्रियाशक्ति संपादण्यास जें शास्त्र शिकवितें, त्यास निवृत्तिपर कोण ह्मणेल? परंतु शास्त्रीयदृष्ट्या त्याचा अभ्यास केलेले या मधल्या काळांत कोणी फारसे आधुनिक विद्वान सांपडत नाहींत. तरी पण, अगदीं नाहींत असेंही नाहीं. केवळ त्या शास्त्राच्या संशोधनास लागलेलेच नव्हे तर, त्यांत सिद्धि संपादून अधिकारवाणीनें त्याचा विचार सांगणारेही कांहीं थोडे झाले, हें मागें उल्लेखिलेल्या चार पांच नांवांवरून ध्यानांत येईल. सुदैवानें बुद्धिमत्ता व्यासंग, प्रयत्न इत्यादि कोणत्याही बाबतींत एडिटरी विद्वानांना कांहीं खोड काढतां येणार नाहीं, अशीं तीं नांवें आहेत. पाश्चात्य सरस्वतीच्या उदकानें दीक्षित होऊन, आणि अर्वाचीन चिकित्सकबुद्धीचा दगड एका हातांत घेऊनच ते संशोधनास बसले. आतां, हीं नांवें थोडीं आहेत हें खरें; परंतु **प्रो. रमण** आणि **बोस** हे केव्हांही थोडेच असणार. इतरही सुशिक्षित लोक या मार्गास लागलेले किती एक दाखवितां येतील. परंतु त्यांच्या साक्षी न पटण्यास दुराग्रहापलीकडे कांहीं कारण दिसत नाहीं. संशोधनास लागलेल्या अशा लोकांपैकीं चांगले चांगले लोक बारगळून त्यांतून अनेक प्रकारचीं थोतांडें बाहेर आलेलीं दिसतात, हेंही त्यांचें एक कारण असेल. परंतु तो शास्त्राचा दोष नाहीं, संशोधकाची नालायकी अथवा दुर्दैव होय. तेवढ्याकरितां अडून राहणें, हें खऱ्या शास्त्रजिज्ञासूचें काम नव्हें. उलट, अशीं थोतांडें होतात, ह्मणून, स्वतः कमर बांधून इमानदारीनें संशोधनास लागणाराच खरा जिज्ञासू. असो. सांगावयाची गोष्ट इतकीच कीं, या शास्त्राचें महत्व जर पुरेसें लक्षांत येईल तर, आधुनिकांच्या संशोधनास वेगळें वळण लागल्यावांचून राहणार नाहीं.

लोकवार्तेप्रमाणें—

**योगेन चित्तस्य पदेन वाचाम्**
**मलं शरीरस्य च वैद्यकेन ।**

याप्रमाणें ज्ञानांबरांत तळपणारा त्रिसर्गतरणि **पतंजली** हा एकच आहे, कां अनेक आहे, त्याचा काल कोणता, वगैरे प्रश्न **पातंजलसूत्रां**संबंधीं अप्रस्तुत आहेत. प्रयोगानें ज्या शास्त्राची प्रत्यक्षता अनुभवावयाची आहे, त्याच्यासंबंधीं तें काल झालें कीं परवां झालें, भुतानें केलें कां देवानें केलें इत्यादि प्रश्नांचीच आधी चर्चा करीत बसणें ह्मणजे, आइसक्रीमपॉटची दांडी फिरविण्याच्या ऐवजीं तें या कंप-

नीनें केलें कीं त्या कंपनीनें केलें त्याची किंमत पांच रुपये आहे कां पंधरा रुपये आहे, तें सखुबाईनें आणलें कां ठकूबाईनें आणलें, असले वाद करण्यासारखें आहे. त्याचाच आनंद असणारेही कोणी असतील, नाहीं असें नाहीं, त्यांनीं तें खुशाल करावें. आइसक्रीमचीलज्जत चाखण्याची हौस असलेला मनुष्य असें कधीं करणार नाहीं. तरीही त्या दृष्टीनें एकदोन गोष्टी सुचवून मूळ विषयाकडे वळूं.

**प्रातंजलसूत्रांचा** काल ऐतिहासिक दृष्टीनें ठरविण्याचें प्रत्यक्ष ज्ञापक म्हणजे एकच. त्यांतील सूत्रांचा उल्लेख सांपडणें अथवा '**पातंजलयोग**' असला शब्द उघड उघड सांपडणें.. तशा तऱ्हेचा उल्लेख कुठें सांपडतो, हें सांगणें माझ्या अल्पव्यासंगामुळें शक्य नाहीं. दुसऱ्या तऱ्हेचा पुरावा म्हणजे, 'योग' शब्दाचा उपयोग **पतंजलीच्या** पद्धतीनें केलेला आढळतो कीं काय, त्याचप्रमाणें, त्यातऱ्हेच्या अभ्यासपद्धती पूर्वी होत्या कीं काय, व त्या शास्त्राची घटना वगैरे पुरावा होय. गीतेची रचना ख्रिस्तीशकापूर्वी ५०० वर्षें इतकी जुनी आहे, हें **लो० टिळकांनीं** उत्तम सिद्ध केलें आहे, परंतु गीतेंत आलेला 'योग' शद्बाचा उल्लेख सर्वत्र 'कर्मयोग' या मूळ (!) अर्थानेंच आहे,·व **पतंजलीच्या** अर्थानें तो शद्ब मागून रूढ झाला असावा, असेंही म्हणण्यास त्यांची हरकत नाहीं. याचें कारण **पातंजलसूत्रें** निवृत्तीपर आहेत, असा दुर्ग्रह. **पातंजलसूत्रें** हा सिद्धांतग्रंथ नसून ती प्रक्रिया आहे, हें लक्षांत ठेवल्यास सारा दुरभिमान आपोआपच दूर होईल. बरें असें मानण्यास गीतेच्या काळीं अथवा तत्पूर्वी **पतंजलीच्या** तऱ्हेच्या अभ्यासपद्धति नव्हत्या, असें असतें तरी गोष्ट वेगळी होती. परंतु सहाव्या अध्यायांतील 'अभ्यासवैराग्याचा' उल्लेख, * पांचव्यांतील 'स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यान्' त्याचप्रमाणें आठव्यांतील 'भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्' वगैरे योग्याच्या देहत्यागाचें वर्णन 'ध्यानेनात्मनि पश्यंति' व 'कर्मयोगेन चापरे' हा तेराव्यांतील एकाच श्लोकांतला उल्लेख हे असे जबरदस्त आहेत कीं 'नमयन्नीव धरित्रीम्' अशा धीरोद्धतगतीच्या लोकमान्य **टिळकांनाही** या विषयीं चांचरत चांचरतच बोलावें लागलें आहे. आधीं कर्मयोग सांख्ययोग हे शद्ब कीं एकामूळ योगकल्पनेचे 'कर्मयोग' 'सांख्ययोग' वगैरे पर्याय, हें कोणीही न्यायशास्त्री सांगूं शकेल. ज्या अर्थी 'सांख्ययोग' 'कर्मयोग' असे वेगळे शद्ब वापरून 'योग' असा स्वतंत्र शद्ब वापरला आहे, त्या अर्थी त्याची मूळकल्पना काय असावी, हें ठरविणें फारसें कठीण

* '**अभ्यासवैराग्याभ्यांतन्निरोधः**'। पातंजलपाद १ सूत्र १२.

नाहीं. **पतंजलीच्या** पद्धतीच्या ध्यानाचा, त्या ध्यानामुळें प्राप्त होणाऱ्या आनंदाचा व सिद्धींचा उल्लेख **ऋग्वेदांत** हवा तितका सांपडतो. किंबहुना **पतंजलीच्या** ध्यान-पद्धतीनें उत्पन्न होणारी जी ' प्रज्ञा ' तिच्या द्योतक जो ' **ऋतंभरा** ' शब्द, त्याचें मूळ **ऋग्वेदांतच** आहे. ' विभूतिपादांत ' सांगितलेल्या ज्या सिद्धी, तशा तऱ्हेच्या शक्तींचा उल्लेख वेदांत वाटेल तितका आहे. किंबहुना, **ऋग्वेदांत, धी, बुध्दी,** हे व या अर्थाचे शब्द ध्यानाच्या अर्थानेंच वापरलेले आहेत. ' धिया ययागां अरिणीत चर्मणः ' किंवा ' येन हरि मनसा निरतक्षत ' अथवा ' यानि स्थानानि असृजंत धीराः' अशा तऱ्हेचें उत्पादन सामर्थ्य ध्यानानें अंगीं आणल्याचे हवे तेवढे उल्लेख आहेत. ध्यानानें उत्पन्न होणारें दिव्यज्ञान आणि दिव्य आनंद हे तर त्या सूक्तांचे मुख्य विषय आहेत, असेंच जवळजवळ ह्मणतां येईल. त्यानंतरच्या **बौध्द** वाङमयांतही **पतंजलींच्या** शास्त्रास धरून ध्यानपद्धति सांगितलेल्या आहेत. **गौतमबुध्द** स्वतः **षण्मुखी प्राणायाम** करीत असे. अशाच तऱ्हेचे पुरावे त्यावेळच्या **जैन** वाङमयांत-ही आहेत. खुद्द **पातंजलसूत्रां**कडे पाहिलें, तर, त्यांची रचना बहुतेक ' **सांख्य**' शास्त्रास धरून आहे असें दिसून येतें. **सांख्यांनीं** प्रकृति एक मानली असून पुरुष अनेक आहेत, असें धरिलें आहे. तेथें त्यांचा व **पातंजलाचा** विरोध आहे. परंतु एक गोष्ट स्पष्ट आहे कीं **पातजलावर** ' **वेदांता**'ची नुसती छाया देखील नाहीं. सूत्रांवर **व्यासांच्या** नांवावर मोडणारें एक भाष्य, **विज्ञानभिक्षूंचें** वार्तिक, **भोजवृत्ति, वाचस्पतिमिश्रांचें** भाष्य, आणखी एकदोन भाष्यें आहेत, असें ह्मणतात. अलीकडे स्वामी **विवेकानंदांनीं** इंग्रजींत भाषांतर केलें आहे, व मराठींतही **हेमाडपंत रेळे** यांचें पुस्तक प्रसिद्ध आहे. हीं सारींही भाष्यें **योगशास्त्राच्या** दृष्टीनें बहुतेक निरुपयोगी कशीं ठरतात, तें थोडक्यांत दाखवितां येणार नाहीं. **मल्ली-नाथाच्या** टीका ज्याप्रमाणें व्याकरणदृष्टीनें कितीही उत्तम असल्या तरी **कालि-दासाचें** हृदय उकलून दाखविण्याच्या दृष्टीनें कुचकामी आहेत, तसाच येथेंही प्रकार आहे, एवढें लक्षांत ठेवलें ह्मणजे पुरे आहे. पैकीं **व्यासभाष्य** हें कोणाचेंही असो, सर्वांत जुनें दिसतें. मात्र तें **बुद्धकालांतलें** अथवा त्यानंतर लागलींच असावें. त्यांत ' **वैनाशिक** ' ह्मणून '**बौद्धां**'चा वारंवार उल्लेख आहे, **सांख्यशब्दही** स्पष्ट आढळतो. आणि **वेदांत्यांनीं** खोडून टाकलेला ' **स्फोटवाद** ' अंगिकारला आहे. ( विभूतिपाद, सूत्र १७ ) त्या सर्वांवरून, व विशेषतः **असुर** लोकांच्या रसायनशास्त्राची तारीफ केली आहे त्यावरून तें बरेंच जुनें असावें, असें वाटतें. कारण

**नागार्जुना**नंतर **असुरांच्या** रसायनशास्त्राची कोणी तारीक करीलसें वाटत नाहीं. पाद ४ सूत्र १ यावरील टीकेंत 'ओषधीसिद्धी' संबंधीं **'रसायनेन असुरभवनेषु'**, असे म्हटलें आहे. त्याचप्रणेंाम, **'भुवनज्ञानं सूर्येसंयमात्'** या सूत्रावरील विवरणांत आलेली 'महेंद्रलोक' 'प्रजापतिलोक' वगैरे भाषा, 'पाताल' व 'नर्क' यांसही 'भूलोक' म्हणून दिलेली संज्ञा, आणि 'दिघ्घनिकाय' यासारख्या बौद्धपरिभाषेची आठवण करून देणारे नानाप्रकारचे 'देवनिकाय' वगैरे संज्ञा, यांवरूनही त्या भाष्यांच्या प्राचीनत्वाचा बोध होतो. या भाष्यांत आलेल्या अनेक अवतरणाचा चांगला शोध व्हावयास पाहिजे. तोंपर्यंत निश्चितपणानें कांहीं लिहितां येत नाहीं. वर सांगितलेल्या अनेक गोष्टींप्रमाणें आणखीही एक महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. निष्कामपणानें सर्व कर्म ईश्वरास अर्पण केलें असतां, नुसती समाधीसिद्धिच तर काय, पण ज्याच्याकरितां ती साधावयाची, तो **'असंप्रज्ञात योग'** ही सिद्ध होतो, असा दोन तीन ठिकाणीं विषय असून, या **ईश्वरप्रणिधानाला** पाद २ सूत्र १ यांत **क्रियायोग** असें स्पष्ट म्हटले आहे. म्हणजे, गीतेचा प्रतिपाद्य विषय असून, व तो संमत असून देखील, तिच्यासारख्या ग्रंथानें प्रचारांत आणलेला '**कर्मयोग**' ( अर्थात **रहस्यकारांच्या** अर्थाचा **कर्मयोग** ) हा शब्द न वापरतां मूळसूत्रांत, **क्रियायोग** ' असा शब्द वापरला आहे, व भाष्यांतही जर गीतेतील **कर्मयोगा**'चा **लोकमान्यांच्या** म्हणण्याप्रमाणें मूळ अर्थ असतां तर, गीतेचाच उतारा साहजिक आला असता, तसा नाहीं. **विज्ञानभिक्षूंच्या** लिहिण्यांत 'ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुतेजुन' या गीताश्लोकाचा आधार एके ठिकाणीं आला आहे. यावरून कांहीं निश्चित सांगतां येईलच असें नाहीं, परंतु इतक्या सर्व गोष्टी लक्षांत ठेवून सूत्रांचा अभ्यास झाला पाहिजे. असो. आपल्या प्रस्तुतच्या कार्यास लक्षांत ठेवण्याजोगी मुद्याची गोष्ट एवढीच आहे कीं, आधुनिकांस वाटतें त्यापेक्षां **पातंजलसूत्रें** ही जास्त सशास्त्र आहेत, इतकेंच नव्हे तर, आमच्या हल्लींच्या काळांतील अनेक धार्मिक क्रियायोगांस मूळ पाया त्यांचाच आहे, हें लक्षांत घेऊन त्यांचा दृढपरिचय करून घेतला पाहिजे. उगीच जातां जातां त्यावर नजर टाकण्याजोगती, अथवा निवळ विवेचक बुद्धीच्या कात्रींत कापून काढण्याजोगती ती गोष्ट नव्हे. अंतिम ध्येयाच्या दृष्टीनें **पतंजलींचा सांख्य व वेदांत** यांशी मतभेद आहे ही गोष्ट खरी, परंतु तो भेद **लोकमान्य** आणि **शंकराचार्य** यांच्यांतील 'च' काराच्या अगदीं शेवट-

च्या पायरीवरील वादासारखा आहे. अनुष्ठानाच्या दृष्टीनें त्यांच्यांत जसा ह्मणण्यासारखा कांहींच फरक नाहीं, तशीच हीही गोष्ट आहे. त्यामुळें प्रयोगशास्त्र्याचें घोडे अडून बसण्याचें कारण नाहीं. उलट संयमासारखें साधन संपादून मनुष्याच्या बुद्धिंद्रीयास अगोचर अशा प्रांतांत शिरून, स्वतःच्या अनुभवानें हा वाद तोडण्याची त्यानें उमेद धरली पाहिजे. आमच्या वर्ण्यविषयांत जेथें तेथें **पातंजलाचा** हवाला असल्यामुळें त्या शास्त्राचें महत्व ध्यानांत आणून देण्याकरितां, व त्यामुळें विद्वानांचें लक्ष तिकडे लागून, जितकी अधिक चर्चा होईल तितका फायदाच होईल, अशा सद्धेतूनें मुद्दाम केलेलें हें बिषयांतर संपवून मूळ विषयाकडे वळूं.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें व्यक्त सृष्टीची नादमयता वाचकांच्या लक्षांतून गेली नसेलच. Electron विषयीं देखील तो एक Electric Charge आहे, या पलिकडे शास्त्रज्ञ जास्त आज कांहीं सांगू शकत नाहींत. अशा स्थितींत परमाणूंचें वास्तविक स्वरूप त्यांना देखील जास्त काय सांगतां येणार आहे ? परंतु त्यांतल्यात्यांत तो एक शक्तिबिंदु आहे, ( Atom ह्मणजे A Centre of energy * ) एवढेंच ते ह्मणूं शकतात. ही गोष्ट अनुभवानें जाणूनच मंत्रशास्त्रानें व्यक्त सृष्टीस 'नादबिंदुकलामयसुंदरी,' असें गौरविलें आहे. आतां यापुढील सूक्ष्म सिद्धांत असा आहे कीं, व्यक्त परमाणूच्या नादबिंदु व कला ( विस्ताराकरितां व प्रस्तुत विषयाशीं विशेष संबंध नाहीं ह्मणून कला × शब्द तसाच सोडून देऊं ) वगैरे शक्ति, व त्याचप्रमाणें त्यांचें भिन्नत्वानें भान अनुभविणाऱ्या परमात्म्याच्या अथवा तदंश जो जीवात्मा त्याच्या इच्छा, क्रिया, ज्ञान, अनेक प्रकारच्या संवेदना, प्रत्यभिज्ञा वगैरे शक्ति जरी अगदीं एकरूप दिसल्या तरी त्या देखील वेगवेगळ्या आहेत, व विशेष प्रकारच्या प्रयत्नांनीं त्या प्रत्येकीचा पृथक् अनुभव घेतां येतो. आणि त्यावरून दुसरा सिद्धांत असा आहे कीं, ज्याला त्या तशा अनुभवितां येतात, त्याला त्यांचें एकमेकींत रूपांतर करितां येतें. विभूतिपाद, सूत्र १७, '**शब्दार्थप्रत्ययानां इतरेतराध्यासात् संकरः**' यांत हेंच

---

* परमाणु ह्मणजे शक्तिकेंद्र.

× कलाः ( कलयति to go, to impel, to put together, to sound ) धात्वर्थाप्रमाणें याचाही अर्थ undulation, wave असा होतो मागील एका टीपेतील Sir James Jeans चा उतारा पहा.

तत्व प्रतिपादिलें असून, त्यांतील प्रत्येक शक्ति पृथक्पणें प्रत्ययास येण्याकरितां केल्या जाणाऱ्या संयमानें भूतमात्राची भाषा कळण्याची सिद्धि येते, असें सांगितलें आहे. योगशास्त्राच्या दृष्टीनें या सूत्रावरील भाष्य अगदींच टाकाऊ असून त्यांतील **स्फोटवाद** तर **आचार्यांच्या** विचारसरणीनेंच उडविला गेला आहे. पण त्याचा विचार येथें कर्तव्य नसून अभिन्न शक्तींच्या पृथक्प्रत्ययापुरतीच त्याची साक्ष आपणास पाहिजे आहे. त्याचप्रमाणें, वेगवेगळ्या प्रयोजनांकरितां केले जाणारे **संयम** हे कसे करावयाचे असतात, हें त्या शास्त्रांतील प्रयोगरहस्य आहे. त्याचाही विचार आपणास करतां येणार नाहीं. नाहींतर, तेंच एक महाभारत होऊन बसेल. सारांश गोष्ट इतकीच कीं, सर्व नियामक व सर्वसाक्षी जाणीवेस या संकलित शक्ति पृथक्पणें अनुभवितां येतात, आणि ह्मणूनच नानाप्रकारच्या सिद्धीचे चमत्कार ती दाखवूं शकते. व्यक्तसृष्टि हा ज्या 'क्रमां'चा 'परिणाम' आहे, तो 'क्रम' बदलला ह्मणजे झालें. हेंच तत्व * '**क्रमान्यत्वं परिणामान्यत्वे हेतुः**' यांत प्रथमतः सिद्ध करून निरनिराळ्या सिद्धींस सूत्रांत प्रारंभ केला आहे.

अशा प्रकारें व्यक्तपरमाणूंची त्रिविधता सिद्ध झाल्यानंतर त्यांच्यांतील क्रमाचा प्रश्न अर्थातच पुढे आला. व त्याविषयीं या शास्त्राचा सिद्धांत तो क्रम बिंदुनादकलाज्योति § असाच असला पाहिजे, असा आहे. 'सभूरिति व्याहृत्' 'स भूमिमसृजत्' इत्यादि वचनांवरूनही हेंच स्पष्ट होतें. तेव्हां व्यक्तसृष्टीचें मूळ स्वरूप शब्द हें निश्चित होऊन एवढें ठरलें कीं शब्द आणि व्यक्तसृष्टीची नानाप्रकारची व्यक्तता यांचा एक तऱ्हेनें कार्यकारणसंबंध व एक तऱ्हेनें अभेद आहे. कारण कार्य ही कारणाचीच विशेष अवस्था आहे, हा सिद्धांत सर्वमान्य आहे. अशा रीतीनें सृष्टींत सर्वत्र कारणाची कार्यांत अखंड परिणति होत असलेली आणि कार्याचें कारणांत रूपांतर होत असलेलें अनुभवास येतें. तें ईश्वर कां करतो, हा भाग वेगळा. परंतु तोच प्रकार अत्यंत सूक्ष्म प्रमाणानें कां होईना, जर मनुष्यजीवास करावयाचा असला, तर त्यास तें कारण आणि स्वतः आपण यांच्यामध्यें एक तिसरा पदार्थ घ्यावा लागतो. तो मानवी शरीर हा होय. त्याचें शास्त्रज्ञांस अणखर वाटण्याचें कारण नाहीं. रासायनिक प्रयोगांत Cataletic agent ह्मणजे मध्यस्थ द्रव्य,

---

* या सूत्रांवरील विद्यमान कोणचेंही भाष्य शास्त्ररहस्याच्या दृष्टीनें केवळ निरर्थकच नव्हे तर दिशाभूल करणारें, अतएव चुकीचें आहे !

§ याचें स्पष्टीकरण परिशिष्टांतील नकाशांत पहा.

त्याचा कसा उपयोग होतो, हें जरी ठाऊक नसलें तरी वापरावें लागतें, त्याखेरीज प्रयोग सिद्ध होत नाहीं, हें त्यांच्या उत्तम परिचयाचें आहे.

नादबिंदुमयता हें जसें व्यक्त परमाणूचें स्वरूप ठरलें, तसेंच जीव ह्मणजे संकल्पाचें एक गांठोडेंच, हेंही ठरलेलें आहे. शरीराच्या द्वारें स्वतःचा संकल्प व्यक्त करण्याचा त्याचा स्वभाव असल्यामुळें, त्याच्या शब्दमय संकल्पाची परिणति ही शरीररूप साधनाच्या द्वारेंच होते. ह्मणजे, एका तऱ्हेनें या बाबतींत तो परतंत्र असून, त्यास आपलें काम या साधनाच्या तंत्रानें घ्यावें लागतें. मात्र याचा अर्थ असा नाहीं कीं, तो या साधनाचा गुलाम आहे. मांडीखालील घोड्यास स्वार जसा थोडा त्याच्या तंत्रानें वागून, वाटेल तसा राबवितो, तशी ही गोष्ट आहे. हें साधन असावें तसें असल्यास, त्याचा उपयोग करण्यास अथवा दुरुपयोग करण्यास, आणि असावें तसें नसल्यास, तें हवें तसें करून घेण्यास तो स्वतंत्र आहे. तेव्हां, त्याला जर, आपला शब्द सिद्धसंकल्प व्हावयास पाहिजे असेल, तर, ज्या शरीररूपी तंतुवाद्यांतून तो उमटावयाचा आहे, तें वाद्य अनुकूल अशा सुरांत लाविलेलें असलें पाहिजे. शरीर हें प्राणशक्तीच्यामुळें वागतें, हें सर्वांच्याच परिचयाचे आहे. एकाद्या प्रचंड कारखान्यांत नानाप्रकारांनीं खेळविलेल्या विजेप्रमाणें, या शरीरांतील अनेक बिंदूशीं निरनिराळ्या प्रवाहांनीं संबंध ठेवून, त्या बिंदूंत प्राणशक्ति इष्ट क्रिया करीत असते. या निरनिराळ्या प्रवाहांनाच योगशास्त्रांत '**नाडी**' * अशी संज्ञा दिलेली आहे. विजेच्या यंत्राप्रमाणेंच हे नाडीप्रवाह असावे तसे परस्परसंबद्ध आणि मोकळे नसले, तर अर्थातच त्या ठिकाणीं होणारी क्रिया एक तर होणारच नाहीं, झाल्यास, पाहिजे तशी होणार नाहीं, अथवा विपरीत परिणामकारकही होईल. § अगदीं व्यवहारांतील एका मजेदार साध्या दृष्टांतानें देखील ही गोष्ट लक्षांत येईल. **बालगंधर्वांचें** अतिशय गोड असें ' सुजनकसा मन चोरी, ' असें कांहींतरी पद लाविलेलें असावें, व ग्रामाफोनचा वेग अतिशय मंद व्हावा, ह्मणजे तेंच गोड सुर,

---

* ' स्थानानि स्थानिभ्यो यच्छति । नाडी तेषां निबंधनम् ॥ '

§ येवढ्याचकरितां **श्रीभगवद्गीतेंत** शरीरास क्षेत्राची किंमत येण्यांकरितां 'संघात' ह्मणजे शरीर घटकांचा एक प्रकारचा सुव्यवस्थितपणा हें एक तत्वच मानलें आहे. असा संघांत नसलेलीं शरीरें तिच्या मतानें क्षेत्रेंच नव्हेत. बरोबरच आहे. वाळूच्या मैदानाला शेत कोण ह्मणेल !

कानास कोणीतरी अतिशय उद्वेगानें रडत असं याप्रमाणें भासतात. असो. हा साराच भाग एका स्वतंत्र शास्त्राचा विषय असल्यामुळें आणि तेंही अतिशय अफाट शास्त्र असल्यामुळें, कितीही यत्न केला तरी अतिशय थोडक्यांत आणणें अशक्य आहे. केवळ आपला मुख्य मुद्दा लक्षांत यावा एवढ्याचपुरतें वर्णन आह्मीं केलें आहे. एवढ्यानें ह्मणजे वाचणाराचें निःशंक समाधान होईल असें नाहीं. तसें निःशंक व्हावयास, त्या शास्त्राचा स्वतंत्र अभ्यासच केला पाहिजे. आमचा मुख्य उद्देश जो आपल्या वर्ण्यविषयाची शास्त्रीयता दाखविणें, तेवढा जरी यानें साधला, व त्यामुळें या विषयावर तोंड उघडणाऱ्यांना तसें करण्यापूर्वी, थोडा विचार केला पाहिजे. असें वाटू लागलें, असें झालें तरी पुरे आहे.

शरीरांतील इतर क्रियांपेक्षांही शद्बशक्ति आणि प्राणशक्ति यांचा जास्त अभेद आहे. एकमेकांच्या साह्यानें शरीरांत या परस्परांस प्रेरणा करून व्यक्तदशेंत कशा येतात या विषयींचें शास्त्र फार सूक्ष्म असून, प्रत्यक्षच अनुभविलें पाहिजे. **श्रीमद्भागवतांतील** अकराव्या स्कंधांतील बाराव्या अध्यायांतील '**स एष जीवो विवरप्रसूतिः**' या श्लोकावर संत शिरोमणि **श्रीएकनाथ**महाराज यांची टीका आहे, ती या दृष्टीनें मोठी वाचनीय आहे. मराठी किंवा अर्वाचीन ह्मणून तिच्याकडे दुर्लक्ष करितां येणार नाहीं. मुखांतून एकादा असत्य शद्ब काढण्यापेक्षां आपल्या शरीराचे राईएवढे तुकडे करून घेणें ज्यांनीं पत्करिलें असतें, त्या सत्यसंध **श्रीनाथांनीं** आपल्या अनुभवाची गोष्ट ह्मणून त्यांचें वर्णन केलें आहे, हीच अतिशय महत्वाची गोष्ट आहे. आणि तेंही पुन्हां करणें भागच होतें, ह्मणून केलें नसून, अनुभविलेल्या गोष्टींची आठवण होऊन आलेली आनंदाची उर्मी आवरेना अशा प्रेमातिशयानें केलें आहे. असे आणखी इतरही साक्षीदार आहेत. सारांश, शद्बाची उत्पादकशक्ति अबाधित राहून त्याच्याद्वारें इष्ट गोष्टी करावयाच्या असतील, तर त्याला शरीर विशेष स्थितींत राखणेंच भाग आहे, आणि वरून जरी सारीं शरीरें सारखीं दिसलीं, तरी त्यांच्यामध्यें या अंतर्गतशक्तींच्या दृष्टीनें अतिशय फरक राहतो, हे दोन मुख्य सिद्धांत वर्णव्यवस्थेच्या मुळाशीं आहेत. आतां या दृष्टीनें शरीरांच्या पात्रापात्रतेचे चारक भाग कसे पडतात, व त्यांना 'वर्ण' अशी संज्ञा कां प्राप्त झाली, तें **ब्रह्मर्षि श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्रांत सांगितलेलें आहे, तेथून वाचावें. ही पात्रापात्रता प्रत्यक्षतेनें ठरवितां येण्याजोगतां आर्यसंस्कृतीचा एक अतिपरिणतकाल होता. **आकाशतत्वांतील आंदोलनें, ध्वनिरूपानें एका इंद्रियास**

**प्रतीत होतात, तशींच वर्णांच्या रूपानें दुसऱ्या इंद्रियास प्रतीत होतात म्हणून, वर्ण आणि ध्वनि हीं परस्परांचीं मापकें होत,** असा त्या विवेचनाचा थोडक्यांत सारांश आहे.

प्राणशक्तीचे शरीरांतील नानाप्रकारचे प्रवाह व केंद्रबिंदु जन्मतःच असावे तसे असलेलें शरीर फार क्वचित् सांपडतें, इतर सर्व शरीरांत या बाबतींत संकर झालेला आढळतो. तेवढ्याकरितां त्या शरीरांना विशेष शिस्तींत घालून तयार करावें लागतें. अशा संकरित प्रदेशांत काम करावयास आलेल्या जीवाला गोंधळल्यासारखें होऊन, तो मूढ होऊन जाणें साहजिक आहे. त्यामुळें, बाहेरून, जें इंद्रियद्वारा ज्ञान तो घेतो, तेंही सुसंबद्ध नसणें साहजिकच आहे. म्हणूनच कोणत्याही बाह्यअर्थाच्या मूळपदाचा बोध त्यास न होतां, लोकपरंपरेनें वेगळ्याच पदाचा बोध होऊन, मानवीसंकेतानें एक वेगळाच पदार्थसंबंध उत्पन्न होतो. या संकरित संबंधाला संस्कृतांत '**भाषा**' असें म्हटलें आहे. आणि म्हणून संस्कृतांत '**छंद**' आणि '**भाषा**' असें वाचेचे दोन प्रकार झाले. या सर्व गोष्टी अगदीं सशास्त्र असून त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेणारे बाबू **अरविंदांसारखे** महात्मे अजूनही हयात आहेत. असें असतां, केवळ 'पोथीजात' म्हणून त्यांचा तिरस्कार करून, कोणीही 'दुरात्म'तेस पात्र होणें योग्य नाहीं. एवढा या विषयाचा विस्तार करून, जेथें या विषयांतरास सुरुवात झाली. त्या मूळ ठिकाणीं आपण परत जाऊं.

पण त्यापूर्वी अशा रीतीनें शब्दार्थांचा नित्यसंबंध स्थापित केला, तरी त्यामुळें इतर कोणत्या वादास तर नाहींच पण अध्यासवादासही धक्का कसा बसत नाहीं, हेंही थोडक्यांत पाहिलें पाहिजे. वेदांत–सूत्रांप्रमाणें ब्रह्म हेंच जगताचें उपादान कारण असून, इतर सर्व अध्यास आहे, व ब्रह्माखेरीज बाकीचें जें जें भासतें, तो अध्यास असून त्यास खरोखर सत्ता अशी नाहींच, असें जें **शंकराचार्यांनीं** म्हटलें आहे, तें केवळ परमार्थतः आहे. जगताची परमार्थिक सत्ता जरी त्यांनीं अमान्य केली, तरीही त्याची व्यावहारिक सत्ता मान्य करणें त्यांनाही भागच होतें. गारोड्याचा सांप कितीही खोटा म्हटला तरी हातास डसून रक्त काढीत होता, ही गोष्ट **वामन पंडितांस** नाकबूल करितां येइना. असो. एकदां जगताची व्यावहारिक सत्ता म्हटली कीं त्यांतील सर्व कार्यकारणादि नियमांच्या प्रणालिका, व्यावहारिक सत्तेच्या दृष्टीनें कां होईना, जशाच्या तशाच घेणें भाग पडतें. आणि

त्या तशा घेतल्या म्हणजे, नाद हें जगताचें मानवी बुद्धीच्या आटोक्यांत येणारें अध्यस्त व्यक्ततेतील 'धातायथापूर्व' असें नित्य उपादान कारण असून, नाद हा देखील अध्यासच आहे, व त्याच्यासुद्धां सर्वांचें ब्रह्म हे बुद्धीलाही अग्राह्य असें 'बुद्धेः परतः' असें पारमार्थिक उपादानकारण आहे, असें म्हटलें म्हणजे झालें.

याप्रमाणें परमाणूंचें स्वरूप ध्वनिमय ठरल्यामुळें सर्व जग अर्थातच नादब्रह्म ठरलें. ध्वनी हा दोन प्रकारचा आहे. एक नाद, आणि दुसरा वाक्. ज्याच्यांत कोणत्याही प्रकारचा हेतु नाहीं, असा केवळ आघात क्रियेमुळें घडून आलेला ध्वनी म्हणजे नाद. परंतु ज्यावेळेला हा नाद साभिप्राय असतो अथवा त्यायोगानें नाद उत्पन्न करणाऱ्याच्या कांहीं मनोवृत्ति दुसऱ्या जीवास पोहोंचवून तेथें-ही तशाच कांहीं मनोवृत्ति उत्पन्न व्हावयाच्या असतात, अशा उद्देशानें केलेला ध्वनि म्हणजे 'वाक्.' म्हणजे अर्थातच, त्या दळणवळणाचें तें एक साधन होऊन दोन जीवांचें, भिन्नपणा कायम राहूनही एकीकरण ज्या नादानें होतें, त्याचें नांव वाक्. या वाचेचे प्रकार साहजिकच दोन आहेत, असें आपण मागें पाहिलें. जड शरीराच्या आंत कोंडलेला जीव, आपली ज्ञानमयता विसरून जातो. त्यामुळें त्याला सारें ज्ञान बाहेरून जसें मिळेल तसें गोळा करावें लागतें. त्यामुळें, मनुष्यकृत संकेतांनीं वाटेल त्या अर्थाचें वाटेल तें पद त्याच्या डोक्यांत बसतें. व त्या अर्थाची खरोखर जी 'वाक्,' ती तो विसरून जातो. बरें, यदाकदाचित् तशा प्रकारची अगदीं बरोबर पदयोजना त्याला कळली, तरी त्याची वाचा प्राणशक्तीबरोबर या शरीराच्या अनेक नाड्यांतून आपला मार्ग काढीत व्यक्ततेला येत असल्यामुळें, तेवढ्यावेळांत तिची शक्ति जिरून जाऊन, भर्जितबीजाप्रमाणें ती निर्वीर्य होते. म्हणजे शब्दाची मंत्रमयता जर अनुभवावयाची असेल, तर एकीकडून ज्यांतील सर्व शक्तिप्रवाह मोकळे व शुद्ध आहेत, असें प्रकृतिस्थ शरीर, व दुसरीकडून, ज्याचें नैसर्गिक स्वरूप कायम आहे, अशा प्रकारचा शब्द, अशी उभयविध सामग्री लागते. अर्थात् अशा प्रकारचें शरीर बीजतःच उत्पन्न व्हावें, व तें तसें टिकावें, म्हणून जें शास्त्र निर्माण झालें, त्यांतून या **चातुर्वर्ण्या**चा उगम झाला. इतर धर्मांनीं ही शब्दाची मंत्रमयता ओळखली, पण तिचा सामुदायीक उपयोग करून घ्यावा, इतकी त्यांच्या अनुभवाची पोंच न गेल्यामुळें, त्यांना त्याचें एक शास्त्र बनविण्याची आवश्यकता वाटली नाहीं. त्यामुळें इतिहासाच्या क्षेत्रांत एकवेळेला आपला काळ गाजवून ते जे बाजूला पडले आहेत, ते तसेच पडले आहेत. धर्म या नात्यानें

त्यांतील कित्येकांची कामगिरी संपलेली दिसते आहे, व कित्येकांची संपत आली आहे. वैभवाचे दिवस पहावेत, सृष्टिक्रमाप्रमाणें आपदाही काढावी, व शेंकडोंवर्षे हालअपेष्टा सोसूनही, कात टाकलेल्या फणींद्राप्रमाणें पुन्हां तेजानें तळपूं लागावें, हें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं नाहीं.

शद्राची उत्पादकता जशी स्वयंभू आहे, तशाच प्रकारची शरीराची उत्पादकता हीही स्वयंभू आहे. व त्यामुळें कमीअधिक संकरानें मनुष्यजातीचे केवळ पांचच प्रकार कसे होऊं शकतात, हें **श्रीअण्णासाहेबांच्या** चरित्रांत दाखविलें. सृष्टिकृत वर्णभेद तो हाच. येथपर्यंत झालेल्या विवेचनांना कोणाचाही फारसा अडथळा येईल, असें वाटत नाहीं. हा इतका स्वयंभू असल्यामुळें, **श्रीमत् भगवद्गीतेंत**, ईश्वरी भावनेवर आरूढ होणाऱ्या **श्रीकृष्णांनीं** 'सृष्ट' असें सार्थ पद घातलें. परंतु त्याचें रहस्य 'गुणकर्म विभागशः ' असें म्हटल्यामुळें पुन्हां घोंटाळा झाला. **श्रीमत् गीतेंत** 'गुण' हे दोन प्रकारचे आहेत, असें स्पष्ट सांगितलें आहे. एक ' प्रकृतिज ' गुण, आणि दुसरा ' स्वभावप्रभव * ' हे दोनही जरी अगदीं परस्पर निरपेक्ष नसले तरी पुष्कळसे स्वतंत्र आहेत. प्रकृतिज गुणांपासून मुक्त असलेलें एकादेही 'सत्व' या सृष्टींत सांपडावयाचें नाहीं, असें **श्रीभगवानच** म्हणतात. स्वाभाविक गुणांची गोष्ट तशी नाहीं. ते मनुष्यास पालटणें शक्य आहे, म्हणून ते तसे पालटूं नयेत, अशा प्रकारची सूचना समाजस्थैर्याकरितां अठराव्या अध्यायांत दिली आहे. याचा अर्थ असा कीं ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य हा भेद, केवळ सत्व, रज, तम या तीन प्रकृतिज गुणांवर बसविलेला नसून कांहीं तरी स्वतंत्र धोरणावर बसविला आहे. त्या धोरणाला अनुसरून त्यांचे त्यांचे स्वभाव त्याकालीं जे बनले, त्यामुळें त्यांचीं कर्में कशीं वाटलीं गेलीं, तें सांगितलें आहे. म्हणूनच :—

' शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ' ।

---

* प्रकृतिज गुणांत फक्त सत्व, रज, तम, या गुणांचा अथवा त्यांच्या मिथुनीभावांचा अंतर्भाव होतो. स्वभावप्रभव गुणांत निरनिराळ्या कर्मांची प्रवृत्ती आहे. ती पुढील श्लोकांतच सांगितली आहे. स्वभावांत ' इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ, अशी व्यवस्थिति व ' इच्छाद्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ' हीं सर्व येतात.

असा स्वभाव असलेला **दुर्वास** अतिशय तमोगुणी आहे, **व्यासांच्या** मनांतला रजोगुण नाहिसा होऊन ते साफ कधींच झाले नाहींत, **परशुराम** हे अखंड क्षत्रियकर्म करूनही सात्विकच राहिले· याच्या उलट उदाहरणें क्षत्रियवर्गात सांपडतात. **भीष्माचार्य** हे क्षात्र स्वभावाचे होते, तरी सत्वप्रधान होते; विदेह **जनका**विषयीं तर बोलावयासच नको, मात्र इतकेंच कीं या सर्व मंडळींचा स्वभाव, त्यांतून त्यांचें व्यक्तित्व गेलें असल्यामुळें या प्रकृतिज गुणांशीं विरोध करीत नसून, उलट एकप्रकारें त्याच्या जोरावरच काम करीत होता. ' गुणकर्म विभागशः ' यांतील ' गुण ' आणि ' कर्म ' हे एका दृष्टीनें पाहिले तर पुनरावृत्त वाटतात, कारण गुण आणि कर्म यांचा कार्यकारणसंबंध आहे, असें गीतेंतच ह्मटलें आहे. जसा गुग असेल, तसें कर्म निपजावें, असा जर नियमच ठरला, तर ' गुण आणि कर्म यांना अनुसरून ' असें पुन्हां पुन्हां ह्मणण्याचें कारण काय? नुसतें ' गुणाप्रमाणें ' अथवा ' कर्माप्रमाणें ' असेंच ह्मणणें योग्य होतें. ह्मणून ' गुणकर्म विभागशः ' या शद्वांनीं बुचकळ्यांत टाकलें आहे. नुसत्या तेवढ्या शद्वावर पहावें तर वर्णव्यवस्था उत्पत्तिसिद्ध असलीच पाहिजे असें दाखवितां येत नाहीं. बरें, ती तशी नाहीं ह्मणून चालावे, तर ' सृष्टं ' हें पद असें जोरदार आहे कीं, इतर कितीही रीतीनें त्याची वाट लावली तरी, विचारी माणसाचें खरें समाधान होत नाहीं. त्यामुळें या श्लोकाच्या अर्थाबद्दल आजच तर काय पण फार पुरातन काळापासून एक प्रकारची पंचाईत पडलेली दिसते. ग्रंथांत अनेक ठिकाणीं ' कर्मानें जो ब्राह्मण तो खरा ब्राह्मण, एरवीं उत्पत्तीनें केवढाही ब्राह्मण असला तरी ब्राह्मण नव्हे, असल्या प्रकारचीं जीं वचनें आढळतात त्याचें कारण हेंच. कारण **चातुर्वर्ण्याची** उत्पत्ति वेदांइतकी जुनी आहे, हें आपण पाहिलेंच आहे. वेदांची अपौरुषता ही खरोखर कशांत आहे, हें इतक्या काळांत विसरून गेलें होतें; व वेदांस साहजिकच जी लौकिकार्थ बाजू आहे, तिच्याकडे लक्ष लागलें होतें, असें निरुक्तावरून स्पष्ट दिसतें ' स्थाणुरयं भारभूत् किलाभूत् ' इत्यादि **यास्कांची** सुप्रसिद्ध वचनें याच काळांतलीं होत. असो. याठिकाणीं आपणास थोडें विषयांतर करूनही वेदांचें लौकिकार्थत्व आणि अपौरुषेयत्व हीं दोन्हीही एकत्र कशीं संभवतात, तें पाहिलें पाहिजे, ह्मणजे पुढें हें सर्व खरें मानलें तरी **चातुर्वर्ण्य** उत्पत्तिसिद्धच कां असलें पाहिजे, व तसें तें जरी असलें तरी आजच्याही काळांत तें पाळावें कीं काय वगैरे प्रश्न निर्मळ मनानें सोडवितां येतील.

मंत्र म्हटला म्हणजे उत्पादन सामर्थ्य असलेला शद्ब, अथवा शद्बसमुच्चय असें जरी ठरलें, तरी त्यास लौकिकार्थत्व असूंच नये, असें मात्र नाहीं. मात्र इतकेंच कीं तें असेलच असेंही नाहीं. मंत्रांतील शद्बार्थसंबंध नित्य आहे हें आपण वर पाहिलेंच आहे. म्हणूनच तो अपौरुषेय आहे. अर्थात् ज्यांनीं हे मंत्र प्रचारांत आणले, ते स्वतःला विशेषतः मंत्रद्रष्टे व श्रोते असें म्हणवितात. ऋषि हे मंत्राचे कर्ते नसून त्यांना ते प्रतीत झालेले आहेत, ही कल्पना खुद्द वेदांतच आहे, ही गोष्ट **ज्ञानकोषकार व लो. टिळक** इत्यादि विद्वानांनाही मान्य आहे. हें जरी खरें असलें, तरी ऋषि हे मंत्रकृत् आहेत, व ऋषींनीं स्तोत्रें रचल्याचे उल्लेखही वेदांतच आहेत ही गोष्टही तितकीच स्पष्ट आहे. व यामुळें आजच नव्हे, तर अनादि कालापासून वेदाच्या अपौरुषतेबद्दल मोठीं रणें माजून भगवान् **पतंजलींनीं** दिलेला ' वेदाचा अर्थ नित्य मानावा, शद्बसंबंध नित्य मानूं नये ' असा निर्णय शेंकडों वर्षें सर्वमान्य होऊन बसला आहे, ' यद्यप्यर्थो नित्यो यात्वसौ वर्णानुपूर्वी सानित्या, तभ्देदाद्भवति काठकं कलापकं ' इत्यादि, असा सिद्धांत त्यांना शद्बार्थसंबंध जर नित्य असेल तर वेदांत शाखाभेद * असण्याचें काय कारण आहे, तें सांगतां येईना, म्हणून करावा लागला. यावरून ज्या कालीं **चातुर्वर्ण्य** उत्पन्न झालें, तो काल **पतंजलि** पासूनही किती दूर होता, तें दिसून येतें. **पतंजलीचा** हा सिद्धांत, एका दृष्टीनें पाहिले तर, खरा आहे. मात्र इतकेंच कीं, जगताचें नादबिंदुमय स्वरूप लक्षांत न घेतल्यामुळें, तो मांडला गेला आहे उफराटा.

हें कसें, तें एक व्यवहारांतलें साधें उदाहरण घेऊन आपण पाहूं. गाण्याचा मुख्य उद्देश मनुष्याच्या अंतःकरणांत रसोत्पत्ति करण्याचा आहे. मनुष्याच्या अंतःकरणांत रस उत्पन्न करून भावजागृति करावयाची, व भावसमाधि लावून निरनिराळ्या सिद्धी त्यास प्राप्त करून द्यावयाच्या, एवढा त्या शास्त्राचा अधिकार आहे. आतां हे जे निरनिराळ्या रागांचें सामर्थ्य, तें त्यांतील सप्तस्वरांच्या अनुपूर्वीत आहे. विशेष तऱ्हेनें सप्तस्वरांचें तालबद्ध प्रस्तार साधले, कीं राग आणि रागिणी हे उत्पन्न होतात व त्यांची घटनाच अशी असते, कीं सहृदय मनुष्याच्या अंतःकरणास हलवून तेथें सजातीय भाव ते उत्पन्न करतात. हा प्रस्तारसंबंध जरी माणसांनीं शोधून काढला

---

* शाखाभेद असण्याचें कारण शरीरभेद. तें कसें तें मागील विवेचनावरून लक्षांत येईलच.

असला, तरी अतिशय नैसर्गिक व स्वयंभू, अतएव नित्य आहे. या स्वरांचा उच्चार करतांना तो तीन प्रकारानें होऊं शकतो. एक तर, नुसतीच ' आ आ आ ' अशी तान. फक्त तिच्यांत ' म ', ग, रे, सा, असे उतरते स्वर उमटले असले म्हणजे मनुष्याच्या अंतःकरणांत करुणरसाची उत्पत्ति करतात. किंवा, अर्थहीन असे म,ग,रे,सा, असे सांकेतिक शब्द उच्चारून देखील तेंच कार्य त्यांस करतां येतें; अथवा, त्या ठिकाणीं कांहीं तरी ' जीवलगा ' असले अर्थपूर्ण शब्दही येऊं शकतात. याचमुळें अस्सल गायकी थाटांतील गवई चिजा म्हणत असतां त्यांचा अर्थ जरी आपणास लागला नाहीं, तरी त्यामुळें यत्किंचितही गाडें न आडतां, गायनानंद पूर्णपणें घेतां येतो. आतां या ठिकाणीं त्या गायनाचा खरा अर्थ जो विशेषरस, त्याला अनुकूल असलेली स्वरयोजना ही नित्य असून त्यावर बसविलेली शब्दयोजना अनित्य, इतकेंच नाहीं तर, शेंकडों हजारों प्रकारची, व वाटेल त्या भाषेची असूं शकेल. शब्द म्हणजे मनुष्यकृत भाषा, असा अर्थ घेतला तर येथें शब्दानुपूर्वी ही अनित्य आहे, व त्या शब्दांचा खरा अर्थ जो स्वर प्रस्तार तो मात्र नित्य आहे. **पतंजलीं**ना वस्तुतः असेंच म्हणावयाचें आहे. परंतु त्या काळांत या दृष्टीनें, या प्रश्नाकडे पाहणें शक्य नसल्यामुळें त्यांनीं वरीलप्रमाणें शब्दयोजना करून टाकली. आपण पूर्वीं पाहिलेंच आहे कीं, व्यक्तसृष्टीच्या रूपानें शब्दच व्यक्त झालेला आहे. अर्थात् या शब्दाशीं मनुष्यकृत भाषेच्या अर्थाचा कांहींएक संबंध नाहीं परंतु ज्या ज्ञानघन-तुर्यावस्थेंत हे शब्दार्थसंबंध योगी अथवा ऋषी लोकांस प्रतीत झाले, त्या अवस्थेंत त्या शब्दांची मांडणी साहजिकच अशी झाली कीं, संकेतकृत भाषेप्रमाणेंही त्याचा कांहीं अर्थ होऊं शकतो. **तुकाराममहाराजांनीं** भावबळानें तुर्यावस्थेवर आरूढ होऊन ' चित्तशुद्ध तरी शत्रु मित्र होती ' हा अमोल अभंग बाहेर काढला. त्याचा खरा अर्थ **रामेश्वर भटा**चा दाहशांत होणें हा होता. त्याच्या वाचनानें तें कार्य घडूनही आलें. परंतु त्याला लौकीक अर्थही आहे. भावारूढ होण्यापूर्वीं जे विचार त्यांच्या मनांत घोळत होते, त्याप्रमाणेंच भावसमाधींत त्यांची मांडणी झाली. हें ईश्वराच्या अतर्क्य घटनेचें कौतुक आहे. यावरून असें दिसून येतें कीं मंत्रास लौकिकार्थत्व असणें, हें त्याचें मुख्य अंग नसून तो एक सहज चमत्कार आहे. लौकिकार्थत्व त्याला असेल, अथवा नसेल सामान्य स्वप्नांतही आपण असें पाहतों कीं, मनुष्याच्या कोणत्या ना कोणत्या रीतीनें तरी अनुभवांत आलेल्याच घटना त्यांत घडून येतात. स्फटिकीभवनासारखा हा एक सृष्टचमत्कार आहे. त्यांत ज्या प्रमाणें विशेष द्रव्याचे परमाणु नेमका आपला विशेष

आकारच धारण करतात, त्याप्रमाणें तुर्यावस्थेंतही शद्वार्थाचा हा नित्यसंबंध थोड्या-बहुत लौकिक शद्वार्थसंबंधाला धरून उत्पन्न होतो. त्याचीं कारणें दोन आहेत. एक तर, संस्कृत भाषा ही या मूळ छांदस स्वरूपाला धरूनच बनलेली आहे; व इतर कोणत्याही भाषेपेक्षां त्याला ती जास्त जवळ आहे त्याच्यामुळें पुष्कळवेळां लौकिकार्थत्व असूं शकतें. मात्र मूळ मंत्रार्थ आणि लौकिकार्थ हीं एकच असतील, असें नाहीं. ब्राह्मणांचा जो मुख्य गायत्री मंत्र याची देवता ऋग्वेदीय सूक्ताप्रमाणें पाहिली तर इंद्रावरुण आहे. इंद्रावरुणाच्या स्तुतीमध्यें हा मंत्र स्फुरण पावला आहे. परंतु या मंत्राचा आणि इंद्राचा मंत्रदृष्ट्या कांहींही संबंध नाहीं, हें उघडच आहे. विष्णु सहस्रनाम या लौकिकस्तोत्रांत प्रत्येक श्लोकांत परमेश्वराच्या कांहींतरी गुणवर्णनात्मक नांवें आहेत. परंतु ज्याला मंत्रदृष्टीनें प्रत्येक श्लोकापासून निरनिराळी सिद्धि मिळवावयाची आहे, त्याला त्या श्लोकाच्या अर्थाशीं कांहींएक कर्तव्य नसून, त्या श्लोकास जें बीज वगैरे स्वतंत्र आहे त्यांच्याशींच कर्तव्य असतें. मंत्रास लौकिकार्थत्व असण्याचीं दुसरींही दोन कारणें आहेत. एक तर, खरोखर मंत्र म्हटला म्हणजे त्याचें बीज हाच होय. मंत्र हा त्या शक्तीच्या उपभोगाचा प्रकार होय. उदाहरणार्थ भूमंडलाधिपत्य ही एक भावना घेतली, तर त्या भावनेस अनुकूल परिस्थिति, उत्पन्न करणारा शद्व म्हणजे 'ग्लौं' हा आहे. मंत्रशास्त्रांत 'ग्लौं भूमंडलाधिपत्ये' हें सुप्रसिद्धच आहे. तेव्हां या भावनेचें तुर्यावस्थेंतील मूळ शद्वमयस्वरूप 'ग्लौं' हें झालें. परंतु ही भावना व्यक्ततेस येत असतांना लौकिक व्यवहाराला धरून तिचे नाना पर्याय होतात. उदा० जॉर्ज बादशहाचें भूमंडलाधिपत्य, मोगल बादशहांचें भूमंडलाधिपत्य, अथवा प्रे० विल्सन सारख्याचें भूमंडलाधिपत्य अथवा **लो. टिळक** किंवा **महात्मा गांधी** यांचेही एक प्रकारचें भूमंडलाधिपत्यच. असे त्या वासनेच्या उपभोगाचे अनेक प्रकार झाले. म्हणून 'ग्लौं' हा मूळ शद्व असतांना तितक्या प्रकाराप्रत त्याचे मंत्र मात्र वेगळे होतील. मात्र असे लक्षावधि मंत्र झाले तरी त्यांचें बीज 'ग्लौं' हेंच राहील. त्या 'ग्लौं' ची जी मूळघटना आहे, ती आंत कायम राहून, इतर सर्व प्रकारच्या शद्वघटना उत्पन्न होतील..'देवतायाः शरीरं तु बीजादुत्पद्यते ध्रुवम्' असें जें म्हटलें आहे, तें तेवढ्याच करतां हा जो बीजार्थसंबंध याचा लौकिकार्थाशीं कांहीं संबंध नाहीं. हा स्वतंत्र, स्वयंभू, व नित्य आहे. तशी गोष्ट मंत्राची नाहीं. ज्या समाधींत मंत्रांचे साक्षात्कार ऋषींना झाले, त्या अवस्थेंत जातांना जे लौकिक विषय अथवा भाव मनांत धरून त्यांचे संयम साधले, त्यांच्या पूर्ततेचेच ते मंत्र असल्यामुळें पुष्कळ

वेळां त्यांत लौकिकार्थ साधला गेला आहे. उद्यां जर संस्कृतभाषा बदलली, व तिच्या मूलतत्वांस धरून असलेली एकादी दुसरी भाषा आली, तर मंत्राची मंत्रमयता कायम राहूनही त्याचा अर्थ मात्र, आज आपण करतों, त्यापेक्षां अगदीं भिन्न होईल. ह्मणून शद्बानुपूर्वी ह्मणजे अर्थातच सांकेतिक भाषेतील शद्बाची अनुपूर्वी ही नित्य नसून मूलध्वनीची अर्थाला ह्मणजे सृष्ट परिणामाला अनुसरून असलेली अनुपूर्वी नित्य आहे, हें खरें आहे. वेदांच्या निरनिराळ्या शाखा होण्याचेंही कारण तेंच आहे. निरनिराळीं शरीरें वैदिकधर्माच्या कक्षेंत आल्यामुळें तेच मंत्र निरनिराळ्या बीजशक्ति लावून वेगळ्या रीतीनें उच्चारावे लागले, ह्मणून भिन्न भिन्न शाखा झाल्या. त्याचप्रमाणें शद्बाची मंत्रमयता जशी नित्य व अपौरुषेय आहे, त्याप्रमाणें शद्बास एक पौरुष मंत्रमयताही आहे, हा भेद ध्यानांत न आल्यामुळेंही पुष्कळ घोंटाळा होतो. तपश्चर्येच्या योगानें मनुष्याच्या शद्बाला सामर्थ्य येतें, व त्याचा मंत्रासारखा उपयोग होऊं शकतो. मात्र इतकेंच कीं जों पर्यंत तपःसंचय आहे, तेथपर्यंतच तें सामर्थ्य राहतें. तपाचा क्षय झाला कीं, शद्बांचा जोरही निघून जातो. अशा प्रकारें मनुष्य अथवा देवता यांच्या सामर्थ्यावर अवलंबून असलेले जे मंत्र त्यांना शाबरमंत्र ह्मणण्याचा प्रघात आहे. पुढें दासबोधामध्यें अतीशय आलेला जो 'शबल' शद्ब त्यापासून हा शद्ब निघाला असावा. शबल ह्मणजे अशुद्ध. या मंत्रांचें सामर्थ्य त्यांच्या स्वतःच्या रचनेंत नसून त्यांच्यामागें जो तपाचा जोर असतो, त्यावर अवलंबून असतें. अर्थातच, तो तपाचा जोर नाहिंसा झाला ह्मणजे, त्यांची मंत्रमयताही नाहिंशी होते. अथवा, कमीजास्त होते. हें सरकारी प्रॉमिसरी नोट सारखें आहे— त्यांचा भाव जसा सरकारच्या पतीवर अवलंबून असतो, तशीच यांचीही तऱ्हा असते. आतां, एवढें खरें, कीं त्यांतले कित्येक अत्यंत प्रभाववान् असतात. उदा० महाराष्ट्रांतील अनेक साधकांच्या अनुभवास येणारें **श्री व्यंकटेश स्तोत्र.** याची मंत्रमयता **श्री व्यंकटेशांनीं** त्याला जो वर दिलेला आहे, त्यावर अवलंबून आहे, जोंपर्यंत **श्री व्यंकटेश** या नांवाची कोणी शक्ति विश्वांत आहे, अथवा, तिचें सामर्थ्य अखंड आहे, तोंपर्यंत **श्रीव्यंकटेश स्तोत्राचें**ही सामर्थ्य अव्याहत राहील. **श्रीगुरुचरित्र**ही अशीच भाविक लोकांस दिलेली **श्रीगुरुंची** प्रॉ० नोट आहे. तेरा कोटी रामनामाची भरती कोणीकडूनही करून दिली असतां साक्षात् दर्शन देण्यास **श्रीरामचंद्र** बांधले गेले आहेत. या सर्व पेढ्या एवढ्या भक्कम आहेत कीं यांच्या पतीला आचंद्रार्क कधीं धक्का लागण्याची भीति नको.

त्यामुळें त्या नोटांनीं व्यवहार करणाऱ्या साधकासही भ्यावयाचें कारण नाहीं. केवळ वैदिक मंत्र व इतर मंत्र यांच्यांतील भेद दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्रयोदशाक्षरी मंत्रास बीज लावण्याचा प्रयत्न वासुदेवशास्त्र्यांनीं केला असतां समर्थांनीं त्याचा निषेध केल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे. तत्वतःच त्या मंत्रास बीजाची गरज नाहीं. मंत्र आणि बीज यांचा परस्परसंबंध आपण थोडक्यांत वर पाहिलाच आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक मंत्रास शक्ति व कीलक वगैरे असतात, ही काय भानगड आहे, मंत्राचा ऋषि ह्मणजे काय, इ० प्रश्न महत्वाचे असले तरी आपणास मंत्रशास्त्रावरच लिहावयाचें नसल्यामुळें त्यांच्या विचारांत येथें शिरतां येत नाहीं. **भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस** यांच्या चरित्रांत श्री. **दादासाहेब परांडे** यांनीं हा सर्व विषय थोडक्यांत सोपपत्तिक असा एका स्वतंत्र भागांत मांडला आहे, तेथून वाटल्यास जिज्ञासूंनीं पहावा. वैदिक ऋचांस लौकिकार्थ असला, आणि ज्याप्रमाणें अर्वाचीन पंडित समजतात, तसाच तो आहे किंवा नाहीं, हा प्रश्न बाजूस ठेवला तरी, त्या लौकिकार्थत्वामुळें त्यांची स्वयंभू मंत्रामयता यत्किंचितही बिघडत नाहीं; व त्यामुळें नानातऱ्हेच्या जाती, माणसें, व स्थळें यांचे ऐतिहासिक उल्लेख ऋचांत कितीही आलेले असले, तरी त्यामुळें त्यांच्या शद्वशः अपौरुषतेंत काडी इतकाही फरक पडण्याचें कारण नाहीं; एवढेंच आपणास पहावयाचें होतें.

अशा रीतीनें वेदाची मंत्रमयता व तिचा उपयोग करून घेण्याकरितां शरीरांची विशेष पात्रता या दोन गोष्टी पक्क्या लक्षांत ठेवून गीतेंतील ‘ गुणकर्मविभागशः ’ याचा अर्थ लावला पाहिजे, ह्मणजेच ‘सृष्ट’ पदार्शी त्याचा समाधानकारक मेळ बसेल. मात्र, तो अमुक तऱ्हेनेंच लावला पाहिजे असा सिद्धांत करून स्वतंत्र विषय येथें उपस्थित करण्याचें कारण नाहीं. ‘गुण’ आणि ‘कर्म’ या दोन संज्ञा मुद्दाम उपयोगांत आणण्याची सार्थकता त्याखेरीज होत नाहीं, व ‘सृष्ट’ पदार्शी त्याची सांगड बसत नाहीं, एवढें दाखवून, या प्रश्नाची एक नवी दिशा दाखविण्याचें काम फक्त केलें आहे.

शरीरें विशेष रीतीनें असण्याची व तीं तशीं राखण्याची आवश्यकता भासतांच, बीजतःच त्यांची परंपरा तशी कशी राहील, याची काळजी घेण्यांत येऊन, त्यांतून चार आश्रम व षोडश संस्कार उत्पन्न झाले. योगादिक इतर उपायांनीं हेंच कार्य साधलें असतें. क्वचित एकाद्या उदाहरणांत आजच्या काळांतही साधू

शकेल. परंतु ते उपायच असे आहेत कीं, त्यांचा फायदा समाजांतील प्रत्येकाला घेतांच येईल अशी शाश्वती नाहीं. ह्मणून, विशेष संस्कारांनीं बीजतः शरीरें तयार करण्याचें शास्त्र निघालें. त्या तऱ्हेचीं शरीरें तयार झालीं, कीं कोणताही इष्ट परिणाम घडवून आणण्यास नुसत्या वैदिक शद्बोच्चाराचीच गरज होती. अशा रीतीनें तयार झालेल्या शरीरांचा, त्यांच्या क्षमतेप्रमाणें **चातुर्वर्ण्यांतील** इतर तीन वर्णांनीं वैदिक समाजाचें सुख आणि स्थैर्य वाढवून, वैदिक संस्कृतीची पूर्णावस्था संपादण्याकडे, व तिचा प्रसार जगभर करून, इतर समाजांस सुसंस्कृत करण्याकडे उपयोग केला, व ब्राह्मणांनीं सर्व तऱ्हेच्या आधिभौतिक सुखावर लाथ मारून, केवळ वैदिक समाजाच्याच नव्हे, तर, सर्व जगताच्या कल्याणाकरितां आपलीं आयुष्यें व शरीरें यांचे निवळ कारखानें बनविले. ह्मणूनच एक काळ असा होता कीं, अतींद्रिय विश्वाशीं मनुष्याचें प्रत्यक्ष दळणवळण घडून येत होतें. * ही गोष्ट, देव हीच मुळीं एक कल्पना आहे, असें मानणाऱ्या, वस्तुतः अधार्मिक अशा, आजकालच्या वैदिकधर्मी लोकांसही पटणें अशक्य झालें आहे. मग **विंटरनिट्झ व ग्रिअर्सन्** यांना त्याची कल्पना न आल्यास त्यांत नवल तें काय? असो. वेदाची मंत्रमयता ह्मणजेच वेदाचें वेदत्व व वेदाचा मनुष्यानें आपल्या कल्याणार्थ फायदा घेण्याचा मार्ग ह्मणजेच वैदिकधर्म. अर्थातच या विशेष शास्त्रास अनुसरून त्याची जी विशेष तऱ्हेची लॅबोरेटरी ती वर्णाश्रमसंस्था. ही परिणालिका पाहिली ह्मणजे **चातुर्वर्ण्य** हें वैदिकधर्माचें अव्यभिचारी लक्षण कसें आहे, हें ध्यानांत येईल. व तें त्या शास्त्राप्रमाणें उत्पत्तिसिद्धच असलें पाहिजे, हेंही उघड होतें. याविरुद्ध एक आक्षेप असा आहे कीं, पूर्वकालीं ज्या वेळेला अनुलोम आणि प्रतिलोम हे दोन्हीही विवाह प्रचलित होते, व रोटी व्यवहारही आतां सारखा कडक नसून जास्त सढळ असावा असें इतिहासावरून दाखवितां येतें, त्याकाळीं जर **चातुर्वर्ण्य** हें उत्पत्ति व बाह्य व्यवहारावर अवलंबून नव्हतें, तर आतांच तें तसे असण्याची काय आवश्यकता? ब्राह्मणांचा भक्ष्याभक्ष्य विचार आतांपेक्षां पूर्वी निराळा होता, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याचप्रमाणें उत्पत्तीनें ब्राह्मण नसलेल्यांनीं ब्राह्मणत्व संपादिल्याचीं उदाहरणें आहेत, हेंही खरें आहे. तरीपण त्या बरोबरच, या प्रश्नास इतरही अंगें

---

* व ही गोष्ट चारीवर्णांस सारखी लागू होती हे विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगे आहे.

आहेत, हें फारसें लक्षांत घेतलें जात नाहीं. आह्मीं पूर्वींच सांगितलें आहे कीं, वैदिक संस्कृतीच्या पूर्ण परिणत काळांत, एक वेदाध्यापनाचा अधिकार सोडला तर, इतर सर्व रीतीनें, क्षत्रिय व वैश्यच तर काय, पण शूद्र देखील ब्राह्मणापेक्षां कोणत्याही तऱ्हेनें अधिकारसंपन्नतेंत कमी नव्हते. शिवाय त्या काळांत योगसामर्थ्याचा प्रत्यक्ष अनुभव घेणारे व देणारे हेही पुष्कळ असल्याकारणानें, संकर होतोसा वाटल्यास, योगदृष्टीनें त्यांचे वर्ण पाहून निकाल ठरविण्याचें साधन होतें. ह्मणून त्या वेळेला वर्णव्यवस्था ढिली असल्याचीं क्वचित कोठें उदाहरणें आढळतात. परंतु त्यांतही आश्चर्य करण्याजोगती गोष्ट ही आहे कीं, वैदिक व संस्कृत सारस्वताच्या एवढ्या प्रचंड सागरांत तीं खरोखरच तळहाताच्या बोटांवर मोजण्याइतकीं अपवादात्मक आहेत. जसे त्यावरून अनेक प्रकारचे तर्क करितां येतात, त्याचप्रमाणें अमुक चालीरीति त्या वेळेला होत्याच, असाही निखालस सिद्धांत मांडतां येत नाहीं, हेंही ध्यानांत ठेवण्याजोगतें आहे. जसजशा वरील दोन गोष्टी कमी कमी होत गेल्या, तसतशी वर्णव्यवस्था जिवंत राखण्याकरितां-ह्मणजे, तिच्यांतील सामर्थ्याचें अंग टिकविण्याकरितां-कडकपणा करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. शरीर हें अन्नाचें बनलेलें असून त्याला वागविणारी बुद्धि, ही अन्नाच्या सात्विक अंशापासूनच बनते, असा शास्त्रसिद्धांत आहे. स्त्रीपुरुषसंबंधापासून तर प्रत्यक्ष शरीरच तयार होतें, त्यामुळें, या दोनगोष्टींतच अधिक कडकपणा करण्याची गरज वाटली. जर पुन्हां त्या परिणतस्वरूपास समाज जाऊन पोहोंचला, तर, आज देखील सढळपणा पुन्हां करतां येईल. याखेरीज आणखीही कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्याजोगत्या आहेत. ज्याप्रमाणें वैद्यशास्त्राचे मूळग्रंथ विशेषतः श्रीमंत लोकांकरितां त्यांच्या आश्रयानें लिहिले गेल्यामुळें आणि त्या पुरातन काळीं श्रीमंतवर्ग हा बहुतकरून ब्राह्मणेतर असल्यामुळें, त्यांतील चिकित्सेची सर्व रचना, विशेषतः त्याच वर्गाच्या धोरणानें केली आहे, त्याचप्रमाणें इतरत्रही असाच थोडासा घोंटाळा सांपडतो. वैद्यशास्त्रांतील, दिनचर्या व ऋतुचर्या, मनुष्याचे आहारविहार, आणि चिकित्सेच्या त्रासदायक पद्धति पाहिल्या ह्मणजे, ते ग्रंथ विशेषतः श्रीमंत लोकांकरितांच रचलेले आहेत, हें सहज लक्षांत येतें; तसें असल्यामुळें त्यांत मुद्दाम 'ही ब्राह्मणांकरितां चिकित्सा,' व 'ही इतरांकरितां,' असें मुद्दाम वेगळें विवेचन केलेलें नाहीं. सर्वसामान्य माहिती दिलेली आहे, ज्याला जी लागेल ती त्यानें उचलून घ्यावी, असें त्यांचें धोरण आहे. ह्मणून तेवढ्यावरून वनस्पतिचिकित्सा टाकून मांस औषधीच ब्राह्म-

घेतल्या पाहिजेत, असें होत नाहीं. अगदीं अव्वल इंग्रजीपथतची आमच्या समाजाची आरोग्यमयता पाहिली असतां देखील असें स्पष्ट दिसतें कीं, ब्राह्मण व कुणबी या दोन्ही वर्गांकरितां वैद्याची गरज अतिशयच क्वचित लागत असे. बहुतकरून मधले जे मातबर वर्ग त्यांच्याचकरितां वैद्यांचें अस्तित्व असे. अशा स्थितींत, ब्राह्मण व तदितर यांचा पृथक् निर्देश न करतां सामान्य उल्लेख होणें साहजिक.* होतें. तशीच गोष्ट, वैदिक काळच्या व त्यांनंतरही—ज्याला सूत्रकाल म्हणतात—तेथपर्यंतच्या वाङ्मयांत झाली असण्याचा संभव आहे. आज देखील अनुलोमच तर काय पण प्रतिलोम विवाह नसले तरी स्त्रीपुरुषसंबंध घडतात. व त्यांना संततिही होते. अनुलोम विवाहाची संतति ब्राह्मणेतर उच्चवर्णाची असते, व ब्राह्मणांपेक्षां कांहीं बाबतींत तिला कमी मानलें गेलें तरी, ब्राह्मण बाप, वैदिक मंत्रांनीं त्यांचे षोडश संस्कार करूं शकतो, हें आपण पाहतों. म्हणजे आजच्या परिभाषेंतील या 'विदुर' संततीस वेदाध्ययनाचा अधिकार तर असतोच. फक्त कायद्याच्या दृष्टीनें वारस हक्कासंबंधानें जो काय कमीपणा राहील तोच. मात्र, प्रतिलोम संबंधामध्यें ब्राह्मण स्त्रीस ब्राह्मणेतरापासून झालेली संतति ब्राह्मणेतर बापाकडून वाढविली गेल्यामुळें व त्यांच्या व ब्राह्मणांच्या संस्कृतींत जमीन अस्मानाचा फरक पडल्यामुळें ब्राह्मण समजली न जातां संस्कारास अपात्र ठरते. पूर्वी सांगितल्याप्रमाणें एका वेदोच्चाराखेरीज चारही वर्ण अतिशय उन्नत स्थितींत असल्यामुळें

* अलीकडे कौटिल्याचें अर्थशास्त्र फारच महत्वास चढलें आहे. त्यांत अ. १३१ यांत युद्धकालीं सैन्याच्या मागे ' चिकित्सकाः शस्त्रयंत्रागदस्नेहवस्त्रहस्ताः स्त्रियश्चान्नपान रक्षिण्यः पुरुषाणामुद्धर्षणीयाः ' । अशी व्यवस्था असावी असें म्हटलें आहे. त्यावरून त्यावेळीं नर्सेस (Nurses) ची संस्था होती असें प्रस्तावनेंत रा. कंरदीकरांनीं म्हटले आहे. आधीं याचा तसा अर्थ होऊंच शकत नाहीं. पण होतो असें मानलें तरी हें वचन पाहून त्या वेळीं ब्राह्मणस्त्रिया नर्सेस (Nurses) चा धंदा करीत होत्या असें कसें म्हणतां येईल ? अन्नपानरक्षिण्यः याचा अर्थ उघडच आहे. जनानखाना बरोबर असण्यास कौटिल्याची हरकत नव्हती. तेव्हां या काकूबाई त्यांत असणारच. 'रूपाजीवा'ही बरोबर असतेच. सैन्याचा उत्साह वाढविण्याचें काम अशा बायका कशा करीत तें रा. बापट यांच्या 'पानिपतच्या मोहिम'तील ' आवगडी बाणदार ' वगैरे खटके वाचणारांना सहज समजेल.

त्यावेळेला, क्वचित अशी संतती ब्राह्मण मानली जाण्याचा संभव होता. आज जसा एखाद्या ब्राह्मणाचा संस्कार केलेला मुलगा, तो 'विदुर' आहे, हें त्याच्या-संबंधीं पाळले जाणाऱ्या रोटीबेटी व्यवहाराच्या कांहीं कडक नियमावरूनच कळतें, एरवीं कळावयास साधन नाहीं, त्याचप्रमाणें पूर्वीं देखील, अशाप्रकारचे निर्बंध पाळले जात नसत. असें ह्मणतां येणार नाहीं. ब्राह्मणानें अनुलोमानें कोणत्याही वर्णाच्या स्त्रिया केल्या तरी यजमान पत्नित्वाचा मान त्याच्या ब्राह्मणस्त्रीकडेच राहत असे, व त्या मानानें धर्मकृत्यांत वगैरे ती स्त्री व इतर स्त्रिया यांत फरक केला जात असे, ही गोष्ट तर इतिहासाचार्य **राजवाडे** यांनींच कबूल केली आहे. असाच प्रकार राजमहिषींसंबंधानेंही असे. व जवळजवळ तशी स्थिति गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत होती. त्यावेळेला श्रीमंत लोकांनीं अंगवस्त्र राखण्याची लाज नव्हती व अशा बायका स्पर्शास्पर्शाचे कांहीं धार्मिक नियम सोडून पुष्कळ वेळां तर ब्राम्हणस्त्रीपेक्षांही जास्त अधिकारानें व जिव्हाळ्यानें वागतांना आढळत. तसें आजही विशेष संस्कारयुक्त असें कोणी केलें तर त्यास कोणी ना म्हणेल असें नाहीं. परंतु एवढेंच कीं मुख्य पत्नि व या स्त्रिया यांच्यांत जो हा थोडासा भिन्न-भाव दाखविण्यांत येई, तो कमीपणा प्रेमाकरितां अथवा गरजेकरितां पत्करूनच त्या स्त्रिया उघड उघड या मार्गाचें अवलंबन करीत. आणि त्यामुळें तें एक शास्त्रच बनून न जातां सुख आणि सोय यांनाही अडचण होत नव्हती. कोणत्याही प्रसंगीं ध्येयाला त्याच्या उच्च पदावर अढळ राखून त्याच्या खालील पायरी उघड उघड गौण मानून पत्करावयाची व ध्येयाचा ध्रुव केव्हांही दृष्टीआड होऊं द्यावयाचा नाहीं, हें पूर्वपरंपरेंतील मुख्य रहस्य होतें. आजकालच्या काळांत तसें केल्यास कोण नको ह्मणणार आहे ? परंतु आजच्या लोकांना, शास्त्र अजिबात उडवून देऊन, अथवा शास्त्राला सोईच्या सांच्यांत हवा तसा आकार देऊन, जें करावयास पाहिजे तें हें, कीं, ध्येयाच्या या पायऱ्या काढून टाकून केवळ सामान्य नीतिनियम राखून अथवा त्या नीतिनियमांच्या हव्या तशा स्वरूपाखालतीं जें जें मनुष्य करील त्याला त्याला ध्येयस्वरूप बनवावयाचें. कारण, विकारास दुर्बळतेनें वश होणें तर भाग, परंतु तो कमीपणा घेणें मात्र जिवावर येतें. सारांश इतकाच कीं या पूर्व-वाङ्मयामध्यें, तें केवळ पारमार्थिक दृष्टीनें लिहिलें गेलें असल्यामुळें, अर्वाचीन पद्धतीला अनुसरून विषयांची मांडणी स्पष्ट नसते. उदा० एक उदाहरण आपण

घेऊं. * मालतीमाधवाचा किंवा बृहत्कथेचा अर्वाचीन काळ टाकला, तर पूर्वकालीन वाङ्मयामध्यें ब्राह्मणस्त्रियांच्या प्रीति विवाहाचें उदाहरण सांपडत नाहीं. जेथें कोठें तशीं उदाहरणें पुराणांतून दाखविण्यांत येतात, तीं खरोखर क्षत्रियकन्यांचीं आहेत. अशाच प्रकारांनीं बहुतेक सर्व तर्कांची मांडणी केली असते. क्षत्रियाच्या घरीं ब्राह्मण जेवावयास गेल्याचा उल्लेख आला ह्मणजे कांहीं तो त्याच्या बायकोनें केलेलाच स्वयंपाक जेवीत असे असें होत नाहीं. आज देखील 'पाटलाच्या घरीं जेऊन आलों,' असें कोणी ब्राह्मणानें ह्मटल्यास त्याचा अर्थ 'पाटिलीणीनें बड-विलेल्या भाकरी तो खाऊन आला'—असा कोणीही करीत नाहीं. एवढी गोष्ट खरी आहे कीं, भक्ष्याभक्ष्य स्पर्शास्पर्श, त्याचप्रमाणें रोटीबेटी व्यवहार या सर्व

---

* मालती माधवासारखी संस्कृत नाटकें व बृहत्कथा वगैरेंत तरी असे उल्लेख येतात. ह्मणजे त्यावेळीं तशी स्थिति असली पाहिजे हें उघड आहे. व त्या काळांत तशी स्थिति थोड्याबहुत प्रमाणानें असावी असें आह्मांसही वाटतें. मात्र तिचें कारण वेगळें असावें. ज्यांप्रमाणें आज परकी संस्कृतीच्या झगझगाटांत लोकांचे आचार व विचार यांत प्रचंड स्थित्यंतर झालें आहे, तसाच प्रकार थोड्या बहुत प्रत्येक वेळां झाला असावा. परंतु त्याचें जें चित्र या प्रकारच्या वाङ्मयांत दिसून येतें तितका तो नसावा. अशा वाङ्मयांतील चित्र केव्हांही वस्तुस्थितीस थोडें बहुत धरून परंतु वस्तुस्थितीच्या पुढें कल्पना धांवूं शकेल तितकें अप्रत्यक्ष असतें. आजच्या कालीं स्त्रीशिक्षण व सामाजीक रहाणी यांच्यांत मनस्वी फरक झालेला आहे तरी देखील, गोष्टी, कादंबऱ्या, नाटकें परिहासलेख इत्यादि वाङ्म-यांतील वर्णनें अगदी सुशिक्षित वर्गांतही किति प्रमाणांत खरोखर लागू पडतील त्याचा वाचकांनींच विचार करावा. ग्रीक वगैरे लोकांतील चालीरीतिमुळें स्त्रियांच्या बाबतींत तशी व्यवस्था असावी असें शृंगाररसांत बुडून निघणाऱ्या त्या वेळच्या लोकांस वाटूं लागणें साहजीक आहे. चार आणे माला अगर असलेंच एकांगी वाङ्मय उद्यां जिवंत राहिलें, व त्यावरून ऐतिहासिक वस्तुस्थिती ह्मणून जर कोणी त्या काळीं सिद्धांत ठरविले तर तें सर्वस्वी खरें ठरेल काय? तर वैदिक धर्म व संस्कृति यांच्या प्रणालिका ह्मणून त्या गोष्टी समाजांत आदरणीय होत्या असें त्यावरून ठरेल किंवा परिस्थितीनें मध्येंच उत्पन्न झालेली बांडगुळें आहेत असें ठरेल याचा विचार करण्याजोगा आहे.

बाबतींत कालाच्या ओघांत, मूळ धोरण सुटून अनेक प्रकारचा अनिष्ट असा विचित्र-पणा उत्पन्न झाला आहे. तशा तऱ्हेचा तो पूर्वी अर्थातच नव्हता, म्हणून त्यासंबंधीं कांहीं व्यवस्थाच नव्हती, असें म्हणण्यास मुळींच पुरावा नाहीं. मूळ तत्वाला धरून त्या कालाला योग्य अशा सर्व व्यवस्था त्याविषयीं असाव्यात. परंतु संशो-धन शास्त्राचे परकी लोकांच्या दूषित बुद्धीनें घालून दिलेले नेम, जे एकदां ठरले, ते ठरले. त्यावर शंका कोणी घ्यावी आणि कशी घ्यावी ? आपला विषय इतिहास हा नसल्यामुळें अत्यंत आवश्यक असा या विषयाचा विचार तितकाच सोडून देणें भाग आहे. तरीपण, या संशोधनाच्या संबंधानें अर्वाचीन बुद्धि किती परतंत्र झालेली आहे, तें मनांत येऊन वाईट वाटल्याखेरीज राहात नाहीं. कोठेंही व्यक्तींचीं नांवें आलीं, कीं त्या दोन जाति समजावयाच्या, एकादी गोष्ट घडल्याचा उल्लेख आढळला कीं त्याप्रमाणें सरसहा चाल होती, असें ठाम धरून चालावयाचें, अशा अनेक प्रथा टरून गेल्या आहेत. परंतु तो विषय तितकाच सोडून देणें भाग आहे.

सारांश गोष्ट इतकीच, कीं, आमच्या इकडील शास्त्रांच्या तत्वांप्रमाणें ( फुटकळ वाक्यांप्रमाणें नव्हे ) पाहिलें तर **चातुर्वर्ण्याची** उत्पत्ति एका मोठ्या शास्त्राच्या भक्कम पायावर झाली असून, नदीच्या प्रवाहानें शेत झरून जाऊं नये म्हणून, त्याला जसा चोहींकडून बांध घालावा तसा सर्वभक्षक स्वैरसंचारी कालाच्या तडाक्यांतून ती संस्था टिकवावी म्हणून आचारविचाराचीं कडक बंधनें घालून त्यांतील प्रत्येक वर्ग एकमेकांत मिळून न जातां ठळकपणें उमटून पडतील, अशा प्रकारची व्यवस्था त्या शास्त्राच्या अनुरोधानेंच केलेली आहे. या जगांत जेथें प्रत्येक गोष्ट दुसऱ्याला खाऊन टाकून आत्मसात करण्याची धडपड करीत असते, तेथें स्वतंत्र अस्तित्व राखण्याकरितां जरी थोडा मनाचा कोतेपणा पत्क-रावा लागला, तरी तोही पत्करून अशा प्रकारें निर्बंध घालून घेणें भाग आहे, ही गोष्ट युरोपियन लोकांच्या देखील अंतःकरणास पटलेली आहे. एवढेंच आहे कीं, त्यांचें सर्वस्व काय तें राजकीय अस्तित्वच असल्यामुळें, त्या बाबतींत आपलें व्यक्तित्व कायम राखण्याची, **चातुर्वर्ण्य** विशिष्ट लोकांपेक्षांही, जास्त मनाच्या कोतेपणानें ते खटपट करतात. अमेरिकेंतील वर्णभेद तर प्रसिद्धच आहे. अशा स्थितींत आम्ही मात्र आमच्या सर्व अधःपाताचें खापर रोटीबेटी व्यवहाराच्या कडकपणाच्या माथीं मारून मोकळे होतों.

वरील एकंदर विवेचनावरून जरी **चातुर्वर्ण्य** सशास्त्र ठरलें तरी देखील त्याच्यासंबंधानें तीन मोठ्या शंका उत्पन्न होतात. पहिली अशी कीं, अशा प्रकारें निर्बंधानें संकुचित केलेल्या समाजास दोन अडचणींतून जावें लागतें. एक अशी कीं, कांहींही झालें तरी, कालांतरानें पोटजाती उत्पन्न होऊन, शेतांतील कुंप्याप्रमाणें त्यांनीं समाज क्षीण व विस्कळित बनतो. आणि दुसरें असें कीं, त्यांतील मनुष्यरूपी बीजास तऱ्हतऱ्हेचें खत न मिळाल्यामुळें त्यांत जो मनुष्यप्राणी उत्पन्न होतो, तोच मुळीं सर्वप्रकारें हीनवीर्य असतो. बौद्धिक व शारीरिक वाढ खुंटून गेल्यामुळें त्यांच्या-मध्यें स्वतःचें अस्तित्व टिकविण्याइतका प्रभाव राहत नाहीं, व लौकर अथवा उशीरां, इतर जोमदार मानवसमाजांच्या आहारीं पडून त्यांचें समूळ अस्तित्वच नाहिंसें होण्याचा संभव असतो. ही शंका खरोखरच योग्य असून समाजशास्त्राच्या दृष्टीनें महत्वाची आहे. दुसरी शंका अशी कीं, जगाच्या हल्लींच्या परिस्थितींत ज्या शास्त्रा-च्या पायावर **चातुर्वर्ण्याची** इमारत उभारली आहे, त्या शास्त्राची व त्याच्यावरील इमारतीची उपयुक्तता किती आहे ? जर अर्वाचीन दृष्टीनें त्यांचा कांहीं उपयोग नसून उलट राष्ट्राच्या प्रगतीस तें अडथळा करणारें आहे असें आढळून आलें, तर पूर्वी केवढ्याही मोलाचें असलें तरी हें जुनें मढें काय म्हणून जपून ठेवावें ? तिसरी शंका अशी कीं, एका काळीं तें चांगलें होतें, इतकेंच नाहीं, तर, आतांही तें चांगलेंच आहे, असें ठरलें, तरी देखील, आतां परिस्थितीच अशी झाली आहे कीं, त्याल फांटा दिल्याखेरीज मत्सर, द्वेष, वगैरेंची कीड निघून जाऊन, समाजांत जोम उत्पन्न होणार नाहीं, व त्याचा संघ बनणें शक्य नाहीं. एवीतेवी समाज जर मरूनच जात असला तर, ‘ सर्वनाशे समुत्पन्ने ’ या न्यायानें त्याला फांटा देऊन पाश्चात्य पद्धती-प्रमाणें, अथवा इतर मानवी संघांप्रमाणें, नव्या तत्वावर त्याची उभारणी कां करूं नये ? याचा आतां क्रमशः विचार करूं.

समाजाची पूर्ण परिणतस्थिति कांहीं झालें तरी एकसारखी राहणें शक्य नसतें, आणि ज्या समाजानें परिणतीचा अत्युच्च बिंदु गांठला आहे, तो घड्याळाच्या लंबकाप्रमाणें, नेहमीं झोके खात असतो, व त्या अत्युच्च बिंदुपासून खालीं ढळण्या-चीच त्याची प्रवृत्ति असते, हें उघड आहे. त्यामुळें मिश्रविवाह, व्यभिचार, आर्थिक भेद, आणि धंदे-इत्यादि कारणांनीं पोटजाति निर्माण होणें, अपरिहार्य असतें. समाजशास्त्राप्रमाणें पाहिलें तर, झाडाप्रमाणेंच बाहेरूनही निरनिराळ्या जातींचें खत मानव वंशांस मिळणें अवश्य असतें. त्या खेरीज तो फोंफावत नाहीं.

ज्या पूर्वकालीन शिष्टांनीं एका मोठ्या शास्त्रास धरून **चातुर्वर्ण्य संस्था** निर्माण केली, त्यांनीं या तत्वाकडे दुर्लक्ष केलें असेल, अथवा त्यांना ही कळली नव्हती असें ह्मणतां येत नाहीं. तेव्हां त्यांनीं हा प्रश्न कसा सोडविला होता, हें प्रथमतः पाहिलें पाहिजे. जगांतील इतर धर्म पाहिले तर त्यांना अखंड एकच तळमळ लागलेली दिसते;—आपली वाढ कशी होईल, संख्याबलानें कोणीकडून तरी आपण मोठे कसे होऊं,— हा एकच त्यांचा अट्टाहास होता. कारखान्यांतून माल कसा कां निघेना, पण तो पुष्कळ कसा निघेल, हें पाहण्याकडे त्यांचें लक्ष होतें. तेवढ्या करितां वाटेल ते उपाय योजण्याची, इतकेंच तर काय, पण स्वतःच्या मूलतत्वांस हरताळ फांसण्याचीही त्यांची तयारी होती. याच्या उलट, कारखान्यांतून माल कितीही कां निघेना, तो सर्वोत्कृष्ट कसा निघेल, व सर्वोत्कृष्ट माल जास्त कसा काढतां येईल, इकडे वैदिक धर्माचें लक्ष होतें. या दोन मूलतःच फरक असलेल्या दृष्टींमुळें वरील प्रश्न सोडविण्याचे दोघांचे मार्गही वेगवेगळे झाले. इतर धर्मांनीं आपलीं द्वारें वाटेल त्या लोकांना वाटेल तशा रीतीनें खुलीं ठेवून हा प्रश्न सोडविला कोणाही व्यक्तीनें ' आह्मीं त्या धर्माचे आहों ' असें ह्मटलें व संघदृष्ट्या अवश्य असलेल्या कांहीं केवळ व्यवहारिक गोष्टी पाळल्या ह्मणजे झालें,- तो त्या धर्माचा मनुष्य होऊं शकतो. व्यक्ति हा विश्वाचा अभिन्न घटक आहे, आणि ह्मणून ' परस्परं भावयंतः श्रेयःपरमवाप्स्यथ ' हाच त्यांच्या कल्याणाचा मार्ग आहे, याची त्यांना जाणीव नाहीं. संघाचा एक घटक बनून, त्यांच्या आश्रयानें व्यावहारिक सुखोपभोग घ्यावा, व स्वतःचें अंतःकरण उदार गुणांनीं आणि ईश्वरविषयक भावांनीं निर्मळ करून साधल्यास इतरांस साह्य करतां येईल, असें तेज अंगीं आणावें एवढेंच त्यांच्या पुढें ध्येय आहे. तशी गोष्ट वैदिक धर्माची नाहीं, हें मागील विवेचनावरून लक्षांत येईल. वर्णाश्रमाच्या रूपानें ईशतत्वाशीं अखंड दळणवळण ठेवण्याचा स्वतंत्र कारखानाच त्यांत काढला असल्यामुळें, व्यक्तीच्या सुखदुःखाला त्यांत महत्वच नाहीं. ही गोष्ट विशेषतः ब्राह्मणांना लागूं आहे. कारण, ब्राह्मणवर्ण हाच खरोखर तो कारखाना असून, इतर तीन वर्णांच्या सहाय्यानें तो टिकवावयाचा असतो. ह्मणून, संबंध विश्व हाच ब्राम्हणाचा संघ, त्या संघाला सोडून त्याला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. अशी स्थिति असल्यामुळेंच **'ब्राम्हणो लोकपालकः'** असें ह्मटलें गेलें. अशा स्थितीमध्येंही, हें अत्युच्च ध्येय स्थिर राखण्याकरितां अखंड सावध रहावें लागतें. त्या ध्येयापासून पुन्हा पुन्हा ढळूं पाहणाऱ्या ब्राह्मण वर्गालाही ' निवृत्तिस्तु महाफला ' असें बजावून वाटेवर

आणावें लागतें. त्यामुळें, आणि सर्व प्रकारच्या व्यक्तिविषयक सुखाचा त्याग इतर कशाहीकरितां नसला तरी, स्वतःचें तेज अखंड राखण्याकरितां, आणि ध्येयाचा परमोच्च बिंदु समाजाच्यापुढून कधींही न ढळण्याकरितां करण्याची तयारी असण्यांतच, ब्राह्मणाचें ब्राह्मणत्व असल्यामुळें, वर सांगितलेल्या अडचणींचा प्रश्न त्यांनीं व्यक्तीच्या दृष्टीनें न सोडवितां या सांगितलेल्या दोन धोरणांनीं सोडविला आहे. आजच्या पुनर्घटनेंत त्याच तऱ्हेनें तो सोडवितां येत नसला, तरी त्या मूलतत्वास धरूनच सोडविला पाहिजे; तरच तो वैदिक धर्मास धरून होईल, नाहींतर ती एक वेगळीच वस्तु होईल. अनेक कारणांनीं वर्णांत संकर होऊन जाति उत्पन्न होतात, व त्या कुंदकाड्यांनीं समाजरूपी क्षेत्रांतील कस निघून जातो, हें ठाऊक असल्यामुळें, अशा जाति उत्पन्न झाल्या असतां त्यांनीं दोन मार्ग स्वीकारले. धंद्यावरून, देशांतरावरून, किंवा उत्पत्ति आणि व्रात्यपणा यांखेरीज इतर कोणत्याही कारणांनीं उत्पन्न झालेल्या पोटजातिला मोठेंसें स्वतंत्र अस्तित्व न देतां, स्वतःच्या मूळवर्णांत अगदी सुलभ रीतीनें पुन्हां मिळून जाण्याची त्यांस सवड ठेवली. ही गोष्ट मधल्या काळांत लोकांच्या नजरेंतून गेल्यामुळें या पोटजातींनाहीं फाजील महत्व आलें, व त्यामुळें पुष्कळ दुष्परिणामही घडले, हें कांहीं खोटें नाहीं. परंतु आतां तिकडे लक्ष जाऊन पोटजातींच्या एकीकरणाचा कसून प्रयत्न होत आहे, हें ठीकच आहे. व्रात्यत्व म्हणजे कोणत्याही कारणानें घडलेलें धर्मबाह्य आचरण; याकरितां व्रात्यस्तोमासारखे संस्कार, व तपाचरणानें शरीरशुद्धि या दोन मार्गांनीं परावर्तनाचा मार्ग मोकळा करून ठेवला होता. श्रीशंकराचार्यांनीं सात सात पिढ्यांचे पतित अशा रीतीनें परावृत्त करून घेतल्याचें आनंदगिरींच्या शांकरविलासांत वाचल्याचें आम्हांस आठवतें. या चळवळीकडेही पुन्हां लक्ष लागलें आहे, ही आनंदाचीं गोष्ट आहे. परंतु त्यामध्यें केवळ एक दिवस एखादा होम करून, पतिताला परावृत्त करण्याचा हा सवता सुभा मात्र रास्त नाहीं. कोणत्याही गोष्टीच्या तात्विक आणि सामुदायिक कल्याणाकडे दृष्टि देऊन, व्यक्तीच्या सुखदुःखाचा, काम पडल्यास होम करावयाचा, हें धोरण यांत पाळलें जात नाहीं. याचें खरें कारण असें आहे कीं या पतित परावर्तनाच्या चळवळीचा उगम, खरोखर धर्मभावनेंतून झालेला नसून आर्थिक चळवळींतून झाला आहे. व त्यामुळें एखाद्या समाजांत प्रविष्ट होणें, म्हणजे त्यांच्या बरोबर खाणेंपिणेंही हीन भावना जास्त प्रबळ होऊन बसली आहे. त्यामुळें परावृत्त माणसाला व परावर्तन करणारांनाही निरनिराळ्या कारणांनीं एकदां बरी-

बर खाणेंपिणें केव्हां होईल, अशी उतावीळ होते. एकाला, बरोबर खाणेंपिणें हेंच काय तें ब्रह्म आहे, व तेवढ्याकरितांच परावृत्त व्हावयाचें, अशी समजूत करून दिल्यामुळें ही घाई होते, तर दुसऱ्याला, स्वतःच्या ठिकाणींच केवळ व्यापारी दृष्टी असल्यामुळें धीरगंभीरतेच्या अभावानें ' कोणीकडून तरी एकदां बरोबर खाऊंपिऊं न घातलें तर, न जाणों सावज बिचकून जावयाचें '-अशा भीतीनें उताविळी होते. इतर धर्मांच्या आणि विशेषतः संस्कृतिहीन अशा मुसलमानांच्या अनुकरणानें आलेली ही वृत्ति आहे. धर्माचें अस्तित्व त्यांतील घटकांच्या संख्येवर अवलंबून नसून तेजस्वितेवर आहे, नुसत्या संख्यावृद्धि झालेल्या तेजहीन सांप्रदायापेक्षां तेजसंपन्न असा अल्पसंख्याक सांप्रदाय जास्त चिरंजीव होतो, जगाच्या कार्यक्षेत्रांत अग्रेसरत्व पावतो, व त्यामुळें पुढें त्याची आपोआप वृद्धिही होते. या धार्मिकश्रद्धांच्या अभावामुळें अशी भीति वाटते. तेजसंपन्न अशा **गुरुगोविंदाच्या** मूठभर लोकांनीं एका काळीं ही गोष्ट सिद्ध करून दाखविली. **समर्थांच्या महाराष्ट्रानें** त्याचा कायमचा धडा घालून दिला. इतिहासांत अशा प्रकारचीं आपल्या देशांतील व इतर देशांतीलही केक उदाहरणें सांपडतील. सारांश भीति अल्पसंख्याकतेची नाहीं, तेजहीनतेची आहे. संख्या वाढवूं नये, असा याचा अर्थ नाहीं. पण केवळ व्यापारी दृष्टीनें संख्या वाढविण्याच्याच भरीस न पडतां तेजस्वितेकडेही लक्ष दिलें पाहिजे. वाटेल तितक्या बाजारबुणग्यांपेक्षां लढाईच्या कामीं जिवास जीव देणारे चार मूठभर जिव्हाळ्याचे जीवच अखेरीस उपयोगी पडतात, हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. म्हणून परावृत्त होऊं म्हणणाऱ्या मनुष्याचा जिव्हाळाही थोडा कसून पाहिला पाहिजे.* आणि तसें करण्यांत त्याचें हितही आहे. केवळ खाण्यापिण्याचीच त्याला घाई असली, व तें लवकर घडून येत नाहीं, म्हणून जांवयाप्रमाणें त्याची तब्यत जात असली, तर असल्या माणसानें संघाची संख्या वाढविण्यापेक्षां, अल्पसंख्याकपणानें तो मरून गेलेला धार्मिकदृष्ट्या पुरवतो. जें जास्त शुद्ध आहे, त्यास मलिन व्हावयास वेळ

---

* Vivekananda wished to impose five years of novitiate in the department of social service ( homes, dispensaries, free and popular Kitchens etc. ) before entering the temple of science-and five years of intellectual apprenticeship before access to spiritual initiation properly so called.

Roman Roland's Vivekananda P. 363

लागत नाहीं, व त्यास मलिनपणांत पूर्णपणें सामावून जातां येतें. याच्या उलट स्थिति, जें मलिन आहे, त्याला शुद्धतेस नेतांना होते हिंदूसारख्या उच्च संस्कृतींतला मनुष्य दोन मिनिटांचा संस्कार होऊन मुसलमान झाल्याबरोबर खराच मुसलमान बनतो, इतकेंच नव्हे, तर, जातिवंत मुसलमानापेक्षांही हा बाटगा अधिक घातक होतो, यांत कांहीं नवल नाहीं. कितीही मोलवान वस्त्र असलें तरी एकदां त्यानें आपलें स्थान सोडलें कीं त्याची माती व्हावयास दोन मिनिटेंही लागत नाहींत. हीनसंस्कृतींतील लोकांचा हा नियम वैदिक संस्कृतीस लागू पडणार नाहीं. म्हणून पतितपरावर्तनाची अशी घाई न करतां जेणेंकरून त्या पतितांचीं शरीरें धुऊन निघ-तील, अशा प्रकारचें देशकालोचित तप त्यांच्या हातून करून घेऊन, नंतर व्रात्यस्तो-मासारखे प्रत्यक्ष विधि व्हावे. जे खरोखरच धार्मिक जिव्हाळ्यानें परावृत्त होऊं इच्छित असतील, ते या गोष्टीला कधींही नाहीं म्हणणार नाहींत. जे इतर भाडोत्री कार-णांनीं परावृत्त होऊं इच्छित असतील, त्यांनीं देखील नाइलाजास्तव कां होईना असें केल्यास त्या तपाचा फायदा, तो क्रिया—योग असल्यामुळें त्यास व त्या-मुळें अर्थातच सर्वसंघास मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. **मिस् मिलर**सारखी स्वभावतःच अगदीं भिन्न अशा पशुसंस्कृतींत पिढ्यान्‌पिढ्या वाढलेल्या वंशांतील मुलगी स्वधर्मांत घ्यावी किंवा नाहीं हा प्रश्न जरी सोडून दिला तरी, एकदां तिला धर्माची दीक्षा द्यावयाचें ठरल्यावर, तसें करण्यांत **डॉ. कुर्तकोटी** यांनीं जी घाई दाखविली, त्यामुळें त्यांच्या कार्याची जी हानि झाली, व त्यांचें जें वजन उडालें तें दोनचार '**गंगासंमतीं**'नीं ही परत येणार नाहीं. याच्या ऐवजीं तिला धर्मदीक्षा देण्यापूर्वी तिच्या हातून कांहीं विशेष तप कांहींकाळ करून घेतलें असतें ( अर्थातच विशेष तऱ्हेच्या आचारांनीं वागवून ) तर तिलाही त्याचा फायदा झाला असता, व **डॉ. कुर्तकोटींच्या** कार्यालाही वेगळें महत्व आलें असतें. निवळ पतितपरावर्तनापेक्षां हें उदाहरण वेगळ्या तऱ्हेचें आहे, हें खरें, परंतु त्यामुळें आमच्या ह्मणण्याचा भावार्थ लक्षांत येईल. सारांश एवढाच आहे कीं, पुनरावर्तनाची तळमळ खरोखरच धार्मिक श्रद्धेतून निघाली पाहिजे, ह्मणजे खाण्यापिण्यासारख्या गोष्टींचें फाजील महत्व वाटणार नाहीं. या गोष्टींना जें महत्व आल आहे, तें महत्व, मनुष्याकरतां खाणेंपिणें आहे, ही गोष्ट विसरून गेल्यामुळें आलेलें आहे. परकी लोकांनीं आपल्या राजनैतिककारस्थानाकरितां आमच्या शरीरांत मुद्दाम टोंचलेलें तें विष आहे. पाश्चात्यांच्या सहवासापूर्वीही

वर्णभेदाचे अथवा जातिभेदाचे द्वेष, मत्सर, कलह वगैरे दुष्परिणाम येथें घडून आले हें खरें. परंतु त्याचें कारण निराळें होतें. खाण्यापिण्यासारख्या, वैदिक लोकांच्या दृष्टीनें मनुष्याच्या चैनीकरतां नसून कांहीं ध्येयाच्या प्राप्तीस साधन ह्मणून अवश्य असलेल्या गोष्टीमुळें परस्परबंधुभाव बिघडू देण्याइतका मनाचा कोतेपणा आमच्या लोकांत नव्हता. जशा लष्करामध्यें विशेष रीतीनें तयार केलेल्या पलटणी असतात, तशा प्रकारें विशेष कामाकरितां कांहीं विशेष शिस्तीनें तयार होणारी, ब्राह्मण ही एक पलटण आहे. त्या विशेष कामालाधरून तिची सारी शिस्तच वेगळी पडली ह्मणून त्यामुळें परस्परांत कांहीं द्वेष उत्पन्न होण्याचें कारण नव्हतें. **महात्मा गांधींनीं** पूर्वी एका लेखांत सांगितल्याप्रमाणें प्रत्यक्ष मुलानें देखील आईच्या हातचें न खाण्याइतकी या गोष्टीविषयीची उदासीनता समाजाच्या आंगवळणीं पडली होती. त्याचें कारण असें होतें कीं पूर्वीच्या **चातुर्वर्ण्य**पद्धतीमध्यें प्रत्येक वर्ण हा कर्तव्यदृष्ट्या जरी परस्परांहून वेगळा असला, तरी त्याच्या ठिकाणच्या विशेषामुळें आपापल्या ठिकाणीं मोठाच होता. वेदविधेचा कारखानदार ह्मणूनब्राह्मणाचें जितकें महत्व होतें तितकेंच महत्व प्रजापालक ह्मणून क्षत्रियाचेंही होतें. ' तस्मात् ब्राह्मणः अधस्तात् क्षत्रियं उपासते '– असें जें ह्मटलें आहे, तें एवढ्याच करितां. क्षत्रियाचा बच्चा राजसिंहासनावर बसल्याबरोबर प्रत्यक्ष त्याचा बाप देखील आपला वडीलपणा न गमावतां राजा ह्मणून त्याला मुजरा करतो. व तो मुलगाही आपला राजेपणा न गमावतां त्याच्या पायावर डोकें ठेवून त्याचा आशीर्वाद घेऊं शकतो. पुष्कळ अंशीं तसाच हा प्रकार होता. वैश्याचेंही महत्व त्याची धनिकता, आणि ऐहिक सुखोपभोग व पारलौकिक हित यांचा त्याच्या-ठिकाणीं होणार मधुर संगम, याच्यामध्यें होतें. शूद्र हा जरी परिचर्या करणारा होता, तरी त्या परिचर्येला धरून येणाऱ्या नम्रतादि इतर गुणांनींच तो सर्वापेक्षां आपलें श्रेष्ठत्व कसें, जाणवीत असे, हें शूद्रकुलांत जन्म घेऊन, आपला शूद्रपणाचा बाणा तिळमात्रही न गमावतां, **रामेश्वरभट्टा**सारख्या दशग्रंथी ब्राह्मणासही पूज्य होऊन बसणाऱ्या, **श्रीतुकाराम**महाराजांनीं प्रत्यक्ष दाखविलें आहे. आजच्या काळांतही, सौजन्य, भूतदया सत्य इत्यादि गुणांचा उत्कर्ष असलेल्या एकाद्या अतिशूद्राच्या पायावर प्रत्यक्ष डोकें ठेवीत नसले, तरी महाकर्मठ ब्राह्मणही त्याला त्याला पूज्य समजतात, व तसाच मानही देतात. म्हणजे कार्याला अनुसरून प्रत्येक गोष्टीचा मोठेपणा निरनिराळ्या गोष्टींमध्यें आहे, व तसाच तो

असणें अवश्य आहे, हें पूर्वी पटलेलें तत्व अजूनही लोकांच्या अंतःकरणांत आहे. परंतु केव्हांही याच तत्वाला अनुसरून समाज प्रत्यक्ष वागत असला तरी, नवीन वळणाचे लोक परकी अंतःकरणामुळें हें विसरून जाऊन, अथवा अनेक प्रकारच्या हेतूंनीं विसरल्यासारखें दाखवून, याच्या उलट ओरड करतात. कोणतीही एखादी गोष्ट घेतली ह्मणजे ती सर्वांची एकजात सारखी असण्यांतच त्यांचें मोठेंपण आहे, ही समानतेची व बंधुभावाची कल्पना किती हीन आहे, हें मांडून दाखवा-वयास मोठासा प्रयत्नही नको. क्षणमात्र विचारांनीं कोणासही ही गोष्ट पटून येईल. धर्मविषयीं उदास असून राजकीय अस्तित्वालाच सर्वस्व मानणाऱ्या पाश्चात्य समाजांत हें प्रत्यक्ष दिसून येतें. तेथें जसा राजकीय कार्य करतांना मनुष्य कोणत्या धर्ममताचा आहे, अथवा तो कशा वर्तनाचा आहे, हें कांहींच आड येऊं शकत नाहीं, तसें बंधुभावाची व समतेची उच्च व यथार्थ कल्पना असलेमुळें मनुष्य काय खातो, व किती अंतरावर खातो, हा प्रश्नच पूर्वी उत्पन्न होत नव्हता. याचें कारण समानता ही आचारविचारांच्या कृत्रिमतेंत नसून निराळ्याच गोष्टीमध्यें आहे, व ज्या अर्थानें या शद्वाचा समाजाची व आचारविचाराची निंदा करतांना उपयोग करण्यांत येतो, त्या अर्थानें खरी समानता या जगामध्यें केव्हांही शक्य नाहीं, ही गोष्ट पूर्वीच्या लोकांस पुरती पटलेली होती. **श्रीअण्णासाहेब** यांच्या चरित्रांत ह्मटल्याप्रमाणें गाईचा चारा माणसापुढें ठेवून पुरणाची पोळी गाईस घालणें नसून प्रत्येक मनुष्याला आपल्या आयुष्याच्या कर्तव्याची व प्राप्तव्याची परमसीमा शक्य तितक्या थोड्या वेळांत व शक्य तितक्या थोड्या परिश्रमांत प्राप्त करून घेतां येईल अशी स्थिति प्रत्येकापुढें ठेवणें, व तिचा फायदा वाटेल त्यास प्रयत्न केल्यास मिळवितां येईल अशी अंतःकरणाची व राज्यव्यवस्थेची धारणा असणें, याचें नांव समानता. शेकडों वर्षें अनेक प्रकारचे प्रयोग केल्यावर पाश्चात्य लोकां-सही ही गोष्ट थोडी थोडी पटूं लागली आहे. परंतु त्यांच्या केवळ जडवादीपणामुळें ही कशी घडवून आणावी, हें त्यांना उमगत नाहीं. **ट्रॉट्स्की** या सुप्रसिद्ध रशियन पुढाऱ्याच्या समानतेच्या तत्वावर रशियाची नवीन घडी बसविण्याच्या विचारा-संबधीं **मिन्स्कीनें** जें ह्मटलें आहे, तें या बाबतींत ध्यानांत ठेवण्याजोगतें आहे;—

He ( Trotsky ) does not promise universal equality. His object is only to seceure an equal right to an equal chance for unequal human beings. जवळजवळ हेंच तत्व पुढें ठेवून पूर्वीच्या लोकांनीं समाजाची घडी बसविली होती. ब्राह्मणांना मंत्रशास्त्रा-

च्या दृष्टीनें तयार केलें होतें, तर क्षत्रियांस योगाची दीक्षा दिली होती, व त्यांच्या बरोबरीची आधिदैविक व अध्यात्मिक उन्नति साधण्याकरितां वैश्य व शूद्र यांस नामस्मरण इत्यादि त्याच तोलाचीं दुसरी साधनें दिलीं होतीं, व प्रत्येक वर्णांतील हरएक व्यक्तीला त्या साधनांचा थोडाबहुत तरी लाभ होईलच, अशा आचार विचाराच्या परंपरा घालून दिल्या होत्या. ह्मणजे अध्यात्मिक उन्नतीचें प्रमाण व आधिदैविक सामर्थ्याची मौज यांचें सरासरी प्रमाण सर्व वर्णांत सारखे असे. व त्यामुळें वर्णदृष्ट्या एकमेकांना हीनता वाटण्याचें कारण न राहिल्यामुळें कार्यदृष्ट्या आचार विचारांत फरक पडला, तरी त्यामुळें बंधुभावांत कमीपणा होत नव्हता, व द्वेष मत्सरांनाही जागा नव्हती. अंतःकरणाच्या मोठेंपणांत खरें मोठेंपण आहे, बाह्य उपाधींत नाहीं, ही भावना अतिशय विस्तृत प्रमाणांत रूढ होण्याइतकी सामान्यतः सर्व समाजाची परिणत स्थिति होती. जवळजवळ अशाच तऱ्हेची कल्पना येशू ख्रिस्तानेंही ' मनुष्य जें पोटांत घालतो त्यांत त्याचें नफानुकसान नसून—That which comes out of him defiles a man ' या उपदेशांत सांगितली आहे. कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाला अनुसरून त्या कारखान्याची दगडमातीसुद्धां वेगळ्या रीतीनें उभारणी केलेली असते, आणि त्याचीं चालविण्याची व्यवस्थाही वेगळी असते. ह्मणून, त्यांत कांहीं कमीपणा नसतो. नायट्रोग्लिसरिनच्या कारखाना घालतांना तर सर्वांत अधिक खबरदारी घ्यावी लागते. त्या कारखान्याच्या आजूबाजूस पुष्कळ दूरपर्यंत नुसती एखादी गाडी गेल्याचा आवाज देखील होणार नाहीं, अशा बंदोबस्तानें तो एकांतांत घालावा लागतो. त्यांतील जमिनी देखील अतिशय मऊ, काम करणारीं माणसेंही मुद्दाम वेगळ्या शिस्तींत तयार केलेलीं, अशीं लागतात; तेव्हां कोठें कोणताही अनर्थ न होतां हें संहारकारक द्रव्य खंडोगणती तयार होतें. नुसता पेला पडल्याचा आघात होऊन देखील, सबंध कारखाना उडून गेल्याचीं उदाहरणें आहेत. अशाच तऱ्हेचा ब्राह्मणवर्ण हा विशिष्ट कारणाकरितां काढलेला कारखाना असल्यामुळें, त्याची वाढ व जोपासना तशाच तऱ्हेनें झाली पाहिजे. बरें, याबद्दल आधिभौतिक दृष्टीनें पाहिलें तर त्यांना कांहीं जास्त दिलें होतें, असें नाहीं. आधिभौतिक वैभव व आधिभौतिक सुखोपभोग हे तर सारे बाकीच्या तीन वर्णांनाच अनुकूल होते. नाहीं, ह्मणावयास ब्राम्हणांची संसारयात्रा सुरळितपणें चालविण्याची जबाबदारी बाकीच्या वर्णांवर होती; त्यामुळें प्रत्येकजण आपला विशिष्ट तऱ्हेचा मोठेपणा सांभाळून इतरांशीं नम्रतेनें वागत होता. असें असल्यामुळें आहार विहार आग्रह वगैरेंचा कडकपणाही अर्थात् कमी असणें

साहजिक होतें. परंतु पुढें कालांतरानें इतर वर्णांनीं आपलें जीवन केवळ आधिभौतिक करून, उन्नतीच्या बाकीच्या दोन बाजूंकडे अगदींच दुर्लक्ष केल्यामुळें, कांहीं व्यक्तींचे अपवाद सोडले तर, सर्व समाजाच्या दृष्टीनें ब्राम्हण व ते वर्ण यांच्या संस्कृतींत अंतर पडलें; व त्यामुळें साहजिकच ब्राम्हणास व्यवहार आणि आचार यांच्या बाबतींत जास्त तुटून वागावें लागलें. आणि पुढें पुढें तर आजच्या विकृत अस्पृश्यतेसारखें त्याला दुष्ट स्वरूपही आलें. पण असें घडणें अपरिहार्य होतें. अशा प्रसंगीं मूलतत्त्वास धक्का न बसतां, वेगळी घडी बसविण्याकरितांच निरनिराळ्या स्मृतींचे अवतार झाले. आजही तशीच आवश्यकता आहे; परंतु आम्हीं मागें सांगितल्याप्रमाणें, वैदिकधर्माच्या मूल भावनांना धरून आजचे प्रयत्न होत नाहींत. त्या मूल भावनांच्या पदावर ढळलेलें गाडें पुन्हां बसविण्याच्या शुद्ध हेतूपेक्षां अवांतर हेतूच या प्रयत्नांच्या पोटांत असतात आणि म्हणून या प्रश्नांचे नीट उलगडेही होत नाहींत. याचा जास्त विचार केल्यास तोच एक स्वतंत्र विषय होऊन बसेल, म्हणून एवढ्यावरच तो सोडून आपल्या मूळ विषयाकडे वळणें भाग आहे. तरीपण, एवढें म्हणणें भाग आहे, कीं पोटजातींचें एकीकरण व पतितपरावर्तन यांच्यापेक्षां स्पर्शास्पर्शाच्या या चळवळीस फाजील महत्व देण्यांत आलें आहे, व त्याचा विचारही केवळ व्यवहारिकतेनेंच करण्यांत येतो. याच्या उलट, कर्मठ लोकांकडूनही हा प्रश्न जसा सोडवावयास पाहिजे, तसा सोडविला जात नाहीं. महाराच्या मुलानें तिकिट कलेक्टरची टोपी घालून हातांतून तिकीट घेतलें, तर कोणीही घरीं येऊन आंघोळ करीत नाहीं. आणि मंडईत बसलेली मुसलमान माळीण धडधडीत विटाळशी असतां तिचीं ओलीं पानें घेऊन, वाटेल तो कर्मठ ब्राम्हण घरीं आल्याबरोबर सोंवळें नेसून वैश्वदेव करावयास बसतो. अशा स्थितींतःप्रत्यक्ष महाराच्या विटाळास त्यांनीं कां महत्व द्यावें, हें समजत नाहीं. झाडाचे तोडलेले आंबे, कोणीही आणले असतां, ती निसर्गवस्तु म्हणून त्यांतील रसाचा कोणीही विटाळ मानीत नाहीं. त्याचप्रमाणें पाणी ही केवळ ईश्वरनिर्मित नैसर्गिक वस्तु असतांना, इतकेंच नव्हे तर, पंचभूतांतील तें एक स्वतंत्र तत्व असतांना त्याच्याचवर सारा विटाळ कां येऊन पडावा, हे समजत नाहीं. पाण्यांत वाहकधर्म, पृथ्वी व अग्नि यांपेक्षां जास्त असल्यामुळें तसें करणें भाग आहे, असें कोणी म्हणतील, तर तें कांहीं चूक नाहीं. परंतु प्रत्यक्ष पाण्यास कसला संपर्क होऊं नये एवढी काळजी घेतली म्हणजे पुरे आहे. परंतु पाण्याच्या भांड्यास वरून देखील विटाळ होतो, अथवा, पाण्याचें तळें आणि विहीर विटाळते, असें मानणें म्हणजेही

वैदिकधर्माच्या मूल भावनांचा विपर्यासच आहे. वस्तुतः पाण्यासारखा 'शिवतम रस'- कीं ज्याच्या योगानें इतर वस्तूचें आपण शुद्धीकरण करतों—तो इतक्या क्षुल्लक गोष्टींनीं स्वतः अशुद्ध कसा होईल? 'आपोहिष्ठा मयोभुवः' हें काय नुसतें रोज तालीम म्हणून म्हणावयाचें? असो; वर सांगितलेच आहे कीं, या विषयांत स्वतंत्रपणें आम्हांस शिरावयाचें नाहीं, तरीपण, असल्या प्रकारच्या सर्व प्रश्नांच्या उलगड्याची थोडीशी दिशा दाखविण्याकरितां एवढें लिहिलें. आतां हें विषयांतर सोडून आपल्या मूल प्रश्नाकडे वळूं.

पतितपरावर्तन करतांना परावृत्त होऊं इच्छिणाऱ्या मनुष्याच्या हातून कांहीं प्रकारचें तपाचरण करून घेऊन मग व्रात्यस्तोमासारखे संस्कार करावें, असें आम्हीं म्हटलें आहे. त्यावर कोणी अशी शंका घेतील कीं, पुष्कळ वेळां अशीं परावृत्त माणसें आणि त्यांचीं कुटुंबें हीं जरी आपणांस दुसऱ्या धर्माचीं म्हणवीत असलीं, तरी देखील घरांत व बाहेरील आचरणांतही हिंदु—आचारविचारच अतिशय शुद्धतेनें पिढ्यानपिढ्या पाळणारीं असतात. अशा वेळीं आणखी वेगळ्या शुद्धतेची व तपाची गरज काय? या शंकेंत थोडेंसें तथ्य दिसलें तरी, खोल विचार केला असतां ही शंका व्यर्थ आहे, असें सहज दिसून येईल. कोणत्याही गोष्टींत शास्त्र म्हणून ज्या वेळेला नियम घालून द्यावयाचा असतो, तेव्हां तो एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या अथवा एखाद्या विशिष्ट समाजाच्या दृष्टीनें घालावयाचा नसतो; तर त्यांतला जो कांहीं विशेष हेतु असतो, तो केव्हांही नजरेआड होणार नाहीं, अशा मुख्य धोरणानें घालावयाचा असतो. असें करतांना क्वचित् असेंही होतें कीं कांहीं व्यक्तींना वस्तुतः गरज नसतांही त्या नियमाच्या बंधनांत रहावें लागतें. परंतु त्याला कांहीं उपाय नाहीं. आणि धार्मिक श्रद्धेनें या गोष्टी करणाऱ्या मनुष्यास त्यांचें कांहीं जडही वाटावयाचें नाहीं. धर्माचें अंतिम जरी मनुष्याला सर्व बंधांतून पार पाडून पूर्णपणें मुक्त स्थितीस पोहोंचविण्याचें असलें, तरी आम्हीं पूर्वी दाखविलेंच आहे कीं, प्रत्यक्ष धर्म हा मनुष्यास अनेक प्रकारच्या बंधांतच रहावयास शिकवितो. पूर्ण मुक्त स्थिति काय असेल ती खेरीज करून, इतर कोणासही केव्हांही, 'बंधनापलीकडे' राहणें शक्य नाहीं. आणि जसजसें ध्येयाचें महत्त्व मोठें, तसतसें बंधन जास्त अवश्य होत जातें. सर्व प्रकारें मनुष्याची सोय पाहतों, असें म्हणणारीं पाश्चात्य राष्ट्रें ही लष्करी शिस्तीच्या बाबतींत केवढीं कडक असतात, तें पाहण्याजोगतें आहे. तेवढ्याकरतां मुद्दाम मार्शल लॉ च ( लष्करी कायदा ) वेगळा असतो. सारांश,

कोणताही संघ म्हटला म्हणजे, त्यांत त्याचीं बंधनें पाळण्याकरितां, व तशीं तीं पाळून त्याचा लाभ उपभोगण्याकरितांच शिरावयाचें असतें. बंधनापलिकडे राहण्याचा प्रयत्न करून पुन्हा त्या संघाचा घटक म्हणविण्याची ऐट करणें, हें थोतांड आहे. सारांश, जरी प्रत्यक्ष कांहीं व्यक्तींना गरज नसली, तरीही केवळ संघाची व्यवस्था मोडूं नये म्हणून, त्यांना त्या नियमांनीं बांधून घेणें भाग असतें. एकदां कायद्याच्या दृष्टीनें एकूणवीस वर्षें पूर्ण भरल्यावर मनुष्य शहाणा होतो, असें ठरलें, म्हणजे तें सर्वांसच सारखें लागू असतें. एकोणीस वर्षें होऊन गेल्यावरही अक्कलशून्य असणारीं शेकडों माणसें असतात, परंतु कायद्याच्या दृष्टीनें तीं शहाणींच समजलीं जातात. आणि एकोणीसाव्या वर्षी एम्. ए. च्या परिक्षेस बसण्याइतकी विलक्षण बुद्धिमत्ता असणारा एखादा कोणी असला तरी कायदा त्याला बालच समजतो, व स्वतःच्या जबाबदारीवर प्रत्यक्ष बापाच्या इस्टेटीचा व्यवहार करण्यास देखील, दोन वर्षें वाट पहात त्यास बसावें लागतें. त्याचप्रमाणें धर्म नियमांचीही गोष्ट आहे. आणि खरोखर धार्मिक श्रद्धेनें या गोष्टी करणाऱ्याला त्याचें कठीण वाटत नाहीं.

आजकालच्या काळांत जें बहकलेलें वाङ्मय उत्पन्न होत आहे, त्याचें सर्व धोरण या तत्वाच्या विरुद्ध आहे. असल्या सामुदायिक बंधनांनीं असो, किंवा व्यक्तीच्या स्वतःच्या दोषामुळें असो, समाजांत अनेक व्यक्तींची फार दुर्दशा झालेली दिसते. तिची कहाणी ऐकून कोणाही मनुष्याचें हृदय द्रवून जाईल अशीच ती दुखः-पूर्ण असते. अशीं उदाहरणें मुद्दाम निवडून काढून, अथवा, तशा प्रकारच्या घटना, कल्पनेनें घडवून आणून, त्याचीं भडक चित्रें हृदयंगमपणानें लोकांपुढें मांडावयाचीं, व ' हा आमचा समाज, ' ' ही आमची रूढी, ' ' हा आमचा धर्म, ' ' धिःकार, ' ' धिःकार '—अशा तऱ्हेची नाटकी ओरड करावयाची, हें अलीकडील एका फार मोठ्या लेखन सांप्रदायाचें मुख्य लक्षण आहे. असें करण्यांतच आपण लोकांस खरें शिक्षण देतों, व मोठी लोकसेवा करतों, अशीही ऐट त्याच्या बरोबरच असते. अशा प्रकारचें प्रामाणिक मतही पुष्कळांचें आढळून येतें. परंतु त्याचें मुख्यतः कारण एकच असतें. आणि तें हेंच कीं अशीं माणसें जरी स्वतःस कोणत्याही धर्माच्या कक्षेतील म्हणवीत असलीं तरी त्यांचा स्वतःचा त्या धर्माचें मूलभूत तत्व जें ईश्वराचें अस्तित्व आणि कर्मतत्व, त्यावर जिवंत विश्वास नसतो. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे हीं माणसें नास्तिक असतात. नास्तिक असणें हा कांहीं गुन्हा नव्हे, परंतु वस्तुतः नास्तिक असतां, धर्माच्या कक्षेंत राहण्याचें व धर्माच्या निशाणाखालीं लिहिण्याचें ढोंग करून

वाचकांची दिशाभूल करणें, हा मात्र गुन्हा आहे. अशा लोकांनीं आपला स्वतंत्र सांप्रदाय काढून त्याप्रमाणें उघड उघड लिहणें फार चांगलें. नवऱ्याच्या पाशवी अत्याचारास बळी पडलेल्या शेंकडों स्त्रिया, सर्वसाक्षी ईश्वर सर्व जाणतो, व एक दिवस मोठ्या कृपेनें आपल्या दुःखाचें गोड फळ आपणास देईल अशा दृढ विश्वासानें, मोठ्या धीरगंभीरतेनें, सर्व आयुष्यभर वाटेल तसा छळ सोसून, हांसत हांसत प्राण सोडतात. आयुष्यांत मिळणारें खाण्यापिण्याचें, कपड्यालत्त्याचें, नटण्यामुरडण्याचें, आणि परस्परसख्याचें सुख न मिळाल्याबद्दल त्यांना खेद होत नाहीं, असें नाहीं. परंतु त्याचबरोबर धर्माची आणि ईश्वरावरील विश्वासाची जी जिवंत ज्योत, त्यांच्या अंतःकरणांत जळत असते, तिच्यायोगानें या सुखापेक्षांदेखील एकप्रकारचें अलौकिक समाधान व दिव्यतेज त्यांच्या ठिकाणीं असतें. अशा स्थितींत धीर सुटून एखादी नादान व्यक्ति स्वैर वर्तनानें पापाच्या अथवा दुःखाच्या पंकांत पडली, ह्मणून तिची किंमत काडीइतकीही जास्त ठरत नाहीं. कांहीं झालें तरी तो तिचा नादानपणाच. एवढेंच कीं तेवढ्याकरितां ती उपहासास पात्र होऊं शकत नाहीं व अशा प्रकारचे प्रसंग या नाहीं त्या प्रकारानें, सर्व प्रकारच्या सामाजिक व धार्मिक जीवनांत पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही उत्पन्न होतात, ह्मणून तिच्याविषयीं जास्त कळवळ्यानें व जिव्हाळ्यानें आपलें अंतःकरण तुटलें पाहिजे, एवढाच त्याचा अर्थ होतो. घरांतून वावरतांना कित्येक वेळां दार लागून टेंगूळ येतें, ह्मणून कांहीं कोणी तें खणून टाकित नाहीं, अथवा, वाटेल तितकें अवाढव्य करीत नाहीं. तर उलट, स्वतःच जपून राहण्याचा धडा उचलतो. या गोष्टी अगदीं सरळ आहेत, परंतु मुद्दाम आंगीं आणलेल्या भांगेस उतार काय द्यावा? बरें, अशा लोकांना अथवा उघड उघड नास्तिकपण्याच्या बाण्यानें लिहिणारांनाही कांहीं तरी बंधनांची अवश्यकता आहे, हें पटतच असतें. परंतु, वाद एवढाच असतो कीं, आगींतून निघा, आणि फुपाट्यांत पडा. मनुष्याच्या दुर्बळपणामुळें व कित्येकवेळां त्याचा दोष नसतांही बाह्य परिस्थितीनें त्याच्या सर्वसुखाचें मातेरें होऊन गेलेलें पाहिलें ह्मणजे अंतःकरण कळवळून एक प्रकारचा सात्विक संताप उत्पन्न होणें, साहजिक आहे. परंतु त्यावरून व्यक्तीचें स्तोम माजवून बंडखोरपणा शिकविणें किती अयोग्य आहे, हें **सर वॉल्टर स्कॉट** या थोर कादंबरी लेखकाच्या उद्गारावरून दिसून येईल. वरच्या सारखा भ्रम मनुष्याच्या अंतःकरणास पडतो, ह्मणून त्यास सावध करण्याकरतां ह्मणून त्यानें हा मुद्दाम इशारा देऊन ठेवला आहे. आणि सूक्ष्म विचार करून पाहिलें तर असें दिसून येईल

कीं केवळ व्यक्तीच्याच सुखदुःखाचा विचारकरून अशा बंडखोरीला पूज्यपदावर चढविलें तर मनुष्याच्या भावनांतून ' उदात्त ' हा शद्बच काढून टाकावा लागेल. सारांश, अपवादास सिद्धांताचें स्वरूप देण्याची ही प्रवृत्ति, जरी मोठी मोहक व कांहीं फायद्याची वाटत असली, तरी एकंदर विचारकरतां घातुकच आहे, आणि-ह्मणून मानसशास्त्राच्या व त्यावर रचलेल्या शिक्षणशास्त्राच्या तत्वांप्रमाणें त्या सुरांत गाणीं गाणें हानिकारक आहे. क्वचित् एकाद्या प्रसंगीं, घटस्फोट करून एकाद्या स्त्रीनें खाण्यापिण्याचें व विषयाचें सुख साधलें असलें, तरी तिच्यापेक्षां या सर्व गोष्टींना लाथ मारून, आपल्या शरीराचें व प्रेमाचें पानदान न करतां, धीरगंभीरतेनें वाटेल ती आपत्ति सोसणाऱ्या व्यक्तीची जास्त धन्य होय, असें खुद्द सौ० **कमलाबाई बंबेवाल्यांच्या** अंतःकरणासही वाटल्यावांचून राहणार नाहीं. असो **श्रीअण्णा-साहेब** यांच्या चरित्रांत उधृत केलेला वरील स्कॉटचा उतारा इतका सुंदर आहे कीं, तो येथेंही दिल्याखेरीज राहवत नाहीं. * त्यावरून एक गोष्ट सहज लक्षांत येईल

---

* A character of a highly virtuous and lofty stamp is degraded rather than exalted by an attempt to reward virtue with temporal prosperity. Such is not the recompense which Providence has deemed worthy of suffering merit, and it is a dangerous and fatal doctrine to teach young persons the most common readers of romance, that rectitude of conduct and principle are either naturally allied with or adequately rewarded by the gratification of our passion, or attainment of our wishes. In a word, if a virtuous and self-denied character, is dismissed with temporal wealth, greatness, rank or the indulgence of such a rashly formed or ill-asserted passion as that of Rebecca for Ivanhoe the reader will be apt to say " Verily virtue has had its reward. " But a glance on the great picture of life will show that the duties of self--denial and the sacrifice of passion to principle are seldom thus remmerated; and that the internal consciousness of their highminded discharge of duty producess on their own reflections, a more adequate recompense, in the

कीं, एकोणिसाव्या शतकांतील बिचाऱ्या स्कॉटलादेखील मनुष्यप्राण्याचा विचार ईश्वराशिवाय करतां येईना. अर्थात्, विसाव्या शतकांतील या पूर्ण सुधारणेच्या काळीं मनुष्यास अशी अडचण पडण्याचें कारण नाहीं. बी. ए. किंवा एम्. ए. सारखी एकादी पदवी, आणि चटकदार शद्बसंपत्तीचें भांडार एवढें जवळ असलें कीं पुरे आहे. मानवी जीविताचीं वाटेल तीं कोडीं हां हां ह्मणतां तो सोडवून दाखवितो. **स्कॉटच्या** या उताऱ्यांतील Rectitude of Conduct and Principle are either naturally allied with or adequately rewarded by the gratification of our passion or attainment of our wishes. यांतील are शद्ब काढून टाकून ought to be असे शद्ब घातले ह्मणजे मराठींतील या विशिष्ट संप्रदायाचें यथार्थ वर्णन होईल. हिंदुअंतःकरणाला मुसलमान होणें ही जितकी किळसवाणी गोष्ट वाटते, तितकेंच दिलें दान घेतलें दान हे किळसवाणे आहे हें मोठ्यांनाच तर काय पण, पोरांसोरांनाही समजतें.

---

form of that peace which they can not give or take away.

Extract from the Introduction to Ivanhoe

by Sir **Walter Scott.**

भावार्थः—

सद्गुणाचें पर्यवसान नेहमी ऐहिकसुखातच होते असे दाखविल्यानें उदात्त आणि उदारगुणवान् अशा स्वभावचित्रास कमीपणाच येतो. अशा तऱ्हेची विधात्याची योजनाही नाहीं. कादंबरी वाङ्मयाचे खरे वाचक जे तरूणलोक त्यांना, तत्वनिष्ठा आणि मनोनिग्रह यांना अखेरीस वासनापूर्तीचें फळ मिळतें असें शिकविणें घातुक आहे. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे जर नीतिमत्ता आणि आत्मयज्ञ यांचें फळ संपत्ती, कीर्ति, सत्ता, अथवा आयवान्होबद्दल रेबेकाच्या मनांत उद्भवलेल्या वस्तुतः अयोग्य आणि अविचारी प्रणयाची कृतार्थता इत्यादिरूपानें मिळाल्याचे दाखविलें तर वाचक चटकन ह्मणतील ' वाः सद्गुणाचे सार्थक झाले ' पण खरें पाहूं जाता मानवी आयुष्याच्या विस्तृत पटावर नुसती दृष्टी टाकली तरी असें आढळून येईल कीं तत्वनिष्ठा आणि आत्मयज्ञ यांचे अशा प्रकारचे परिणाम क्वचितच घडतात. कर्तव्यपूर्तीच्या अंतर्गत जाणीवेनें जो श्रेष्ठ आनंद, जें इतर कोठुनही मिळत नाहीं अथवा मिळालें असतां कशानेंही कमी होत नाहीं असें आत्यंतिक शांतिसुख तेंच वस्तुतः सर्व सद्गुणांचे व आत्मयज्ञाचे खरें फळ होय.

पृथ्वीच्या पाठीवर कुठेंही जा सर्व ठिकाणीं मानवी मनाचा असाच कल दिसून येतो. जगांतील यत्चयावत् भावप्रधान वाङ्मयाचा सारांश पाहिला तर एवढाच दिसतो कीं, मानवी हृदय वाटेल तितकें विस्तृत होऊन, काम पडल्यास साऱ्या विश्वावर आपली पाखर घालूं शकेल. परंतु त्याची पुडी करून कोणास त्याचें दान करावयाचें ह्मटलें ह्मणजे, ती अशीच वस्तु आहे कीं, तें कोणास तरी एकदांच करतां येतें. पुन्हा पुन्हा त्याच रीतीनें तसें करतांच येत नाहीं. पुन्हा पुन्हा त्याचें दान ह्मणजे, वर ह्मटल्याप्रमाणें, त्याचें पानदान बनविणेंच आहे. या गोष्टींत कांहीं-तरी कमीपणा आहे, असें इतरांस तर काय, पण ती करणाऱ्या हृदयासही जाणवल्याशिवाय राहत नाहीं, अशी आमची बालंबाल खात्री आहे. हृदयासारखी दिव्य वस्तु अतिशय शुभसंस्कारांनीं वाढवून, मोठ्या पवित्रपणानें तिचा एकदां कोठें तरी नैवेद्य दाखविल्यावर, ' अंशतः गुडनैवेद्यं ' ह्मणून पुन्हा तिच्याभोंवतीं दुसऱ्याकरितां पाणी फिरविणें हें केव्हांही झालें तरी गौणच ठरणार. असें असतां तसें करण्याचा देशकालाला अनुसरून जरी प्रसंग आला, तरी तो उघड उघड गौण ह्मणूनच पत्करला पाहिजे. असें असतां, त्यांतलें गौणत्व काढून टाकून, सहृदयतेच्या नांवाखालीं तिला ज्या थोरवीस चढविण्यांत येत आहे, त्याचें खरें कारण एकच आहे. आणि तें धर्मश्रद्धेचा अभाव हें होय. धर्म ह्मणजे-केवळ धार्मिक आचार या अर्थानें आह्मीं हें लिहीत नाहीं. धर्माचें मूळ देव आहे, आणि ह्मणून मनुष्याचे आदि अंत देवांत आहेत, मनुष्याच्या सर्व कर्मांचें, वासनांचें, सुख दुःखांचें इतकेंच तर काय, पण यत्चयावत् सर्व मानवी जीवनाचें पर्यवसान ' देव ' नांवाच्या एका श्रेष्ठ ठिकाणीं व्हावयाचें आहे, या जिवंत विश्वासांत आहे. अशा विश्वासाच्या लोकांसच, अथवा असा विश्वास गृहीत धरून आपलें आयुष्य आंखणाऱ्या लोकांसच खरे धार्मिक ह्मणतां येतें. मग त्या देवाविषयीं त्यांची धारणा कशीही असो. निदान धर्माच्या कक्षेंत आहे असें ह्मणणाऱ्या प्रत्येक जीवानें एवढ्या ' क्रीड ' वर तरी सही दिली असलीच पाहिजे. या श्रद्धेचा अभाव असल्यामुळें, सदरहु लेखक-वर्गाच्या अंतःकरणाची स्थिति रा० **नागेशराव बापट** यांनीं **पानीपतची मोहीम** या सुप्रसिद्ध कादंबरींत वर्णन केलेल्या, पानिपत प्रसंगाच्या पूर्वरात्रीच्या मराठ्यांच्या छावणीसारखी झालेली असते. आदिअंतीं कांहींच नाहीं, दृश्य सुखपभोग व्यवस्थित रीतीनें घेतले असतां मनाला एक प्रकारचें समाधान मिळतें, तेंच अथवा फार झालें तर आपल्या कल्पनांतच रंगून जाण्याचें सुख हेंच काय तें ध्येय. उद्यां काय

होईल त्याचा नेम नाहीं अशा स्थितींत वाटेल तें करून चालू क्षण साधला नाहीं, तर सारा बाजार बुडाला, अशा अधीरपणानें, ही विचारसरणी उत्पन्न झाली आहे. तसें प्रामाणिकपणें वाटत असल्यास तो कांहीं दोष नाहीं. आमचें ह्मणणें एवढेंच आहे कीं, तसें उघड ह्मणा. धर्माच्या या मूलभूत श्रद्धेचा अभाव असतां त्याच्या नांवाखालीं, अथवा त्यांत सुधारणा करण्याच्या कळकळीच्या नांवाखालीं दिशाभूल करूं नका.

यावर कोणी असें ह्मणेल कीं 'कां हो, तुमचें ह्मणणें खरें ह्मणावयाचें ह्मणजे, मग 'प्रगति' हा शब्दच खुंटला ह्मणावयाचा. कारण या 'भीष्म' सांप्रदायाप्रमाणें कशांत कांहीं फरक करणेंच शक्य नाहीं. परंतु देशकालाला अनुसरून आचारविचार पालटतात, आणि ह्मणूनच निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या स्मृति उत्पन्न झाल्या, त्यांची वाट काय? तसेंच करण्याची जर कोणास आजच्या काळीं आवश्यकता वाटत असली, तर त्याच्या नांवानें तुह्मी काय ह्मणून खडे फोडणार?

हें ह्मणणें सयुक्तिक आहे. निरनिराळ्या स्मृतींची व आचारधर्माची वेगवेगळ्या काळीं नवीन आवृत्ति काढण्याची गरज भासते, हें तर उघडच आहे; व अशा प्रकारच्या आचारधर्माच्या आजपर्यंत केक आवृत्त्या निघालेल्या उघड उघडच दिसत आहेत. * या आवृत्त्यांनीं प्रगति झाली किंवा काय हें जरी सांगणें कठीण असलें, तरी एवढी तरी गोष्ट खास कीं, त्या त्या काळीं समाजांत माजलेला सांवळा गोंधळ मोडून टाकून, खुंटून पडलेल्या धर्मचक्राची पुन्हां वाटचाली त्यांनीं केली. उपलब्ध **मनुस्मृती**वरून देखील, हीच गोष्ट दिसून येते. आजच्या सारख्याच

---

* आचार पालटून मूळ वेदिक तत्वास धरून नसलेल्याही परंपरा उत्पन्न होतात व केवळ त्यांचा उल्लेख अथवा रूढी आहे म्हणूनच त्यांना वैदिक समजण्याचें कारण नाहीं हेही दिसून येते. नियोगाचा विधि सांगताना मनुला जे क्लेश झालेले दिसतात ते लक्ष्यांत घेण्याजोगे आहेत. 'परपूर्वापतिस्तथा' 'भस्मनीवहुतंहव्यं तथा पौनर्भवद्विजे' वगैरे स्थळेंही अशींच आहेत. नियोगाविषयी तर त्यानें तो वैदिक तत्वास सोडून आहे असें स्पष्टच दर्शविलें आहे. 'मनुष्याणामपिप्रोक्तो वेने राज्यं प्रशासति'।' वर्णानां संकरं चक्रे कामोयहतचेतनः'। नुसता शास्त्र वचनाचा आधार उपयोगी नाहीं तत्त्व समन्वय पाहिजे ह्मणुन आह्मी ह्मटलें आहे तें एवढ्याचकरितां.

अनवस्थेच्या एका काळीं, **भृगूंनीं** पूर्वीच्या कोणत्यातरी मनुप्रोक्त शास्त्राच्या आधारानें गलबललेल्या आचारधर्मास पुन्हां पूर्वीच्या मार्गावर आणण्याचा हा प्रयत्न होता, हें उघड दिसून येतें. आणि विशेषतः वर्णसंकराच्या दृष्टीनेंच त्याकाळींही आपत्ति उत्पन्न झाली असावी, असें वाटतें.

**तपोबीजप्रभावैस्तु ते गच्छंति युगे युगे ।**
**उत्कर्षंचापकर्षंच मनुष्येष्विह जन्मतः ॥**

त्याचप्रमाणें— **बीजमेके प्रशंसंति क्षेत्रमन्ये मनीषिणः ।**
**बीजक्षेत्रे तथैवान्ये तत्रेऽयं तु व्यवस्थितिः ॥**

इत्यादि श्लोकांत **भृगूनें** आपलें कार्य स्पष्टच सांगितलें आहे. त्या वेळेचा समग्र इतिहास उपलब्ध नसल्यामुळें खरोखर अडचणी कोठें होत्या, त्या विषयीं मतमतांचा गलबला असण्याचें कारण काय होतें, वगैरेंचा खरा बोध आपणांस होत नाहीं. तरीपण ज्या रीतीनें तो घोंटाळा **भृगूनें** मोडला आहे, त्या आपणापुढेंच आहेत, त्यांचा जशाचा तसा उपयोग तर आपणांस अर्थातच होणार नाहीं, परंतु तसें करतांना **भृगूनें मनूच्या** पूर्वपरंपरेस अनुसरून जें कांहीं मुख्य धोरण ठेवलें असेल, त्याचा मात्र आपणांस उपयोग होईल. एकंदर हल्लींच्या **मनुस्मृतीचा** विचार केला, तर असें दिसून येतें कीं, वंशशुद्धि, आणि व्यक्तींचें आत्मबल, या दोन मुख्य गोष्टी साधून, आचाराची घडी बसविण्याचा प्रयत्न केलेला आहे. तशाच प्रकारची परिस्थिति आजही असल्यामुळें तींच धोरणें पुढें ठेवून मार्ग काढला पाहिजे, तरच तो धर्माच्या मूळ स्वरूपास धरून येईल. परंतु त्यांतल्या त्यांतही सामाजिक दृष्ट्या, इतकेंच तर काय, पण मनुष्यप्राणी या दृष्टीनेंही अतिशय ऱ्हास झाला असल्याकारणानें, व्यक्तीचें आत्मबल कमी होणार नाहीं, हीच गोष्ट सध्या मुख्यतः ध्यानांत ठेवली पाहिजे. वैद्यशास्त्रांत कित्येक रोगांत चिकित्सेचें मुख्य धोरण असें असतें कीं जेणेंकरून रोग्याचा शक्तीपात होणार नाहीं, अशा रीतीनें उपचार करावयाचा; मग रोग नाहिंसा होण्यास थोडा वेळ लागला तरी हरकत नाहीं. आधीं रोग्याची शक्ति वाढवावयाची, व मग काम पडल्यास तीव्र उपायानेंही रोग काढून टाकावयाचा, असें मुख्य धोरण असतें. शक्ति वाढवावयाची, अथवा कायम ठेवावयाची ह्मणजे अर्थातच, घटक परमाणू जेणेंकरून क्षीण होणार नाहीं, व बलवान् होईल, तें प्रथमतः करावयाचें, व त्यानें जर काम नच होईल तर पुढें, एकादी मात्रा देऊन ताप काढून टाकावयाचा. सामाजिक रोगावर हल्लीं जे उपाय सुचविण्यांत येतात, त्यांत हें धोरण सांभाळलें जात नाहीं, असें

आमचें मत आहे; ह्मणून त्या पद्धतीस आह्मी दोष लावतों. आमचें एवढेंच म्हणणें आहे कीं, सुचविल्या जाणाऱ्या उपायांच्या कडक मात्रांनीं कदाचित् रोग गेला असें जरी दिसलें, तरी त्यानें दुसरीकडून शक्तीपात झाल्यामुळें समाज जगणार नाहीं, म्हणजे अर्थातच वैदिकसमाज या अर्थानें त्याचें जें जीवन तें राहणार नाहीं. एरवीं लोकसमुदायाचें जगणें आणि मरणें हें लाक्षणिक अर्थानेंच घ्यावयाचें असतें. तेव्हां कांहीं काळ रोग जरी राहिला, अनवस्था जरी मोडली नाहीं, तरी समाजाचा घटक-परमाणू जी व्यक्ति ती जेणेंकरून ठसठशीत राहील, तिचा जोम कमी न होतां उलट वृद्धिंगत होईल, असाच मार्ग प्रत्येक अडचणींत सूचविला पाहिजे. रूढीला, धर्माला, जगताच्या कृत्रिमतेला, शिव्या देत देत स्वतःच्या उदात्तपणाची ऐट मिरविणाऱ्या **जयंताच्या** * पोटांत केवळ सामान्य व्यभिचारी माणसाप्रमाणेंच **लीलेच्या** शरीरासंबंधीं विषयसुखाचाच अभिलाष कसा होता, आणि त्यामुळेंच त्याचें अंतःकरण दुर्बल आणि पामर कसें बनलें होतें, हें पाहिलें ह्मणजे आमचें ह्मणणें लक्षांत येईल. असो. अशा प्रकारें व्यक्तीचा मगदूर राखणें ह्मणजे काय, याचा सविस्तर विचार पुढें स्वतंत्रपणें करावयाचा असल्यामुळें एवढ्या दिग्दर्शनावरच हा विषय

---

* तो ' क्रुर कृत्रिम जगतां ! अशी किती हृदयं तुझ्या बोजड नियमाखालीं पार चुरडून गेली असतील ' ! अशा शिव्या देत देतच ' आजपर्यंत लोक लज्जेमुळें, पापाच्या ऐहिक कल्पनेमुळें, या सुखाचा कधींच अनुभव घेतां आला नाहीं ' असें पोटांतलें गुपित बाहेर काढतो. एकूण खरी तडफड कसली तर अंगालाआंग भिडण्याची ! मग रूढी घालणाऱ्यांस कल्पना नसलेलें तें प्रेमाचें 'दिव्यत्व' ' उदात्तपण ' ' अपार्थिवत्व ' ' नुसत्या विषयीं प्रेमाहून न्यारेपण ' तें ' बंधनापलीकडे ' राहूं ह्मणून चार ग्राम्य लोकांप्रमाणेंच विवाहबंधनांत पडणाऱ्या प्रभाकरास हवे असलेलें ' आत्मा ' ' हृदय ' आहे तरी कशांत ? जगांतल्या अगदी अडाणी आषक माशुकांनाही तेंच पाहिजे असतें. कदाचित प्रत्येक मिठीच्या आगेमागे कांहीं तरी नाटकी शद्बांचे पल्लव लावण्यांत तें असेल ? सुप्रसिद्ध गुर्जर लेखक गोवर्धनराम त्रिपाठी यांच्या विद्वान व रसिक ' सरस्वती चंद्राला ' ही हाच प्रश्न पडला होता. तो ह्मणतो ' प्रेम ह्मणजे जर मानसिक जीवनाचा संयोग वर्ड्स्वर्थसारख्या बड्याबड्यांनाही लग्नाची कां आवश्यकता वाटावी ? जयंताला तरी लीलेवर प्रेम करावयास, तिच्या कल्याणाकरितां व सुखाकरितां झटण्यांस, तिच्या सुखानें सुखी होण्यास कोणाची होती हरकत ? पण त्याला खरोखर पाहिजे होतें वेगळेंच ।

सोडून मूळ प्रश्नाकडे वळूं.

आगंतुक जातींसंबंधानें अशा प्रकारची उपेक्षा करून व व्यभिचारोत्पन्न जातीसंबंधानें अनुलोम आणि प्रतिलोम यांच्या चढत्या उतरत्या पायऱ्यांचे जिने तयार करून पूर्वीच्या लोकांनीं हा प्रश्न सोडविला होता, असें दिसतें. परंतु एकंदरींत खाणेंपिणें व धंदा या गोष्टी पूर्वी खासगी समजल्या जात असल्यामुळें, आणि त्यांवर माणसाची योग्यता अवलंबून नसल्यामुळें या प्रश्नास पूर्वी आजच्यासारखें महत्व नव्हतें. आणि ह्मणून त्याचे उलगडेही आजच्या लोकांस पटण्याइतके स्पष्ट व समाधानकारक नाहींत. तरी देखील **वैदिक धर्माच्या** मूळ स्वरूपास अनुसरून हा प्रश्न कशा रीतीनें सोडविला पाहिजे, याचें धोरण त्यावरून दिसून येईल. आह्मी मागें ह्मटलेंच आहे कीं, समाजशास्त्रांप्रमाणें पाहिलें तर झाडाप्रमाणें समाजासही निरनिराळ्या जातीचें खत मिळाल्याखेरीज तो फोंफावत राहत नाहीं. याचा अर्थ असा कीं, बेटी व्यवहारानें समाजास जखडून टाकलें असतां, कालांतरानें त्याची पिछेहाट होऊन, तो सर्व प्रकारानें क्षीण व दुर्बळ बनतो. ह्मणून बेटीव्यवहाराचा कडकपणा कमी करून निरनिराळ्या रक्तांच्या मिश्रणानें जोमदार वंश वाढण्याची व्यवस्था ठेवली पाहिजे. अर्थातच परधर्मातील मनुष्य स्वधर्मांत घेतल्यानेंच ही गोष्ट शक्य आहे. त्या खेरीज क्वचित् कोठें भिन्न धर्मीयांचे विवाह होत असले, तरी तो अपवादच होय म्हणजे या प्रश्नाच्या पोटांत जातीजातींत मिश्रविवाह कां नसावे, व इतर धर्मांप्रमाणे वैदिक धर्मांतही दुसऱ्या धर्माचा मनुष्य कां घेतां येऊं नयें, असे दोन प्रश्न आहेत. पैकीं पहिल्यासंबंधानें आपण मागें पाहिलेंच आहे कीं हा प्रश्न फक्त ब्राम्हण व ब्राम्हणेतर या दोघांच्याच संबंधानेंच खरोखर उद्भवतो. कारण वैदिक परंपरेप्रमाणें चार वर्णांनाच खरें महत्व. व त्यांची व्यवस्था राखण्याकरितां अवश्य होईल तेवढाच कडकपणा अवश्य. पोटजातींचा हिशेबच नसल्यामुळें त्यांच्या विवाहांत कडकपणा असण्याचें कारणच नाहीं. आजच्या स्थितींत चार वर्णच नसल्यामुळें, आणि ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर हे दोनच काय ते वर्ण असल्यामुळें, यांच्यांत मिश्र विवाह कां नसावा, असाच या प्रश्नाचा खरा अर्थ आहे. **चातुर्वर्ण्याची** उत्पत्ति ज्या शास्त्रास धरून झाली, त्याचीं मूलतत्वें सांभाळून माणसाचें आत्मतेज कमी होणार नाहीं, अशा रीतीनें हा प्रश्न अनुलोम प्रतिलोम विवाहाच्या विशेष पद्धतींनीं सोडविण्याचा प्रयत्न पूर्वी झाला, हें आपण पाहिलेंच. आजही हा प्रश्न त्याच धोरणानें सध्याच्या कालास अनुरूप असा सोडविल्यास

हरकत नाहीं. मूळच्या अत्युच्च ध्येयाला अढळ ठेवण्याकरितां उच्च नीचतेच्या कांहीं पायऱ्या ठेवून तो सोडवितां येईल. असें करतांना अर्थातच कित्येक वेळां त्यांचें अवलंबन करणारांना गौणत्व स्वीकारावें लागेल. परंतु तें गौणत्व केवळ ध्येयाचा ध्रुव नजरेखालीं जाऊं नये, एवढ्याचपुरतें असावें, व तसें तें स्वीकारल्यामुळें मनाचा जो किंचित् विरस होतो, अथवा त्यास थोडासा खेद होतो, त्यापलीकडे त्याच्यामुळें आयुष्य सुखमय होण्यास कांहीं अडचण पडूं नये, अशी योजना असावी, ह्मणजे त्याचें फारसें जड न वाटतां सारा प्रश्न मुकाट्यानें सुटेल. आजही खालच्या वर्गांतील स्त्रियांत मंगल कार्य व असेच कांहीं दुसरे व्यवहाराचे प्रसंग यांच्यावेळीं प्रथम सुवासिनी व गंधर्वाच्या बायका यांच्यांत मानपानासंबंधीं असा भेद राखला जातो. व त्याच्यामुळें स्वैरप्रवृत्तीला पुष्कळसें बंधन राहून गंधर्वाचा मार्गही मोकळा राहतो. व त्याचा अवलंबही तें गौणत्व पत्करून पुष्कळ स्त्रिया करतात. याचें कारण अशा प्रकारचे सर्व विवाह बहुतेक दोन कारणांनीं होत असतात. एक तर, खरोखरच प्रेमसंबंध होऊन; व दुसरें **बायरन्** या सुप्रसिद्ध कवीनें ह्मटल्याप्रमाणें व्यवहारिक अथवा वैषयिक कारणानें उत्पन्न झालेली लग्न करण्याची गरज. ( The strong necessity of making love! ) अशा दोन्हीही प्रसंगीं केवळ ती गोष्ट गौण आहे ह्मणून आपली मान ताठ राखण्याकरितां तिचा स्वीकार न करण्याइतकी तेजस्वी माणसें फारच थोडीं असतात. बाकी बहुतेक सर्व, तें गौणत्व स्वीकारूनही त्याचा अंगिकार करणारेच असतात. मिश्र विवाहाचा प्रश्न वरील उदाहरणापेक्षां अधिक महत्वाचा व भानगडीचा असल्यामुळें केवळ गौणत्वापलीकडे आचारधर्माची व व्यवहाराचीही त्याकरतां कांहीं विशेष व्यवस्था करावी लागेल. ती कशी केली पाहिजे, हें सांगणें या ग्रंथाच्या मर्यादेबाहेर आहे. व तसें निश्चयात्मक सांगण्याचा आमचा अधिकारही नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें असल्या सर्व प्रश्नांसंबंधीं कांहीं विशेष धोरणानें दिग्दर्शन करणें, एवढाच आमचा हेतु आहे.

पूर्वी उपस्थित केलेला दुसरा प्रश्न जो इतर धर्मांतील मनुष्यास वैदिक धर्मांत घेऊन त्याची संख्या व जोम वाढता ठेवणें, याविषयीं वरील शास्त्राप्रमाणें काय धोरण होतें तें पाहूं. अशा प्रकारें परकी लोकांचे समाजचे समाज **वैदिकधर्मांत** समाविष्ट झाले आहेत, अशी आधुनिक सर्व विद्वानांची जवळजवळ पूर्ण खात्रीच आहे. **स्वामी विवेकानंदा**सारख्या कित्येकांना त्याचा अतिशय अभि-

मानही वाटतो. ते स्वतः आपला जबडा मंगोल्यिन वळणावर आहे, असें मोठ्या अभिमानानें सांगत असत. ( ' Was proud of his mongolian jaw. ' **Nivedita** ) आणि हजारों वर्षें उत्कर्षानें टिकलेला एवढा समाज अशा रीतीनें वाढल्याखेरीज राहिला नसेल हेंही संभवनीय दिसतें. पुराणांतील कित्येक कथांचा भावार्थही असाच असावासें वाटतें. **विश्वामित्राचें** ब्राह्मण होणें, **याज्ञवल्क्यानें** स्वतः वेद शिकविण्यांकरितां नवीन ब्राह्मण करून घेणें—इत्यादि कथांचा हाच मथितार्थ दिसतो. ह्मणजे, वेदबाह्य लोकांना वेदमार्गांत येण्याचा कांहींतरी मार्ग असावा हें खास. मात्र एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं आजकालच्या इतर धर्मांप्रमाणें वाटेल त्यानें उठावें, व स्वतःच्या इच्छेनुरूप आपण **वैदिकधर्मी** असें ह्मणून व्यक्तिशः **चातुर्वर्ण्यांत** स्थान मिळवावें, ही गोष्ट मात्र वैदिकधर्मास पसंत नसावी. कारण, असें केल्यानें धर्मांत येणारी व्यक्ति सर्व तऱ्हेनें योग्य असल्यामुळें जरी धर्माचें कांहीं नुकसान झालेलें दिसलें नाहीं, तरी एकंदरींत, अशी प्रत्येक व्यक्ति त्याच किंमतीची नसल्यामुळें, धर्माचें नुकसानच होतें. इतर धर्मांचें असें नुकसान झालेलें दिसत नाहीं, याचें कारण आह्मीं मागें दिलेल्या परीट घडीच्या दृष्टांतावरून लक्षांत येईल. इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन केल्यास, वाटेल तसे लोक भराभर आपल्यांत समाविष्ट करून घेतल्यानें बौद्ध, ख्रिस्ती, मुसलमान, वगैरे धर्म विसविशीत होऊन त्यांचीं मूळ स्वरूपें विकृत झालीं व त्यांचा ऱ्हास कसा झाला हें समजून येईल. मात्र एवढेंच कीं त्या धर्मसंघांचें उद्दिष्ट प्राप्तीचे मार्ग हे सर्वच **वैदिक धर्मा**प्रमाणें अत्युग्र शास्त्रास धरून नसल्यामुळें त्यानें त्यांचें फारसें बिघडलें नाहीं. कारण, शरीराची विशेष तयारी, हा त्यांच्यापुढें प्रश्नच नव्हता. तशी गोष्ट **वैदिकधर्माची** नसल्यामुळें, अल्पस्वल्प व्यक्तींना वाटेल त्या हेतूनें **वैदिक धर्मांत** सामील होऊं देऊन त्याची घडी बिघडविण्यापेक्षां, त्यांनीं हा प्रश्न आपल्या सर्व विचार परंपरांप्रमाणें व्यक्तीकडे दुर्लक्ष करून सामुदायिक रीतीनेंच सोडविला. जर एकाद्या व्यक्तीला त्या धर्माच्या उच्चत्वाची आणि श्रेयस्करतेची खात्रीच पटली असली, आणि केवळ आत्मकल्याणाच्या शुद्ध दृष्टीनेंच तो **वैदिक धर्माचा** होऊं इच्छित असला, तर त्याच्याकरितां योग उपासना वगैरे दुसरे मार्ग मोकळे असल्यानें तो स्वतः ' मला वैदिक कां ह्मणत नाहीं, ' एवढ्याच गोष्टीवर कधींच अडून बसणें शक्य नाहीं. हिंदुस्तानांतून योगमार्ग आणि ' अनल् हक् '—' अहं ब्रह्मास्मि ' हें महावाक्य बाहेरदेशीं नेणारा **अल्मन्सूर**, अथवा संतचूडामणि **कबीर** हे कधीं असला वाद घालीत बसल्याचें

कोणाच्या ऐक्यांत नाहीं. बरें, इतकी शुद्धवासना ज्यांची नाहीं, ते तात्पुरते कितीही तयार असले तरी, त्यांस आपल्यांत सामील करून घेणें धोक्याचेंच असतें. म्हणून, व्यक्तिला प्रत्यक्ष **वैदिक धर्माचा** दरवाजा बंद ठेवावयाचा, परंतु अशा प्रकारचीं कुटुंबेंच्या कुटुंबें आणि समाज यांना तो मोकळा ठेवून आचारविचारादिकांनीं पिढ्यान-पिढ्या त्यांची शुद्धता झाली म्हणजे मुकाट्यानें सहजच त्यांनीं **वैदिक धर्मात** मिसळून जावें, अशी त्यांची व्यवस्था होती. **वैदिकधर्माच्या** सहवासांत राहून पिढ्यानूपिढ्या स्वतःची शुद्धि करून घेतलेलीं केक मानवकुटुंबें **वैदिक धर्मात** सामील झालीं आहेत, यांत शंका नाहीं. सांख्यांच्या पायावर उभारलेल्या योगाचें असें एक तत्व आहे कीं, अनेक प्रकारच्या प्रयत्नांनीं शुद्धि करतां करतां प्रकृतीची अशी एक अवस्था येते कीं, त्या ठिकाणीं ही प्रकृति आणि हा पुरुष असें वेगळे-पणानें ओळखण्याचें साधन न राहिल्यामुळें दोन्हीही एकवटून जातात. यालाच त्यानीं 'केवल्य' म्हटलें आहे. * असेंच धोरण या बाबतींत **वैदिक धर्माचें** होतें. म्हणजे कोणाचाही द्वेष न करतां आपल्या सहवासाचा शक्य तितका फायदा वाटेल त्यास द्यावयाचा, आणि तो घेऊन जर त्यानें आपली उन्नति करून घेतली, व ती पिढ्यानूपिढ्या टिकण्याइतकी जिवंत व खरी असली, तर शुद्धिसाम्य झालेल्या त्या सबंध मानवसमुहासच **चातुर्वर्ण्यां**त कोठेंतरी स्थान द्यावयाचें. एवढ्याकरितां, आणि अशा प्रकारच्या शुद्धिसाम्यास मदत व्हावी म्हणून वेदांस धरूनच, परंतु वेगळ्या तत्वावर उभारलेला असा **तंत्रमार्ग** सर्वांस मोकळा ठेवला होता. या तत्वाप्रमाणें पाहिलें असतां आजही कित्येक असे समाज आहेत कीं त्यांना ब्राह्मण्यापर्यंत सर्व अधिकार देतां येतील. **आर्थरअव्हेलॉनच्या महानिर्वाणतंत्राचें** परीक्षण कर-तांना **प्रबुद्धभारतानें** या दिशेनें थोडासा विचार केलेला आहे.

( Italics are our own. )

The greatest problem of the Pre-Buddhistic ages was the Aryanization of the New India, that rose and searched furiously from every side against the fast dwindling centres of the old Vaidic Orthodoxy, struggling hard, but in vain, by social enactments to guard its perilous insulation. But for those religious movements, such as those of the Bhagwats,

---

* सत्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यम् ।

Shaktas, Souras, Shaivas, Ganapatyas and Jains--that tackled this problem of Aryanization most successfully, all that the Vedic orthodoxy stood for, in the real sense would have gradually perished without trace. These movements, specially the five cults of Vedic Worship, took up many of the Non-Aryan races, and *cast their life in the mould of the Vedic spiritual ideal, minimizing in this way, the gulf that existed between them and the Vedic orthodoxy, and thereby rendering possible, their gradual amalgamation.* ( Principles of Tantras Part II Preface xx—xxi. )

भावार्थः–

बुद्धपूर्व कालांत सर्वांत महत्वाचा प्रश्न ह्मटला ह्मणजे, नवभारतांत आर्यसंस्कृतीचा प्रसार करणें हा होता. प्राचीन वैदिक धर्माच्या केंद्रांविरुद्ध जोराची चळवळ चाललेली होती, व असल्या भयंकर एकट्या स्थितीमध्यें आपलें अस्तित्व कायम ठेवण्याची सामाजिक बंधनांच्याद्वारें, त्या प्राचीन वैदिक धर्मानें धडपड चालविली होती, व भागवत शाक्त सौर, शैव, गाणपत्य, जैन इत्यादींच्या धार्मिक चळवळींनीं जर हीं केंद्रें यशस्वितेनें ठाम धरून ठेविली नसतीं तर या वैदिक धर्मांत जें काय महत्वाचें ह्मणून होतें, त्या सर्वांचा हळूहळू नाश होऊन मागमूसही राहिला नसता. या चळवळीमुळें विशेषतः पंचायतन-पूजा-सांप्रदायामुळें, वैदिक धर्माच्या कक्षेत अनेक अनार्य जातींना आणतां येऊन त्यांचा जीवन-क्रम वैदिक परमार्थिक ध्येयाच्या साच्यांत बसवितां आला, व अशा रीतीनें त्यांच्यामध्यें व वैदिकधर्मामध्यें जें महदंतर होतें, तें कमी होऊन अखेरीस वैदिकधर्माला त्या जाती आत्मसात् करितां आल्या.

या उताऱ्यांत दर्शविल्याप्रमाणें लेखकाचे सारेच विचार निर्विवाद ह्मणतां येणार नाहींत, परंतु या प्रश्नांतील खरा मुद्दा त्याच्या लक्षांत आला होता, एवढें मात्र त्यावरून दिसून येतें.

वरील सर्व त्रोटक विवेचनावरून एवढी गोष्ट लक्षांत येईल कीं, **चातुर्वर्ण्य** हें एक **वैदिक धर्माचें** अंग आहे, आजकालचे पंडित समजतात त्याप्रमाणें धर्मनिरपेक्ष अशी तो केवळ सामाजिक बाब नाहीं, आणि ह्मणून, **कर्मतत्व**, **विराट्संस्था** ( Cosmogony ) **जीवब्रह्मैक्य, अध्यात्मिक व आधिदैविक सामर्थ्यें, योग, पुनर्जन्म,** मनुष्याचें विश्वाशीं असलेलें, पण त्याला कळत नसलेलें

अभिन्न ऐक्य, आणि मंत्र–शास्त्र इ० धर्मास अंगभूत असलेल्या मूलतत्वांतूनच त्याची रचना झाली आहे. ज्या कोणाला त्याविषयीं बोलावयाचें असेल त्याला या मूलतत्वांना धरूनच तसें केलें पाहिजे. पूर्वीच्या काळीं जेव्हां जेव्हां असा प्रश्न उत्पन्न झाला, तेव्हां तेव्हां या गोष्टी लक्षांत घेऊनच त्याचा उलगडा करण्यांत आला, हें आपण त्याविषयीं २१४ ठळक शंका विचारांत घेऊन थोडक्यांत पाहिलेंच आहे. आजकालच्या आर्थिक झगड्यांतून निघालेल्या पुनर्घटनेच्या प्रश्नांत मुख्यतः नडणारे जे पांच प्रश्न आपण प्रारंभीं पाहिले, ते सर्वही–म्हणजे जातिसंस्था, स्त्रियांचा प्रश्न, विवाहसंस्था, भक्ष्याभक्ष्यविचार, आणि स्पृश्यास्पृश्यता–हे व यांच्या अनुषंगान उत्पन्न होणारे आणखी कैक प्रश्न जरी दिसावयास भिन्नभिन्न दिसले, तरी वस्तुतः त्या सर्वांचा उगम वर सांगितलेल्या **चातुर्वर्ण्याच्या** उगमांतच असल्यामुळें ते सर्वही एकस्वरूपाचेच आहेत. आणि त्या केवळ सोईकरितां आलेल्या सामाजिक प्रथा नसल्यामुळें त्या सर्वांचाच विचार वरील मूलतत्वास धरून केला पाहिजे. ज्यांना हीं मूलतत्वें मान्य नसतील त्यांनीं या सर्व प्रश्नास अजीबाद उडवून देणेंच खरोखर रास्त आहे.

अशा रीतीनें **चातुर्वर्ण्य** व त्या संबंधींचे इतर प्रश्न जरी विशेष रीतीनें शास्त्रीय ठरले, व एका काळीं त्या संस्थेनें फार फायदा केला, इतकेंच तर काय, पण हिंदुस्थानच्या अधःपाताचें खापर जें **चातुर्वर्ण्याच्या** माथीं फोडण्यांत येतें, तें खोटें आहे असेंही धरून चाललें, तरी देखील, आपण मागें पाहिल्याप्रमाणें, त्याविषयीं दोन मोठ्या शंका उरतातच. जगाच्या हल्लींच्या परिस्थितींत, ज्या शास्त्राच्या पायावर **चातुर्वर्ण्याची** इमारत उभारली आहे, त्या शास्त्राची व त्याच्यावरील इमारतीची या विसाव्या शतकांतील परिस्थितींत काय किंमत आहे? अतिशय पूर्णत्वाला पोहोंचलेल्या हल्लींच्या आधिभौतिक विज्ञानाच्या काळीं त्याची कांहीं उपयुक्तता आहे काय? व किती असूं शकेल? अर्वाचीन दृष्टीनें त्याचा कांहीं उपयोग नसून उलट तें राष्ट्राच्या प्रगतीस अडथळा करतें कीं काय? व जरी कांहीं नवीन योजनेंत तें बसविल्यास त्यानें अडथळा केला नाहीं, तरी त्याचा उपयोगही कांहीं नसल्यास 'असून अडचण आणि नसून खोळंबा' असलें हें मढें पूर्वी केवढ्याही मोलाचें असलें तरी तें केवळ जुनें म्हणूनच एवढें जपून ठेवलें पाहिजे कां? असल्या तऱ्हेची एक मोठी शंका आहे. आणि ती खरोखर बरोबरही आहे. एक ऐतिहासिक वस्तु म्हणूनच जर त्याला किंमत असली, तर तें इतिहासाच्या कपाटां-

त्त्व राहण्यास योग्य आहे. हल्लींच्या या ( Survival of the fittest च्या ) काळीं ही अडगळ घरांत बाळगणें राष्ट्रास केव्हांही परवडणार नाहीं. तेव्हां या शंकेचाही थोडा विचार करणें जरूर आहे. आणि चातुर्वर्ण्याचा या दृष्टीनें विचार करावयाचा, ह्मणजे मंत्रशास्त्राचाच या दृष्टीनें विचार करावयाचा, हें उघड आहे.

सुमारें पंचवीस तीस वर्षांपूर्वीपर्यंत अशी स्थिति होती कीं मंत्रशास्त्र, योग आणि त्यास धरून असलेलीं पुराणांतलीं अभिचार, अस्त्रविद्या वगैरेंचीं वर्णनें निघालीं असतां शहाण्या म्हणविणाऱ्या माणसास कदाचित् त्यांत कांहीं तत्थ्य असेल अशी नुसती शंकाही शिवत नसे. अरबी भाषेंतील सुरस गोष्टींप्रमाणें त्या केवळ कल्पितकथा होत, अशी जवळजवळ पक्की खात्री होती. परंतु, वसंतागमाबरोबर आंब्यास जसा भरगच्च मोहोर फुलावा, त्याप्रमाणें शेंकडों वर्षांच्या पाश्चात्य पंडिताच्या तपश्चर्येचें फळ गेल्या पांचपंचवीस वर्षांत सर्व बाजूंनीं एकदम प्रकट झालें. एकादें मिश्रण एकदम फसफसून यावें त्याप्रमाणें, जडसृष्टीच्या अंतरंगांतील सारीं रहस्यें जणुं कांहीं एकदम फसफसून आल्यासारखीं झाली. त्यामुळें इंद्रजालाच्या प्रयोगानें गुंग झाल्याप्रमाणें मोठमोठ्या बुद्धिवानाचीही अक्कल स्तंभित झाली आणि मनुष्याची विचारसरणी न कळतां अतिशय विस्तृत झाली. आकाशांत विमानें वर उडूं लागलीं, जलस्तंभ करून डोहांत बसणाऱ्या एका दुर्योधनाऐवजीं शेंकडों सबमरीन्स पाण्यांत अखंड बुडून राहूं लागल्या, हजारों मैल अंतरावरून माणसाशीं बोलतां येऊं लागलें, नाना तऱ्हेचीं संहारक अस्त्रें प्रगट झालीं, व आतां प्रत्यक्ष मनुष्यजीवच कृतीनें निर्माण करतां येईल, कांहीं थोड्या कालाचाच अवधि, ह्मणजे मनुष्यापासून सृष्टीचें कोणतेंही रहस्य लपून राहणें शक्य नाहीं, असें मानण्यापर्यंत मानवी बुद्धीचा दर्प वाढला. त्याबरोबरच इतिहासपुराणांतील वरील तऱ्हेच्या वर्णनाकडे केवळ तुच्छतेनें पाहणाऱ्या विद्वानाच्या बुद्धीही शंकित झाल्या. न जाणो, अगदीं शब्दशः जरी नासल्या, तरी कांहीं विशेष अर्थांनीं या गोष्टी खऱ्या तर नसतील ? अशी शंका अडाण्यापेक्षां विद्वानासच जास्त यथार्थतेनें येऊं लागली. षट्चक्रांचीं आणि योगाचीं वर्णनें खरीं असावींत, असें जर्मन पंडित बोलूं लागले. त्याबरोबरच आकाश तत्वमय जो शब्द त्याचें उत्पादनसामर्थ्य व त्यास धरून असलेलें मंत्रशास्त्र यांतही कांहीं तत्थ्य असावें, असें वाटूं लागलें. परंतु त्याबरोबरच हेंही दिसूं लागलें कीं शास्त्राच्या जोरावर पंचभूतांवर जर मनुष्य ताबा चालवूं लागला, व त्याचा उपयोग सर्व समाजास सारखा करून घेतां येऊं लागला, तर त्याची योग्यता अधिक

किंवा अतिपरिश्रमानें वाढविलेल्या झाडाप्रमाणें, अनेक अडचणी सोसून क्वचित कोठें एखाद्या व्यक्तींत परिणत होतांना दिसलेल्या मंत्रशास्त्राची योग्यता अधिक? मंत्रशास्त्राची एवढी खटपट करून कांहीं काळ माणसांना विस्तवावरून चालविण्याचा तमाशा जरी समजा खरोखर करतां येत असला तरी तो महाग पडत नाहीं कां? पांच दहा रुपये खर्चून अग्निप्रतिबंधक पोशाख घातलेला वाटेल तसा मनुष्य खुशाल अग्निज्वाळांतून वावरूं शकतो, तेव्हां आजकालच्या आर्थिक युगाच्या मानानें हें शास्त्र खरें मानलें तरी महाग पडत नाहीं काय? चाळीस वर्षें हाडांचीं काडें करून पाण्यावरून चालण्याची सिद्धि मिळविणाऱ्या माणसास 'इतकें करून तूं काय संपादलेंस! फक्त दोन पैसे वाचविलेस.' असें ज्याप्रमाणें **भगवान् श्रीरामकृष्णांनीं** सांगितलें, त्याचप्रमाणें अर्वाचीन पंडित वरील शास्त्रज्ञास बेधडकपणानें ह्मणतो. याच्याही पलीकडे जाऊन असें ह्मणतां येईल कीं आतांची एक गोष्ट राहो, पण पूर्वीं जेव्हां वैदिक संस्कृति ही आर्यावर्तांत एकमेवाद्वितीय होती, व तुमच्या ह्मणण्याप्रमाणें मंत्रशास्त्र, योग, वगैरे शास्त्रें पूर्ण परिणत झालीं होतीं, त्यावेळेस तरी त्यांनीं काय फायदा करून दिला? अस्त्रविद्येच्या किंवा जारण मारणाच्या कांहीं कल्पना टाकल्या तर समाजास प्रत्यक्ष उपयोगी पडतील, जेणेंकरून समाजाच्या सुखसोयींची समृद्धि होईल, व आज ज्याप्रमाणें पाश्चात्य जगतानें मनुष्याला जवळजवळ देव बनवीत आणण्याचा घाट घालीत आणला आहे, तशा प्रकारें समाजाची उन्नति होईल असे शोध कां लागले नाहींत? त्यानंतरच्याही काळांत **शंकराचार्य, ज्ञानेश्वर, रामदास,** इत्यादि योग सामर्थ्यानें युक्त असलेल्या पुरुषांनीं असें ज्ञान समाजांत कां आणलें नाहीं? असल्या सिद्ध पुरुषांचे चमत्कार पाहिले तर त्यांची सरसहा एक तऱ्हा दिसून येते. मनांतली गोष्ट ओळखणें, दूरची क्रिया जाणणें, रोग बरा करणें, थोडें अन्न पुष्कळांस खाऊं घालणें किंवा कांहीं लोकांस असंभाव्य रीतीनें दर्शन देणें इ. इ. बरें यांस स्वतःस सर्वज्ञता होती ह्मणावें तर यांच्या ग्रंथांतील भुवनसंस्थेचीं वर्णनें व अशाच कित्येक इतर गोष्टी यांची सांगड बसत नाहीं. वैद्यकासारख्या प्रत्यक्ष शास्त्रांतही अत्यंत उपयुक्तता असूनही त्यांनीं शोध कां लावले नाहींत? दिव्यज्ञानानें लिहिलेल्या **सुश्रुत** संहितेपेक्षां आजचें मायक्रॉस्कोपचें प्रत्यक्ष शारीर कितीतरी पटीनें परिणत आहे, ही शंका अर्थातच योग्य आहे. योग आणि मंत्र यांच्यासारखीं शास्त्रें हातांत असूनही, सर्व तऱ्हेनें अशी खुरटल्यासारखी स्थिति झाली हें खरें; पण याचा दोष

त्या शास्त्रांस न देतां, ज्यांच्या हातांत तीं शास्त्र होतीं, त्यांच्या विशिष्ट मनोरचनेस दिला पाहिजे. योग किंवा मंत्रशास्त्र यांनीं मनुष्य परिणत झाला, ह्मणजे त्याला संबंध विश्वांतील प्रत्येक क्रियेचें ज्ञान असलेंच पाहिजे, असें नाहीं. तसें झाल्यास ती गोष्ट उपकारक न होतां त्याला अपकारकच होईल. प्रकृतीशीं संबंध न तोडतां, तिच्या या जगड्व्याळ कारखान्याचे मालक होऊन रहावें, हा जरी सर्व खटाटोपांचा मूळ हेतु असला, तरी त्याबरोबरच हेंही लक्षांत टेवलें पाहिजे कीं, हा सर्व कारखाना ताब्यांत घेऊन स्वतःस ' शांतिं निर्वाणपरमां ' अशा आरामखुर्चीत मालकाप्रमाणें बसावयाचें आहे. कारखाना उभारणाऱ्या कारागीर मालकास ज्या प्रमाणें त्यांतील अगदीं लहानसान गोष्टीपासून तों वरपर्यंत सर्व गोष्टींचें ज्ञान असतें, व काम पडल्यास ती स्वतः तो प्रत्यक्ष करून दाखवितो, ह्मणजे कांहीं त्या सर्व गोष्टी तो प्रत्यक्ष रोज करीत असतो, असें नाहीं. तसें झाल्यास त्याचें हाडही उरणार नाहीं. एकदां कारखाना उभारून दिला, ह्मणजे त्याची नुसती देखरेख व सान्निध्यच पुरें असतें. तेवढ्यापुरता आपला फायदा कारखान्याला देऊन स्वतः विजेच्या पंख्याखालीं आरामखुर्चीत स्वस्थ पडावयाचें, हाच त्याचा हेतु असतो. त्याप्रमाणें अध्यात्मिक उन्नति करून घेऊन स्वःतचें शांति-स्थान अढळ करावयाचें व केवळ निरपेक्षतेनें ती शांति बिघडूं न देतां या विश्वांतील भानगडी करीत रहावयाच्या, अशीही वैदिककल्पनेंप्रमाणें माणसाची उन्नति दुधारी आहे. समाधीपयत अभ्यास पूर्ण करून मनुष्यानें एकदां स्वतःचें पद अविचल करून घेतलें, ह्मणजे त्याच्यापुढें अर्थातच दोन गोष्टी येऊन पडतात. एक तर, स्वतःची आत्मस्थिति दृढ करावयाची. हेंही करावयाचें साधन संयमच आहे. व दुसरी बाहेरच्या विश्वाला आपल्या उन्नतीचा लाभ द्यावयाचा. हा लाभ केवळ मनुष्यप्राण्यासारखें राहून प्राणीमात्राची भगवद्भावानें सेवा करून देतां येईल, अथवा अतींद्रिय सामर्थ्य संपादून त्या रीतीनेंही करतां येईल. असें अतींद्रिय सामर्थ्य प्रगट करावयाचें असलें तरी त्याचेंही साधन संयमच आहे. ह्मणजे प्रकृतीच्या सर्व कुलुपांना लागणारी ' **संयम** ' ही एक अद्भुत किल्ली त्याला प्राप्त होते. परंतु त्याला जर प्रकृतीच्या भांडारांतील एकेक अद्भुत चिजा बाहेर आणावयाच्या असतील, तर त्या कांहीं त्याच्यापुढें हात जोडून त्याच्या हुकुमाची वाट पाहत असतात, असें नाहीं. त्याला जर त्यांची गरज असेल, तर ती किल्ली चालवून त्याला गरजेप्रमाणें निरनिराळीं कपाटें

उघडलीं पाहिजेत. * कल्पतरूच्या खालीं जरी मनुष्य बसला असला, तरी कल्पतरू आपण होऊन त्याच्यापुढें कांहीं ठेवीत नाहीं. त्याला प्रत्यक्ष इच्छा करावी लागते, तेव्हां वस्तु पुढें येऊन पडते. कल्पतरूखालीं बसून एखादा मनुष्य कांहींच न इच्छितां नुसती झोंप घेऊन गेला, अथवा कुबेराच्या भांडारांतही, नुसतें तें पाहूनच एखादा मनुष्य संतुष्टपणें बसूनच राहिला, तर त्यांत कल्पतरूचा काय दोष आहे, व भांडाराचा काय कमीपणा आहे ? दृष्टांत तितका एकजिनसी, हें तर उघडच आहे. पण या दृष्टांतावरून आमचा मुद्दा लक्षांत येईल. **वैदिक संस्कृतीच्या** पूण परिणत काळीं मनुष्यें याच शास्त्राच्या जोरावर आजच्या सर्व गोष्टी, फार झालें तर थोड्या वेगळ्या तऱ्हेनें करीत होते, असें मानण्यास जागा आहे. ते पुष्पक विमानांतून उडत होते, इतकेंच नाहीं तर, विमानाच्या साह्यावाचूनही आकाश-गमन करीत होते. पाण्यांत नुसतें डुंबत नव्हते, तर इच्छेप्रमाणें स्वाधीनतेनें स्वतःचे देह जलतत्त्वांत विरवून अप्सरांचा उपभोग घेत होते. हजारोंवर्षें त्यांना वांचतां येत होतें, व पंचभूतांवर वाटेल तसा ताबा चालवितां येत होता. म्हणूनच त्या गोष्टींचीं वर्णनें अतिशयोक्तीनें व अद्भुतरीतीनें कां होईना, वेदांपासून तों **नरहरी मालूच्या ' नवनाथा '** पर्यंत सर्व ग्रंथांत आढळतात. आजही जर या गोष्टी कमीजास्त प्रमाणानें कां होईना, मानवी शक्तीच्या आटोक्यांत दिसूं लागल्या आहेत, तर पूर्वींच्या अजीबाद खोट्या कां मानाव्या हें समजत नाहीं. सारांश, त्या पूर्ण परिणत स्थितींत या गोष्टींचा उपयोग होत असतां आजच्या प्रमाणेंच त्यांचा सर्व समाजास फायदा मिळेल अशाही व्यवस्था असल्या पाहिजेत. परंतु नैसर्गिक क्रमानेंच असें झालें कीं, निर्वीरमुर्वीतल झालेल्या वैदिक लोकांस, व्यवहाराच्या क्षेत्रांत, जास्त कर्तृत्वाचा कंटाळा येऊन अंतर्मुखता वाढली, आणि व्यवहारांत उदासीनता आल्याबरोबर सुव्यवस्थित आणि घट्टपणानें एकमेकांत दृढ बसविलेलीं यंत्रें शिथिल झालीं, त्यामुळें दोन्ही अंगांवर सारखा जोर द्यावयाचा, हें धोरण नाहिसें झालें. आणि

---

* खुद ब्रह्मदेवानें सृष्टी उत्पन्न केली ती देखील कांहीं स्वतःच्या सुलतानीलहरीप्रमाणें ' प्रकाश होवो म्हटला आणि झाला ' God said let there be light and there was light ) अशी केली असे वैदिकधर्म म्हणत-नाहीं. ' यथापूर्व ' (म्हणजे शास्त्रास अनुसरून) ' ऋतंच सत्यंचाभीद्धात्तपसोऽध्यजायत ' अशी केली.

तेथून जें गाडें घसरणीस लागलें, तें सांभाळतां सांभाळतां जी **वैदिक सर्वज्ञांची** ( Savants ) पुरेवाट झाली, तिचेंच चित्र आपणांस **ब्राह्मणें व** उपनिषदें, **सूत्रें** आणि स्मृति इतिहासपुराणें, आणि योगयाग आणि शेवटीं भक्तिमार्ग आणि **भागवतधर्म** इत्यादि निरनिराळ्या **वैदिक धर्माच्या** संस्कारांत दिसून येतें. त्यांतल्या त्यांत **बुद्ध धर्माच्या** उदयापर्यंत मूळतत्व तरी विशेष सुटलेलें नव्हतें. परंतु **बुद्धानें** जो ' सर्व क्षणिकं सर्व दुःखं ' ' आपुला तूं गळा घेई उगवूनीं ' अशा तऱ्हेचा **वैदिक धर्माच्या** ' एकमेवाद्वितीयं ' या महातत्वाच्या अगदीं उलट व्यक्तिवाद वाढविला, त्यानें तर सर्व **वैदिक** परंपरांची **पानपतच्या पळा**-प्रमाणें स्थिति झाली. अशी स्थिति झाली म्हणून मूळ संस्कृतीलाही दोष देतां येत नाहीं. मोठ्या कोट्याधीशालाही एक दिवस खाडकन् डोळे उघडेपर्यंत आपण दिवाळखोर कसे बनत आहों, तें समजून येत नाहीं. व ज्यावेळेस डोळे उघडतात त्यावेळेला काम आंवाक्याच्या बाहेर गेलेलें असतें. पूर्ण परिणत झाल्यानंतर त्या संघटनेचें पर्यवसान पुन्हां विस्कळीतपणांत होणें, हें सृष्टिक्रमास धरूनच आहे. सर्व प्रकारच्या जोमदार व्यायामांत असलेल्या शरीराचा व्यायाम सुटून त्यास जर एक-दम शांतता मिळाली तर त्याचे स्नायु शिथिल होऊन तें उलट निकस होतें, असा अनुभव आहे. मोठमोठ्या राष्ट्रांच्या इतिहासांतही हीच गोष्ट अनुभवास येते. मराठ्यांच्या ऱ्हासाची व्युत्पत्ति अनेकजण अनेक प्रकारानें जरी लावीत असले, तरी आह्मांस तर ती सृष्टिनियमानें घडणारीच गोष्ट वाटते. दुर्दैवाची गोष्ट एवढीच कीं, ती फार लौकर घडून आली. घटोत्कचानें मरतां मरतां आपल्या शवाच्या भारानें कौरवांच्या अनंत सैन्याचा नाश केला, असें भारतांत वर्णन आहे. तसाच प्रकार येथेंही घडून आला. स्वतःच्याच बोजडपणानें भंग पावून प्राण टाकलेल्या मुसल-मानशाहीनें आपल्या शवानेंच उलट मराठ्यांचा ह्मणजे पर्यायानें हिंदुस्थानचा नाश केला. कारण शंभर वर्षेंपर्यंत श्वास घेण्यास उसंत नाहीं, अशा हातघाईनें सारखी मेहनत केलेल्या महाराष्ट्रास पुढें जी एकदम स्वराज्यामध्यें अतिशय शांतता व परराज्यांत सर्वत्र मऊपणा अशी परिस्थिति प्राप्त झाली, त्याच्याच योगानें मराठा गडी ढिला पडून निकस झाला. **प्रतापराव गुजर** मेला असतां, आपल्याच हिंमतीवर पांच हजार स्वार घेऊन शत्रूला मोडून काढणारे **हंबीरराव, संताजी** वगैरेंचें तडफदार वर्तन आणि **पानिपता** नंतर मराठ्यांचा दिल्लीचा सुभेदार **नारोशंकर** याचें नामर्द वर्तन, यांच्यांतला फरक पाहिला ह्मणजे ही गोष्ट लक्षांत येईल. शरीराप्रमाणें

राष्ट्रही अखंड करारतींत रहावें लागतें. जगांतील इतर राष्ट्रांच्या इतिहासावरूनही असाच सिद्धांत मांडतां येईल. **औरंगजेबाच्या** मृत्यूबरोबर मुसलमानशाहीनें जर अशी एकदम मान टाकून दिली नसती, तर आमच्या समजुतीप्रमाणें मराठी सत्ता जास्त जोमदार झाली असती, राष्ट्रीयदृष्ट्या त्यांचा झाला असा ऱ्हास झाला नसता, व युरोपियन लोकांचे पांढरे पायही येथें वावरूं शकले नसते. असो. इतिहासांतल्या या तत्वाप्रमाणें पाहिलें तर, जगाला दिपवून टाकणाऱ्या प्रस्तुतच्या पाश्चात्य संस्कृतीचीही अशीच चमत्कारिक वाट लागणार आहे, असा तर्क करतां येईल. ढेंकूण ज्याप्रमाणें पी पी रक्त प्याल्यानंतर त्या रक्ताच्या भारानेंच फुटून मरतो, तशीच स्थिति या प्रतिसृष्टि करण्याची धमक बाळगणाऱ्या संस्कृतीची होणार आहे. आकाशांत विमानें उडवलीं, मेलेलीं प्रेतें उठवून दाखविलीं, विश्वामित्राप्रमाणें नवीन जीव उत्पन्न करून दाखविले, किंवा असे अनेक चमत्कार करून माणसाच्या सुखाचीं अपरिमित साधनें उत्पन्न केलीं, तरी अखेरीस काय ? या पंचभौतिक देहाच्या आंत जो कोणी उपभोक्ता राहतो, तो त्या वेळेसही अगदीं **आल्फ्रेड दि ग्रेट**च्या वेळेप्रमाणेंच जशाचा तसाच राहील. आणि सुखाचीं साधनें इतकीं थोडीं कां म्हणून, आज जीव कुरकुरतो, तो त्यावेळेला—कोण ही सुखसाधनांची गर्दी ? आणि काय हें चिरंतन जीवित ? एकाच शरीराला धरून इतकें अखंड रहावयाचें ? पालटवणें असें कांहींच नाहीं, कसलें असलें आयुष्य? —असा कुरकुरेल ! म्हणजे स्वतःचा स्वतःलाच कंटाळा येऊन, ते ती झुगारून देतील, आणि ‘ कोऽहं कस्त्वं कुत आयातः ’ या विचारास लागून क्रमाक्रमानें मंत्रशास्त्र योग वगैरे सर्व प्रणालिका उचलून घेऊन **वैदिकधर्मी** बनतील, असें मानण्यास जागा आहे. एका बाजूनें विज्ञानशास्त्र सारखें उतास येत असतां, दुसऱ्या बाजूनें समाजाच्या अंतरंगांत खळबळत असलेले प्रवाह पाहिले म्हणजे हें स्पष्ट दिसून येईल. **डॉ. पॉल रॉहबॅक** या जर्मन लेखकानें नुकतेंच या विषयीं अशाच प्रकारानें लिहिलें आहे. चालू सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या **मॉडर्न रिव्ह्यूच्या** अंकांत त्याचा उतारा दिला आहे, तो वाचण्याजोगता आहे.

Here we come back, to the problem of the difference between culture and civilization.... But machine is not culture; it is at best, civilization. A man may possess the highest thing, the machine can procure, he may fly in the

air and freely move under the surface of the ocean, he may telephone and telegraph, from his office room, in Cologne or Berlin, Newyork, or Chicago, he may hear the music, in reception of the Zeppelin, in Los Angeles, the New year's bells, of St. Pau'ls in London, and opening speeches in the Australian Parliament. But for this flaunting splendour, he stands yet far from being a man of culture. He enjoins all the amenities of civilization at the most.... Culture is an attribute of the soul. If a man or a people is unable to plunge into its own self, and even for a time forget the outer mechanism of life in order to turn to its inner depths: to the beautiful the exalted, the mystical, to art and poesy—then, with the progress of time, it will never escape the fate, which is sure to overtake it. Perhaps the will shall still be there, throbbing and vital, but its soul will be dried up.

**भावार्थः—**

येथें पुनः सुसंस्कृतता आणि संस्कृति यांत खरोखर फरक काय हाच प्रश्न पडतो....परंतु यंत्र म्हणजे कांहीं सुसंस्कृतता नव्हे. फार झालें तर त्याला संस्कृति म्हणतां येईल. यंत्राच्या साह्यानें मिळणारी अतिश्रेष्ठ परिस्थिति माणसास असूं शकेल. तो आकाशांत उडेल, पाण्यांत डुंबेल, एका ठिकाणीं बसून, कलोन, बर्लीन, न्यूयॉर्क अथवा शिकागो वाटेल तेथें संदेश पाठवूं शकेल अथवा लॉस एंजल्स-मधील झेपेलीनच्या सन्मानार्थ होणारें गायन, लंडनांतील सेंटपॉलच्या मंदिरांतील वर्षारंभीं वाजणाऱ्या घंटाचा नाद अथवा ऑस्ट्रेलियांत उघडल्या जाणाऱ्या पार्ल-मेंटांतील स्वागताचे भाषण ऐकूं शकेल. परंतु इतक्या दर्पोद्धत गोष्टी करूनही तो सुसंस्कृत माणूस म्हणवला जाणार नाहीं. फारच झाले तर येवढें म्हणतां येईल कीं शास्त्रीय ज्ञानाच्या पूर्ण संस्कृतीचा तो फायदा घेऊं शकतो इतकेंच. परंतु सुसंस्कृततेचा संबंध जीवाच्या अंतरात्म्याशी आहे. वरील सर्व गोष्टी करूनही जर मनुष्यास स्वानंद घेता आला नाहीं, जर या यांत्रिक कृत्रिमतेच्या बाजारास तो एक क्षणभरही विसरूं शकला नाहीं, त्याच्या अत्युच्च आणि गूढ अशा आध्यात्मिक अस्तित्वाची जाणीव त्याला येऊं शकली व त्याचा तो अनुभव

घेऊं शकला नाहीं, काव्यकला इत्यादि पोकळ आनंदास तो पारखा होऊं लागला तर या काळाचे सपाट्यांत त्याचें भवितव्य अढळपणें ठरलेंच आहे. त्याच्या मनुष्य-पणाचा खरा झरा आटून जाऊन तो केवळ पशु बनणें भाग आहे. फारच झालें तर कदाचित त्या खऱ्या मनुष्यत्वाची थोडीबहुत जाणीव त्याच्या अंतःकरणांत हळूहळू स्फुरत राहील इतकेंच.

डॉ. पॉल यांना वैदिक ध्येयाची कल्पना नसल्यामुळें त्यांना आपलें ह्मणणें आह्मीं ह्मणतों तसें मांडतां आलें नाहीं. परंतु बाह्य प्रसाधनांनीं संतुष्ट न होतां जीव अखेरीस आंतर्मुख होईलच. व तसें होण्यांतच त्याचें जीवपण आहे, असा त्यांच्या ह्मणण्याचा भाव आहे. असो. कालाच्या पोटांतील गोष्ट आहे, तिच्याविषयीं जास्त तर्क न करीत बसतां, आपल्या मुद्याकडे वळूं. पूर्ण परिणत स्थितींतील वैदिक संस्कृतीचेंही असेंच होऊन हळू हळू तिचें मूळ धोरण पालटलें, आणि त्या पालटलेल्या काळांत या मोठमोठ्या शास्त्रांचा जगाची सुखसोय वाढविण्याकडे उपयोग करण्याचें व सर्व समुदायास त्यांचा होतां होईल तों प्रत्यक्ष उपयोग करून घेतां येईल, अशी त्यांची व्यवस्था ठेवण्याचें कोणाच्या डोक्यांत येईनासें झालें, ही एक साहजिक परंतु दुर्दैवाची गोष्ट होय. आपणांस वैदिक संस्कृतीचें जें वाङ्मय उपलब्ध आहे, तें तर सर्व याच काळांतलें आहे. त्याच्यामुळें या शास्त्रांचा समाजहितास प्रत्यक्ष उपयोग काय, किंवा जाणत्या लोकांनीं तो आजच्याप्रमाणें कां करून दिला नाहीं, अशा प्रकारची शंका उत्पन्न होते. परंतु त्याचें कारण त्या शास्त्राचें हीनत्व नसून त्या वेळेच्या माणसांची विशेष मनस्थिति हेंच होय.

संयमासारखें सर्वज्ञतेचें व सामर्थ्याचें साधन उपलब्ध झालें तरी, त्या साधनाच्या साह्यानें वेगळा उद्योग करावाच लागतो, ज्ञान आणि सामर्थ्य हीं कांहीं खऱ्या सेवकाप्रमाणें पुढें सज्ज होऊन नेहमी तयार असतात, असें नाहीं, हें आपण पाहिलेंच आहे. **विभूतिपादांतील** ५४ व्या सूत्रांतील '**सर्वविषयं सर्वार्था-विषयं अक्रमं**' यावर टीका करतांना **व्यासभाष्यांत** '**सर्वविषयं**' ह्मणजे '**नास्य किंचित् अविषयीभूतं इत्यर्थः**' असेंच ह्मटलें आहे. आत्मस्थिति सोडून अथवा आत्मिक उन्नति करीत असतांही स्वार्थाकरितां किंवा जगाच्या कल्या-णाकरतां ज्ञान आणि सामर्थ्य पाहिजे असतील तर, संयमाच्या साधनानें वेगळा उद्योग केला पाहिजे, हेंच तत्व '**तस्य भूमिषुविनियोगः**' या सूत्रांत सांगितलें आहे अशा प्रकारचा उपयोग एका काळीं करून घेतला जात असे. अर्वाचीन शिक्ष-

णांतले पूर्णप्रज्ञ व ब्रह्मविद्येंतील प्रयोगशास्त्री **श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांनींही या विषयीं In the halcyon days of Vaidic Civilization the transcendental science was the unfailing source from which important facts and truths were derived to replenish the Secular and Material sciences असें ह्मणून ठेवलें आहे, ( चरित्र खंड ३, पान १९ )

**भावार्थः—**

**वैदिक संस्कृतिच्या** अत्युच्च उत्कर्षाच्या स्थितींत सर्व जड आणि ऐहिक शास्त्रें यांचें ज्ञान अतींद्रियशास्त्रांपासूनच अचूकपणानें मिळविलें जात असें. ) ही परंपरा पुढें कशी तुटली हेंही आपणास वरील सूत्राच्या **व्यासभाष्यांतच** आढळून येते. ' **ईश्वरप्रसादात् जितोत्तर भूमिकस्यच नाधरभूमिषु परचित्तज्ञानादिषु संयमोयुक्तः** ' या वाक्यांतच आह्मीं वर सांगितलेल्या विशिष्ट मनस्थितीचें सुंदर वर्णन आहे. केवळ **पातंजल** शास्त्रानेंच शेवटपर्यंत वर जावयाचें, असाच आग्रह न राहिल्यामुळें साधनमार्गांत परस्परसंकर होऊन संयमासारखें साधन जवळ असूनही त्याच्या उपयोगाची कधीं गरज न भासल्यामुळें तें कोपऱ्यांत पडून राहिलें. आडवाटेनें लौकर पल्ला गांठणाऱ्या मनुष्यास **गंगोत्रीच्या** यात्रेंत मधल्या चट्टया जशा लागत नाहींत, तसाच प्रकार होऊन, पुढें पुढें तर त्या चट्टया जवळजवळ उठूनच गेल्या. सारांश गोष्ट व्यक्तीचा दृष्टीकोनच पालटून गेला, त्यामुळें असें झालें. **समर्थांना** प्रत्यक्ष संयमानें, अथवा **श्रीरामचंद्रांस** विचारून, आवरणोदकाच्या आधारानें ' धरा धरिली फणिवरें । वरतीं छपन्नकोटी विस्तारें '। हें वर्णन खरें आहे कीं काय, चौऱ्यांशीं सहस्र विस्ताराचा महामेरु, आणि त्याच्या पाठारावरील दगड मर्गज आणि स्फटिक यांचीं तिन्ही देवांचीं तीन शृंगें, त्याच प्रमाणें ' जेथें पांडव गळाले ' जेथून जावयास मार्गांत पडलेल्या महाअहीमुळें मार्ग नाहीं, तें हिमालयाचें स्थान-हीं सर्व प्रकरणें काय आहेत, त्याचप्रमाणें ' चारी सहस्र सातशें साठी । इतकी कलियुगाची रहाटी खरोखरच झाली कीं काय, हें इतिहास-संशोधन लिहितां आलें नसतें, असें नाहीं. परंतु मनुष्याचें कल्याण या बाह्यगोष्टींहून फार निराळ्या अशा गोष्टींत आहे, हें प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं शास्त्रवचनाची शंका घेण्याची कल्पनाच कधीं उत्पन्न झाली नाहीं. परंतु त्यांना तशी गरज भासली नाहीं, ह्मणून आह्मांस त्याची गरज असतां या महासाधनांचा उपयोग

नवीन दृष्टीनें करतां येणार नाहीं, असें नाहीं. उलट **श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांनीं ह्मटल्याप्रमाणें—

The transcendental science has never been opposed to, nor has it any retarding effect on the advancement of the secular and material knowledge. असें असून या **ब्रह्मविद्येचा हेतुच मुळीं** to teach the methods by which conscious communication can be established between the groups of powers as exibited in the outer world on the one hand, and the inner world of knowledge on the other hand, such knowledge being in part exibited by a condition of ( एकमेवाद्वितीयं आत्मन् ) or soul called consciousness; and also to teach the ways by which *the several powers etc can be generated and manifested independently of the outer world*. ( च. खं ३, पा. ६ ) असा आहे. आणि या कामाकरितां अतिशय वरच्या पायरीचा त्याग करून मुद्दाम या मधल्या भूमिकांचे प्रयोग करणारीं माणसें हवीं आहेत. तेवढ्याकरितां जी मनोभूमिका लागते, तशा तऱ्हेची पुष्कळ परिस्थिति पाश्चात्य संस्कृतीच्या सहवासानें तयार झाली आहे, हा एक तिचा उपकारच ह्मटला पाहिजे.

( अतिंद्रिय शास्त्रांचा कोणत्याही जड व ऐहीक शास्त्रासी मुळींच विरोध नाहीं. त्याचप्रमाणें त्याच्यामुळें त्यांच्या वाढीस कांहीं धक्काही पोहोचत नाहीं. असें ..............मुळीं जेणेंकरून ‘ एकमेवाद्वितीयं ’ अशा आत्म्याचा अंश जो जीव त्याच्या जाणीवेचें आणि त्या आत्म्याच्याच नानारूपानें परिणत झालेल्या बाह्य जगांतील अनेक शक्तींचें स्वाधीनतेनें दळणवळण स्थापित करणें आणि त्या सर्व शक्ती बाह्य जगातींल कशाचेही साह्य न घेतां कशा उत्पन्न करितां येतात तें शिकविणें, हा आहे.)

अशा प्रकारें **वैदिक संस्कृतीचीं** हीं शास्त्रें जरी उपयुक्त ठरलीं, तरी पाश्चात्यांच्या आधिभौतिक संस्कृतीच्या आजच्या परिणत स्थितींत तिच्याशीं टक्कर घेऊं शकतील काय किंवा तिच्यापेक्षां अधिक उपयुक्त होऊं शकतील काय, हा प्रश्न शिल्लकच राहतो. परंतु त्याचें उत्तर देणें फारसें कठीण नाहीं. कोट्यावधि रुपये खर्चून विमानांतून टाकलेल्या कांहीं गोळ्यांनीं अथवा पसरलेल्या धुरानें जें काम

होऊं शकतें, तें काम जर एकट्या माणसानें एका ठिकाणीं बसून एकट्याच्या क्रियेनें करून दाखविलें, तर अर्थात् त्याचें श्रेष्ठत्व कोणासही पटल्यावांचून रहावयाचें नाहीं. अशीच गोष्ट ज्ञान व सुखभोगी यांसंबंधींही आहे. **श्रीवासुदेवानंद सरस्वती** यांनीं ह्मटल्याप्रमाणें, वायुतत्वापर्यंत मजल मारलेल्या पाश्चात्यांच्या परिणतीपेक्षां, त्याच्या पलीकडील आकाशतत्व–मनस्तत्व–बुद्धितत्व–प्रकृतितत्व आणि परमात्मतत्व– इत्यादि उत्तरोत्तर सूक्ष्म आणि विरल होत जाणाऱ्या भूमिकेवरील परिणति ही केव्हांही श्रेष्ठच राहील. याविषयीं कोणाच्याही अंतःकरणांत संदेह येईल असें वाटत नाहीं. आज असें वाटतें, याचें कारण अस्तित्वाच्या उत्तरोत्तर विरल भूमिका आहेत, व दृश्य जगाच्या रंगभूमीवरील या खेळांची सर्व तयारी तेथेंच केली जाते व करितां येते. हें माहीत नसतें, व माहीत करून घेण्याची गरज भासत नाहीं, हेंच आहे. इतकेंच काय तर प्रयोग करून त्याविषयीं मत देण्याइतकीही आमच्या शास्त्रास किंमत न देतां, त्या सर्व कल्पनाच आहेत, ह्मणून आधींच ठाम ठरवून टाकलेलें असतें. असल्या पांडित्यापुढें ब्रह्मदेव आला ह्मणून तरी काय व्हावयाचें आहे ? असो.

याप्रमाणें मंत्रशास्त्र, योग, या अंगप्रत्यंगासहित **वैदिक संस्कृति** व त्यांच्या पायावर उभारलेली **वर्णाश्रमसंस्था** कांहीं दृष्टींनीं उत्तम ठरली, तरीही सामान्यतः एक शंका पुन्हा निघूं शकते. एवीतेवीं आमची संस्कृति जर्जर झालेलीच आहे, व पाश्चात्य संस्कृतीची परिणति या नाहीं त्या रीतीनें भविष्य काळांत त्याच वळणावर व्हावयाची आहे, असें तुह्मी भविष्य सांगतां आहां. मग आतां या जुन्यालक्तऱ्या वापरण्यापेक्षां पाश्चात्य संस्कृतीची नवीन वस्त्रेंच कां धारण करूं नयेत ? असाही प्रश्न निघूं शकतो. परंतु तो देखील किती उथळ आहे, हें अगदीं थोडा विचार करणाऱ्यासही दिसून येईल. हा स्वाभिमानाचा प्रश्न आहे. आजपर्यंत आह्मीं जगास ज्ञान देत आलों आहों, तें आतां आह्मींच पुढें द्यावयाचें कां आह्मांस शक्य असूनही जगाचें गुरुत्व दुसऱ्याच्या हवालीं करावयाचें–हा कांहीं मतांचा प्रश्न नाहीं. हा ज्याच्या त्याच्या आवडीचा व बाणेदारपणाचा प्रश्न आहे. आणि दुसरी गोष्ट अशी कीं, अनेक तऱ्हेचे अनुभव घेऊन भविष्य कालांत, ज्या गोष्टी दुसरे लोक केव्हांना केव्हां तरी करणार, त्या गोष्टी आह्मांस थोडीशी टाच सोसून जर आजच करतां येत असल्या, तर ती टाच घेणें बरें कां टाच घेण्यापेक्षां अजिबाद त्या सोडून देणें बरें, याचें उत्तर कोणीही देईल. शक्ति आणि

युक्ति यांच्या आधिभौतिक बलानें आज **वैदिक धर्मास** दीन केलें आहे, परंतु **वैदिक धर्मानें** आपल्या शक्ति आणि युक्ति यांच्या आधिदैविक बलाची वाढ केली, तर हेंच पारडें फिरवून वैदिक लोक व **वैदिक धर्म** हे जगाच्या मूर्धस्थानीं राहूं शकणार नाहींत काय? सारांश, हा प्रश्न ज्याच्या त्याच्या अभिमानाचा आहे. **वैदिक धर्मी** लोक म्हणून **वैदिक धर्माचें** अत्युच्च ध्येय पुढें ठेवूनच जगलें पाहिजे, असें ज्यांना वाटत असेल, त्यांनीं वाटेल तें सोसून **वैदिक संस्कृतीचा** होतां होईल तों तिचें मूळ स्वरूप पालटणार नाहीं, अशा रीतीनें उद्धार करण्याचा निश्चय केला पाहिजे, व तसा ते करतीलच. ज्यांना ते ध्येय नको असेल, व आज जें पुढें दिसत आहे, तेवढ्यापुरतेंच आपलें कार्यक्षेत्र आहे, असें वाटत असेल, त्यांनीं पाहिजे असल्यास जुनें मढें म्हणून ती संस्कृति अजिबाद टाकून द्यावी, व पाश्चात्य संस्कृतीचा पूर्ण स्वीकार करावा. मात्र कोणीकडून तरी, कांहीं हें कांहीं तें, असला तेजहीन सांवळा गोंधळ, कांहीं झालें तरी टाकून दिला पाहिजे. आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं, राष्ट्राचा उद्धार तेजसंपन्नतेनें होतो. केवळ संख्येनें अथवा केवळ उत्कृष्ट बुद्धिवादानें होत नाहीं; आणि तेजसंपन्नता ही पोलादाप्रमाणें परिश्रमानें आणावी लागते; निवळ माणसाच्या जीवनक्रम सुलभ केल्यानें, वाटेल तेवढे लिहावयाला, वाचावयाला शिकल्यानें सुखसोईची सारीं द्वारें त्याला मोकळीं करून दिल्यानें, अथवा आर्थिकदृष्ट्या त्याची लाभहानि त्याला पटवून दिल्यानें उत्पन्न होते, अशी नाहीं.

याप्रमाणें **वैदिकधर्म** म्हणजे वेदाच्या आधारावर असलेला, वेद म्हणजे योग मंत्र इ० अतींद्रिय शास्त्रांची विशिष्ट प्रक्रिया, त्यांचें शास्त्रीयत्व, वेदांकरितां **चातुर्वर्ण्य** आणि **चातुर्वर्ण्याच्या** स्थिरतेकरितां **ब्राह्मण्य**—या सर्व प्रणालिकेची आमच्या इकडील शास्त्रदृष्ट्या उपपत्ति काय आहे, तें आपण थोडक्यांत पाहिलें, व त्याच्या अनुषंगानें दुसऱ्याही कित्येक महत्वाच्या प्रश्नांचें दिग्दर्शन केलें. त्या सर्वा-वरून **चातुर्वर्ण्य** आणि त्याच्याचकरितां उत्पन्न झालेले पुढील सर्व प्रश्न हे, वाटतात तसे केवळ मानवी बुद्धीनें सोईच्या दृष्टीनें, अथवा मानवी स्वभावास अनुसरून मुद्दाम केलेलें, अथवा कालक्रमांत साहजिक उत्पन्न झालेलें बंड नसून त्यास एका मोठ्या शास्त्राचा आधार आहे, व एवढ्याकरितां स्वतःच्या **वैदिक धर्मीय**तेची जर थट्टा करावयाची नसेल तर त्याचा अभ्यास त्या विशिष्ट शास्त्रांच्या दृष्टीनेंच केला पाहिजे, व त्या करतां त्या मूलभूत शास्त्राचाही सप्रयोग अभ्यास

केला पाहिजे, एवढें जरी लक्षांत आलें, आणि मग आमच्या विवेचनासंबंधानें इतर बाबतींत कितीही मतभेद राहिला, तरी या लिहिण्याचें सार्थक होईल. या महत्वाच्या मुद्यावरील सर्व प्रश्नांचा विस्तृतपणें विचार करून त्याची निश्चित व्यवस्था सांगण्याचा या लेखाचा हेतु नाहीं, व तसें करण्याचा आमचा अधिकारही नाहीं, हें स्पष्ट मागें सांगितलेंच आहे. उलट या एका विशिष्ट दिशेनें त्यासंबंधीं जितक्या खऱ्या महत्वाचे प्रश्न निघतील, तितके मुद्दाम काढून विचारी लोकांपुढें मांडण्याचा व त्यांच्या बुद्धीला धक्का देण्याचाच आमचा हेतु आहे; आणि तो थोडाबहुत तरी साधेल, अशी आशा आहे.

**चातुर्वर्ण्याची** सशास्त्रता व उपयुक्तता जरी मानली, तरी आम्हीं पूर्वी म्हटल्याप्रमाणें, त्याविषयीं कित्येक महत्वाचे प्रश्न राहतातच. **चातुर्वर्ण्यानें** मागें काय केलें हा प्रश्न जरी सोडून दिला, तरी आज तें राष्ट्रीय व राजकीय उन्नतीच्या आड येत आहे कीं काय, व राजकीय चळवळ करणाऱ्यांना अपेक्षित असलेली एकी त्याच्याचमुळें अडून राहिली आहे काय, अथवा तें टाकून दिल्यास त्यांना पाहिजे तशी ती एकदम घडून येईल कीं काय, त्याचप्रमाणें, तें कितीही चांगलें ठरलें तरी, आतां परिस्थितिच अशी झाली आहे कीं, त्याला फांटा दिल्याखेरीज निरुत्साह, द्वेष, मत्सर यांची कीड निघून, जाऊन, समाजास सुस्थिति उत्पन्न होणार नाहीं, व त्याचा जोमदार संघ बनणार नाहीं, **चातुर्वर्ण्याच्या** मार्गानें उत्क्रांत स्थितींत पुन्हा येण्यापूर्वीच जर समाज मरून जात असला, तेथपर्यंत जगण्याचा आणि प्रयत्न करण्याचाही त्याच्या अंगांत तकवा नसला तर ‘ सर्वनाशे समुत्पन्ने ’ या न्यायानें **चातुर्वर्ण्या**ला फांटा देऊन पाश्चात्य पद्धतीवर, अथवा एखाद्या नव्या तत्वावर त्याची उभारणी कां करूं नये, इत्यादि प्रमुख, व **चातुर्वर्ण्य** राखावयाचें ठरलें तरी साधारण त्याची नवी घडी कशी बसवितां येईल, व राजकीय उन्नतीच्या आड धर्माची धोंड म्हणून नेहमी येणारे जाति, स्त्रियांचा प्रश्न, विवाहसंस्था भक्ष्याभक्ष्य आणि स्पृष्टास्पृष्टी–वगैरे प्रश्नांची काय वाट लावावी हा सारा विचार शिल्लकच राहतो. त्याचा उहापोह पुढील प्रकरणावर सोंपवून आतांपर्यंत केलेल्या लांबलचक विवेचनाचा सारांश वाचकांच्या सोईकरितां पुन्हां एकवार ठळकपणें मांडून–हनुमंताच्या शेंपटासारखें लांबलेलें हें प्रकरण संपवूं.

हल्लींच्या काळांत कोणत्याही कारणानें कां होईना **वैदिक धर्माचा** इतका ऱ्हास झाला आहे कीं, **वैदिक धर्म** म्हणजे काय त्याला एकादें निश्चित

स्वरूप आहे किंवा नाहीं, या गोष्टी देखील नीट उमजेनाशा झाल्या आहेत. अशा स्थितींत त्याला उजळा देऊन पुन्हा सुव्यवस्थित करावा, असें कांहीं लोकांना खरोखर धार्मिक कळकळीमुळें व बहुतेक सर्व लोकांना नाइलाजाची गोष्ट ह्मणून वाटूं लागल्यावर **वैदिक धर्म** अथवा ज्याला **हिंदुधर्म** ह्मणून आजकाल ह्मणण्यांत येतें, त्याच्या पुनर्घटनेचा प्रश्न उपस्थित झाला. परंतु या प्रश्नाचा खरा उगम राजकीय, ह्मणजे, आर्थिक प्रश्नांतून असल्यामुळें, ही जी पुनर्घटनेची भाषा येऊं लागली, ही कांहीं धरबंदावांचून येऊं लागली, व वाटेल त्या लोकांस केवळ विद्वान् ह्मणून, अथवा पुढारी ह्मणून अथवा ' मुखमस्तीति वक्तव्यं ' ह्मणून पांडित्य करतां येऊं लागल्यामुळें लोकांची पुष्कळशी दिशाभूल होऊं लागली. ह्मणून पहिल्यांदा, आपण असें पाहिलें कीं, कोणत्याही गोष्टींत मिथ्याचार नको. त्या तत्वावर जिवंत विश्वास असलेलीं जीं माणसें असतील, त्यांनाच त्या गोष्टी संबंधानें ' कांहीं कमी जास्त करा, ' असें ह्मणण्याचा अधिकार पोहोंचतो हिंदुशास्त्र व हिंदुधर्म व त्यांना धरून असलेल्या इतर सर्व प्रणालिका, या सर्वांच्या मुळाशीं, परलोक, परमेश्वर पुनर्जन्म, कर्मतत्व, अतींद्रिय सामर्थ्य, शब्दाची उत्पादकता, मनुष्यजीवाचें अतींद्रिय विश्वाशीं दळणवळण, व तें घडून आणणारीं ' योग ' वगैरे शास्त्रें आणि वेदाची मंत्रमयता इ० अनेक गूढ तत्वें असल्यामुळें, त्यांच्यावर ज्यांचा विश्वास असेल, त्यांनाच त्या धर्माचे अनुयायी ह्मणतां येईल; इतरांनीं नुसता मिथ्याचार जरी केला, तरी अधिकृतपणानें त्यांत कांहीं सुचविण्याची त्यांची योग्यता नाहीं, मग इतर रीतीनें ते कितीही पात्र असले तरी उपयोग नाहीं, असें आमचें ह्मणणें आहे. व असे या तत्वावर विश्वास असलेले जे कोणी असतील, त्यांनीं या मूलशास्त्रांच्या धोरणानें **वैदिक धर्माचें** निश्चित स्वरूप, तत्वसमन्वयानें ठरवावें, व त्याला अनुसरून धर्मांत अवश्य वाटेल तशी पुनर्घटना करावी. एखाद्या ठिकाणीं एखादी आधारभूत गोष्ट सांपडली, तरी तत्वसमन्वयानें ठरलेल्या धर्माच्या प्रकृतीस जर ती विरुद्ध असेल, तर ती करूं नये, आणि याच्या उलट, तत्वसमन्वित प्रकृतीस धरून असलेल्या गोष्टीस, पूर्वपरंपरेचा अथवा शास्त्रवचनाचा आधार नसला, तरी ती प्रचारांत आणावी, असें आह्मांस वाटतें. पूर्व सूत्रकारांची ' नैवेश्वर आज्ञापयति, नापि धर्मसूत्रकाराः पठंति, अपवादैरुत्सर्गा बाध्यंताम् इति ' किंवा ' दृष्टो धर्मव्यतिक्रमः साहसंच पूर्वेषाम् । तेषां तेजो विशेषेण प्रत्यवायो न विद्यते ॥ तदन्वीक्ष्य प्रयुंजानः सीदत्यवरः ' – वगैरे वचनें याच भावर्थास धरून

आहेत. याज्ञवल्क्यानें ' अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याचरेन्नतु ' ह्मणून जें ह्मटलें आहे, त्यांतील ' अस्वर्ग्य ' आणि ' धर्म ' या दोन शद्वांचा समन्वय आम्हीं वर सांगितलेल्या मार्गाखेरीज इतर रीतीनें होतच नाहीं. येथें ' धर्म ' ह्मणजे रूढधर्म, धर्मशास्त्रांत ज्याला कांहीं आधार आहे असें, व ' अस्वर्ग्य ' म्हणजे तत्वसमन्वयाच्या दृष्टीनें धर्माच्या मूल प्रकृतीस सोडून असलेलें, असा खरा अर्थ आहे. असो. अशा रीतीनें पुनर्घटना सुचविण्याचे खरे अधिकारी कोण व त्यांनीं पुनर्घटनेचा प्रश्न सोडवितांना साधारण किती गोष्टी लक्षांत टेवावयास पाहिजेत, अमुक प्रश्न केवळ सामाजिक आहे, अमुक केवळ तात्विक आहे, अशा प्रकारें आपल्याच अक्कलेनें उपस्थित होणाऱ्या प्रश्नांची विल्हेवारी न लावतां, वैदिक धर्मास आधारभूत असलेल्या, वर सांगितलेल्या अनेक गूढ तत्वांच्या अनुरोधानें त्यांचें वर्गीकरण करून, त्या शास्त्रांच्या अनुरोधानेंच ते निकालांत काढले पाहिजेत, हें आपण पाहिलें. त्याबरोबरच हिंदुस्थानच्या सर्व प्रकारच्या उन्नतीला धर्म नडतो, या ओरडीचा खरा अर्थ काय तेंही पाहिलें. चातुर्वर्ण्य, आणि जातिसंस्था व ज्या तत्वावर चातुर्वर्ण्याची उभारणी आहे, त्यांच्यामुळेंच प्रचारांत आलेली स्पृश्यास्पृश्यता–भक्ष्याभक्ष्यता, विवाहसंस्था व एकंदरींत स्त्रीजातीचा प्रश्न या गोष्टींनीं समाजांत संकुचितपणा उत्पन्न होऊन, बुद्धीची व पराक्रमाची वाढ खुंटते, द्वेष मत्सर इत्यादि दुष्ट विकारांचें प्राबल्य होऊन एकी होणें अशक्य होते, व हळूं हळूं समाज सडून जाऊन नाशाच्या पंथास लागला आहे, असा या ओरडीचा अर्थ आहे. याचा सरळ उपाय अर्थातच असा कीं, जेणें करून या काल्पनिक एकीचें सुख अनुभवावयास सांपडेल, तें खुशाल करावें, हा काय तो धर्म. या पलीकडे 'धर्म' 'धर्म' ह्मणून उराशीं बाळगणें ह्मणजे मुर्खपणाची कमाल होय. एकीच्या आड येत असतील तर, या गोष्टी खुशाल झुगारून द्याव्या. असेंही ओरड करणाऱ्या लोकांचें खरें मत आहे. परंतु असें स्पष्ट बोलून समाज वळेलसें वाटेना, ह्मणून–अथवा क्वचित् कांहीं लोकांनीं प्रामाणिकपणानेंही वरील सर्व प्रश्नांचा धर्माशीं कांहींही संबंध नाहीं; अथवा असल्यास तो फार थोडा आहे, निदान हें प्रश्न धार्मिक असल्यास त्यांचीं खरीं स्वरूपें तरी वेगळीं होतीं, आज दिसतात तीं अतीशय विकृत स्वरूपें आहेत, अशी भाषा सुरू केली. तेवढ्याकरितां चातुर्वर्ण्याचें मूळ वेद, वेदाचें मूळ मंत्रशास्त्र व योग, वेदांचें विशिष्ट तऱ्हेनें पौरुषेयत्व, अपौरुषेयत्व–इत्यादि प्रश्नांचा आपण विचार करून त्यांच्या अनुरोधानें पातंजलयोग,

धर्मशास्त्राचा खरा अर्थ, आस्तिकपणा व नास्तिकपणा, शास्त्रानुरोधानें पुनर्घटना करावयाची दिशा, **चातुर्वर्ण्याचें** पुराणत्व व ' **चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्म विभागशः** ' या **गीतावाक्यांतील** सर्वांनीं आजपर्यंत केलेला अपुरा अर्थ, धर्माचें जीवन त्यांतील तेजस्वितेवर अवलंबून आहे, त्यांतील अनुयायांच्या संख्येवर नाहीं, तेजस्विता ही निर्बंधतेनें होते, तत्वाकरितां मरून जाण्यांतच माणसाचें मनुष्यत्व आहे, तत्वाचा त्याग करून मिळविलेलें जीवनही लांछनास्पद आहे, तत्व म्हटलें म्हणजे तेथें तडजोड नाहीं, एकतर सारेंच घ्या, नाहींतर सारेंच टाका. त्याचप्रमाणें समानता वगैरे शद्बांचे खरे अर्थ काय व त्यांना धरून **चातुर्वर्ण्याच्या** मूलप्रकृतीस न सोडतां स्पर्शास्पर्श, पतित परावर्तन--वगैरे प्रश्नांची वाट लावण्याची दिशा, अपवादाला सिद्धांताचें स्वरूप देण्याची आजकालची घातक प्रवृत्ति, आणि व्यक्ति -सुखाचें फाजिल स्तोम--तसेंच वेद व मंत्रशास्त्र वगैरेंच प्रस्तुतच्या काळांत कांहीं उपयोग होणें शक्य आहे किंवा नाहीं, इ० अनेक प्रश्न उपस्थित करून विचाराकरितां लोकांच्या पुढें ठेवले. आतां, या सर्वांच्या अनुरोधानें उरलेले मुख्य प्रश्न जे जाति व वर्णव्यवस्था या खरोखरच राष्ट्रीय उन्नतीच्या आड येतात काय, व त्या एका काळीं जरी उपकारक असल्या तरी आज जर अपाय करीत असतील, किंवा आजही त्यांनीं फायदा होणें शक्य आहे, असें गृहीत धरलें तरी समाजाचा दुर्बलपणाच इतका वाढला असला कीं तो फायदा पदरांत पडण्याच्या आंतच समाज मरून जाऊं लागला तर या सर्व गोष्टींना फाटा देऊन कालानुरोधानें एखाद्या नवीन तत्वावर समाज व राष्ट्रीयत्व यांची उभारणी कां करूं नये, यांचा विचार पुढील प्रकरणांवर सोंपवून हें बरेंच लांबलेलें प्रकरण संपवूं.



## प्रकरण ४ थें.

# चातुर्वर्ण्य व वेदमार्ग.



( पुढें चालू )

आतांपर्यंतच्या एकंदर सर्व विवेचनावरून वाचकांच्या हें लक्षांत येईलच कीं समाजास किंवा राष्ट्रास जी मुमुर्षुता येते, ती त्याच्यामध्यें अनेक पक्ष असले म्हणून येते असें नाहीं. पक्ष कितीही असले, मतभेद कितीही तीव्र असला तरी त्याच्या योगानें राष्ट्राचें नुकसान होत नाहीं, इतकेंच नाहीं, तर वेळेनुसार आघात-प्रत्याघातानें त्याचें बल वाढून तें जास्त पराक्रमी होण्याचा संभव असतो. मात्र एवढेंच कीं ते पक्ष प्रामाणिक पाहिजेत, व मतभेद बाळगिणाऱ्या माणसांच्या ठिकाणीं माणुसपणाची, निदान बिनतक्रार ओळख पडेल, इतकी तरी वाढ झालेली असली पाहिजे. कारण प्रामाणिक पक्षभेद नसले तर मिथ्याचार उत्पन्न होतो, आणि आमूलाग्र जें खोटें आहे, त्यांतून कांहींही खरें निघणें केव्हांही शक्य नाहीं. बरें, मनुष्य या नात्यानें राष्ट्रघटकाची वाढ जर पूर्ण झालेली नसली, तर मतभेद व उन्नति वगैरे सर्व अवस्था त्यांच्या कर्तृत्वशक्तीपलीकडे असल्यामुळें **श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्राच्या उपसंहारांत म्हटल्याप्रमाणें कितीही उत्तम तत्वें असलीं, तरी त्याचा त्यांना प्रत्यक्ष फायदा कांहींच घेतां येत नाहीं. अशा स्थितींत राष्ट्रशिक्षकाचें पहिलें काम जर कोणतें असेल, तर तें सर्वप्रकारचा मिथ्याचार टाकून मनुष्यत्वानें जगण्याचें, म्हणजे कांहीं तरी ध्येयास आपलें जीवन अर्पण करण्याचें शिक्षण राष्ट्रास देणें हें होय. व तेवढ्याचकरितां आम्ही मागील दोन्ही प्रकरणांत. धर्मासारख्या तात्विक बाबतींत तडजोड असूं शकत नाहीं. एकतर सारें घ्या, नाहींतर सारें टाका, या विचारसरणीवर जास्त जोर दिला आहे. राष्ट्रास जी एकी पाहिजे आहे, अथवा जो जोम पाहिजे आहे, तो असें केल्याखेरीज इतर कशानेंही लौकर येणार नाहीं, असें आम्हांस वाटतें.

**वर्णव्यवस्था व जातिसंस्था** या व यांना धरून असलेल्या अस्पृश्यते-सारख्या इतर गोष्टी यांनीं राष्ट्राचें नुकसान केलें किंवा काय, व आजही त्यांच्याच करितां सर्व एकी अडून बसली आहे कीं काय, या मताचा आजवर अनेकांनीं इतक्या

प्रकारांनीं विचार केला आहे कीं त्या एकंदर वादांत पुन्हा शिरण्याचें कांहीं कारण आहे, असें वाटत नाहीं. त्या वादानें ह्मणजे या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागला आहे असें नाहीं, परंतु तो इतका प्रसिद्ध वाद आहे कीं त्यांतील पूर्वपक्ष उत्तरपक्ष, व शंका आणि त्यांचें समाधान–हीं बहुतेक सर्व लोकांच्या परिचयाचीं आहेत. तेव्हां त्यांचाच पुन्हा खल न करतां त्यांतील मुख्य एकदोन गोष्टींचा विचार करूं. पहिली गोष्ट अशी, कीं या विचारसरणीच्या लोकांच्या विचाराची कार्यकारणपरंपरा अनुभवाच्या थोडीशी उलट आहे. एकीकरितां राष्ट्राचें गाडें अडलें, हें तर खरेंच. पण ती एकी नसण्याचें कारण धर्म व जाति ही गोष्ट मूळांत खरी नाहीं असें आह्मांस वाटतें. ज्या लोकांना असें वाटतें त्या लोकांची राष्ट्रांतील लोकांच्या एकीविषयीं कांहींतरी अद्भुत कल्पना असली पाहिजे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या आधीं फ्रान्समध्यें समता वगैरे शद्बांसंबंधीं अशाचविचित्र कल्पना होत्या, व इतके वर्षांच्या अनुभवानें त्या वेडगळ ठरून, तशा अर्थानें समता स्वातंत्र्य, बंधुता–वगैरे शद्ब केव्हांही मनुष्यजातींत खरे असूं शकणार नाहींत, अशी खात्री होऊन, मागील प्रकरणांत दिलेल्या ट्रॉट्स्कीच्या वाक्याप्रमाणें, त्या शद्बांचे आतां अर्थ करण्यांत येऊं लागले आहेत. माळेंतील मणि ज्याप्रमाणें अनेक जातीचे व एकमेकांपासून अगदीं भिन्न असूनही एका सूत्रांत गुंफल्यामुळें त्यांच्यांत एक प्रकारची एकी उत्पन्न होते, तशा प्रकारें, अनेक भिन्न प्रकृतींच्या जीवांना त्यांचा भिन्नपणा व स्वतंत्रपणा कायम ठेवूनही एखाद्या सामान्य सूत्रांत गोंवणें, याचेंच नांव त्यांची एकी घडवून आणणें. त्यांच्यांतला भिन्नपणा काढून टाकून सारे मणी अगदीं एकजात एका सांच्यांत ओंतून तयार करूं म्हटलें तर मनुष्यास स्वतंत्र इच्छाशक्ति असल्यामुळें ही गोष्ट केव्हांही अशक्यच आहे. आणि एवढ्याचकरितां मोठमोठे विचारी लोक अशा प्रकारच्या एकीची कल्पना कधींही करीत नाहींत. निग्रो लोकांचा सुप्रसिद्ध पुढारी **बूकर टी. वॉशिंगटन** यानें देखील असें म्हटलें आहे कीं—

In all things which are purely social, we can be as separate as the fingers, yet one in the hand. in all things essential to mutual progress.

(तळहाताचीं बोटें ज्याप्रमाणें आपआपल्या ठिकाणीं स्वतंत्र असूनही एकजीव आहेत त्याप्रमाणें ( आपण सर्व पृथक् पृथक् समाजघटक ) केवळ सामाजीक बाबतींत अगदी स्वतंत्र राहूनही उन्नतीमार्गांत अगदीं एकजीव राहूं शकूं.)

याचा अर्थ असा आहे कीं, हें विश्वच भिन्नतेच्या पायावर असल्यामुळें, मनुष्यजातींतही भिन्नत्व हें रहावयाचेंच. तेव्हां, कोणत्या ना कोणत्या रीतीनें भिन्नत्व रहावयाचेंच तर, अमुक तऱ्हेचें भिन्नत्व आहे, म्हणून नुकसान होतें, अमुक तऱ्हेचें भिन्नत्व झाल्यास होणार नाहीं, हें म्हणणें चुकीचें होईल. म्हणून भिन्नत्व काढून टाकण्याचा प्रयत्न न करतां, भिन्नत्वाचें महत्व जेणेंकरून जाईल, अशा प्रकारें मनुष्यांत एक कांहीं सामान्य सूत्र उत्पन्न करावयाचें. इतिहासांत शिरावयाचें नाहीं असें म्हटल, तरी गतकालाकडे सिंहावलोकन केलें असतां एक गोष्ट निर्विवादपणें आढळून येते कीं गेलीं दोनतीन हजार वर्षें तरी हिंदुस्तानामध्यें जातिवर्ण वगैरे सर्व होते, परंतु त्यामुळें राष्ट्राचें गाडें कधीं विशेष अडून राहिलें आहे, असें म्हणतां येणार नाहीं. मुसलमानांना देखील येथें पाय रोंवून सत्ता गाजविण्यास सांपडली, व हिंदुस्तानास त्यांचा प्रतिकार करतां आला नाहीं, याचें कारण जातीभेद, अशी निर्विवाद साक्ष इतिहास देत नाहीं. इतर देशांत पूर्वी जातीभेद नसतांही प्रत्येक मनुष्य योद्धा असेच, असें नाहीं. अलीकडील काळांत, फ्रेंच सेनापति **कार्नो** यानें कॉन्स्क्रिप्शनची पद्धति प्रचारांत आणीपर्यंत देशांतील प्रत्येक मनुष्याचा देशसंरक्षणास उपयोग होत नव्हता. मुसलमानांच्या काळीं देशांतील प्रत्येक मनुष्य योद्धा नसून, कांहीं विशिष्ट थोड्या लोकांवर देशाच्या संरक्षणाचें काम पडल्यामुळें प्रत्येक लढाईत मुसलमानांचा जय झाला, * अशी इतिहासाची साक्ष नाहीं. उलट,

---

* चातुर्वर्ण्य असलें तरी आब्रह्मचांडाळ सर्व जाती अगदी परवाचें निःशस्त्रीकरणापर्यंत शस्त्रकलेचें उत्तम शिक्षण घेतलेल्या असत. सैन्यांत रजपूताखेरीज कोणी लढत नसत असा कोठेंही दाखला सांपडत नाहीं. खुद्द महाभारतांत देखील रणयज्ञाची दीक्षा घेऊन उभे असलेल्या सर्व जातींचा उल्लेख आहे. अगदी अलीकडचा काळ टाकला तर परकी शत्रूंशी टक्कर देण्यांत जातीभेद आड आला आहे असा म्हणण्याजोगता कोणचाच पुरावा नाहीं. मात्र इतकेंच कीं एकराष्ट्रीयत्वाची भावना व (divided we fall; united we stand अथवा ) 'वयं पंचाधिकं शतम्'। हें महातत्व यांचा आत्यंतिक अभाव झालेला असल्यामुळें शौर्याचा उपयोग झाला नाहीं. परंतु तो एकराष्ट्रीयत्वाचा अभाव जातिद्वेषानें झाला असा त्या काळचा एक देखील पुरावा नाहीं असें म्हणतां येईल. युरोपीयन राष्ट्रांत जेथें चातुर्वर्ण्य मुळींच नव्हतें तेथें देखील गेल्या शतकांतील ( Conscription )

भारताचार्य **वैद्यां**सारख्या इतिहासपंडितांस, प्रारंभींच्या सर्व लढायांत हिंदु व मुसलमान यांच्या सैन्याचें सर्व प्रकारांनीं तुल्य बल असून मुसल्मानांस प्रत्येक वेळेस हटकून जय कां मिळालें, हें एक मोठें कोडेंच पडलें आहे. व त्याचें समाधान त्यांनीं कर्तृत्ववान् सेनापति हें एक यशाच्या सामुग्रीचें ' दैवं चैवात्रपंचमम् ' अशा पद्धतीचें साधन कल्पून केलें आहे. सेनापतीच्या कर्तृत्वावर तर पुष्कळच अवलंबून असतें, तरीपण आह्मांस असं वाटतें कीं पराक्रम किंवा शौर्य, आणि युद्धशास्त्र किंवा युद्धकला या गोष्टी अगदीं वेगवेगळ्या आहेत, ही गोष्ट त्यावेळचे हिंदुलोक विसरून गेले होते युद्धशास्त्राचा आणि युद्धकलेचा पराक्रमानें उपयोग करावयाचा तो एका बाजूस राहून केवळ पराक्रमावर भिस्त ठेवल्यामुळें या सर्व लढायांत अपयश आलें. त्याचें पुष्कळ अंशीं कारण, मागील प्रकरणांत सांगितलेल्या मराठ्यांच्या उदाहरणाप्रमाणें **हर्षवर्धन** व **सत्याश्रय** यांच्या कालानंतर सर्व देशास एकदम मिळालेली एकदोन शतकांची शांतता हें होय. हा इतिहासाचा विषय आहे, तेव्हां त्याविषयीं येथें विस्तार करणें अप्रस्तुत होईल; ह्मणून तसें न करतां आपल्या मूळ मुद्याकडे वळूं.

मुसलमान लोकांच्या वेळीं झालेल्या पारतंत्र्याचें कारण जशा जातिसंस्था नव्हेत, तशाच **शिवाजीमहाराजां**नीं मिळविलेल्या स्वातंत्र्याचें कारण देखील जातिसंस्थांचा नाश हें नव्हे. **राजाराम**महाराजांच्या कारकीर्दीनंतर **ताराबाई**च्या अंगांत हें जातिभेदाचें भूत संचरेपर्यंत हिंदुस्थानच्या मागील २०।२५ शतकांच्या कोणत्याही उन्नति अथवा अवनतीचा जातिसंस्थाशीं कार्यकारणाइतका महत्वाचा संबंध नव्हता, असा इतिहास निर्वाळा देत आहे. दोन अडीच हजार वर्षेपर्यंत जी गोष्ट राष्ट्रास यत्किंचितही अपायकारक झाली नाहीं, ती गेल्या शेंदोनशें वर्षात मात्र कालकूटासारखी नेमकी त्याच्या गळ्यांत कशी अडकून बसली हें विचार करण्याजोगतें आहे.

**ताराबाई**च्या वेळीं देखील हें भूत प्रथम जातीद्वेषांतून उत्पन्न झालेलें

---

सक्तीच्या लष्करी शिक्षणाची पद्धत निघेपर्यंत, एकंदर लोकसंख्येचा फार थोडा भागच प्रत्यक्ष लढाईच्या कामीं येत असे. याच्या उलट जातीभेद किंवा चातुर्वर्ण्यविभाग यांच्यामुळें लढण्यास पुरेसे लोक मिळालें नाहींत म्हणून पराजय झाला असें आमच्याकडे कधींच झालें नाहीं. असें असतां चातुर्वर्ण्याचें माथीं पारतंत्र्याचें खापर फोडणें कितपत रास्त होईल याचा प्रामाणिकपणानें विचार करावा !

नसून, व्यक्तिद्वेषांतूनच उत्पन्न झालेलें आहे, व पुढें राष्ट्राच्या अधोगतीचा फायदा घेऊन परकी लोकांनीं त्याचा पद्धतशीर समंध उरावर बसविला. लढाईची गोष्ट सोडली तरी मुसलमान लोकांच्या ५।६ शें वर्षांच्या अंमलांत केवळ जातिद्वेषानें त्यांचें मोठें कार्य झालें आहे, अथवा आमचें बिघडलें आहे, असा पुरावा सांपडत नाहीं. जीं कांहीं उदाहरणें अशा तऱ्हेचीं सांपडतात, तीं इतकीं सामान्य आहेत कीं तशीं उदाहरणें जगांतील कोणत्याही देशाच्या कोणत्याही काळाच्या इतिहासांत आढळून येतात. त्यांच्या मुळाशीं आज ज्याप्रमाणें आपण समजतों, त्याप्रमाणें, वर्ण अथवा जातिविषयक मानापमानाची कल्पना, द्वेष, मत्सर इत्यादिक नसून, व्यक्तिविषयक नीच स्वार्थ दिसून येतो. आणि जोंपर्यंत मनुष्यस्वभाव, आहे त्या तऱ्हेचा आहे, तोंपर्यंत तीं उदाहरणें, सवडीप्रमाणें, कमीजास्त प्रमाणांत केव्हांही आढळणारच. त्याचप्रमाणें **ताराबाई**च्या ब्रह्मद्वेषाचा उगमही व्यक्तिद्वेषांतूनच होता. ‘ ब्राह्मण व ब्राह्मणेतर ’ ही कल्पना त्यावेळेला नव्हती. कारण तिच्या पदरीं ब्राह्मण लोक होतेच, व धर्मभावनेनें, पूज्यबुद्धीनें ती त्यांस नमस्कारही करीत असे. अशा स्थितीमध्यें **ताराबाई**च्या मनांत हें भूत उत्पन्न होण्याचें जें कारण झालें, तेंच पुढें सारखें वाढत गेल्यामुळें त्यास प्रस्तुतच्या ‘ ब्राह्मणब्राह्मणेतराचें स्वरूप आलें. जोंपर्यंत राज्यपद्धतींत वतनदारी आली नव्हती व ज्ञान आणि तप यांच्या विशेष प्रभावांतच आपलें श्रेष्ठत्व आहे, हें विसरून संपत्ति आणि तन्मूलक सुखसोई यांच्या द्वारें तें श्रेष्ठत्व उपभोगण्याचें ब्राह्मणांनीं ठरविलें नव्हतें, तोंपर्यंत अशा तऱ्हेचा कोणताही वाद निघण्याचें कारण नव्हतें. **चंद्रगुप्तास** एवढें प्रचंड साम्राज्य मिळवून देणारा **आर्यचाणक्य** हा स्वतः, दोनचार बटूंनीं आणलेल्या शेणगोळ्यांच्या ढिगारास आपली संपत्ति समजत असे. हें कमालीचें उदाहरण सोडून दिलें, तरी इतर वर्णांच्या वृत्तीचा आश्रय करून ऐहिक सुखाचा उपभोग घेणाऱ्या ब्राह्मणांचींही उदाहरणें सांपडतात. परंतु पूर्व इतिहासांत धर्माखेरीज इतर रीतीनें वंशपरंपरेनें वतन देण्याची फारशी पद्धत नसल्यानें ते ब्राह्मण प्रतिस्पर्धी ह्मणून इतर वर्णांच्या बोकांडी कायमचे असें कधींच बसले नाहींत. ब्राह्मणासारखा पिढ्यानपिढ्या श्रेष्ठ बुद्धिमत्ता कमाविलेला वर्ग कायमचा प्रतिस्पर्धी झाला असता तर इतर वर्ण पेशवाईतल्याप्रमाणेंच खास मागें पडले असते. त्यांची उन्नति बुद्धि, तप, नीति यांच्यावरच अवलंबून नसून इतर गुणांवर अवलंबून असल्यामुळें, व संपत्ति आणि सुखसोई यांची त्या इतर गुणांस

जोड अवश्य असल्यामुळें एक वेदविद्या व तप हें सोडलें तर, ब्राह्मणाच्या आणि त्यांच्या संस्कृतींत जी समानता होती ती नाहींशी होऊन दोघांमध्यें कधींच फार अंतर पडलें असतें. एकदां असें अंतर पडलें ह्मणजे स्वतःच्या श्रेष्ठत्वाची विशिष्ट दिशा नाहींशी झाल्यामुळें आज जो ब्रह्मद्वेष दिसत आहे, तो पूर्वी कधींच माजला असता. स्वतःच्या सर्व प्रकारच्या हीनत्वाची जाणीव हीच हीन मनुष्याला श्रेष्ठ मनुष्याचा द्वेष करावयास लावते. अशा जाणीवेनें जो द्वेष उत्पन्न होतो तो कांहीं विशेष अत्याचाराचे प्रसंग सोडले तर इतर रीतींनीं सोसाव्या लागणाऱ्या कोण-त्याही अपकारापेक्षां अतिशय तीव्र व घातक असतो. असाच प्रकार जवळजवळ गेल्या दीडदोनशें वर्षांत घडल्यामुळें हा वणवा उत्पन्न झाला आहे. आतां हा इतक्यावरच शमणार कां सर्व—नाश करणार, असा प्रश्न आहे.

**शिवाजीमहाराजांच्या** वेळीं किंवा त्यापूर्वीही सर्वांकरितां अर्थात् देवाकरितां राज्य, राज्याकरितां अथवा गोब्राह्मण प्रतिपालनाकरितां पराक्रम, व पराक्रमाकरितां वतन, अशी प्रणालिका होती. **राजारामाच्या** कारकीर्दीत उत्पन्न झालेल्या **सरंजामीनें** तिचा उलटापालट होऊन स्वतःकरितां वतन, वतनाकरितां पराक्रम, व पराक्रमामुळें राज्य अशी स्थिति झाली. व त्यामुळेंच पुढें स्वराज्याचें आयुष्य कमी झालें, हें इतिहासप्रसिद्ध आहे. ‘ मराठा तितुका मेळवावा—’ ही **शिवाजीमहाराजांच्या** वेळची भावना, व राज्य ह्मणजे स्वराज्य, व स्वराज्या-करितां वतन तेंच वतन, या बाण्याचें **खंडोजीबल्लाळाचें** वर्तन, पाहिलें, आणि देवतातुल्य साध्वी **अहिल्याबाईची** ‘ कुंपिणीची नोकरी करूं, नाहींतर वाटेल त्याची करूं आम्हांस काय, कोणाचीही नोकरी करणें ’ म्हणून केवळ भाडोत्रीपणा दाखविणारी धमकी पाहिली, म्हणजे हें लक्षांत येईल. एकदां अशी दृष्टि बनली म्हणजे, त्या वतनाच्या आड जो कोणी येईल, मग तो सर्व राष्ट्राचें कल्याण कर-णारा कां असेना, त्या माणसाचा द्वेष करणें हा स्वभावच होऊन बसतो. **शाहूच्या** कारकीर्दीत व नंतर पेशवे पुढें सरले नसते, तर मराठेशाहीचा विस्तार झाला इतका झाला नसता, व तिचा डोल्हाराही टिकला इतका टिकला नसता, युरोपियन लोकांचे पांढरे पाय येथें शेंपन्नास वर्षें आधींच रुतले गेले असते, व एकंदरींत इतिहासाचें स्वरूपही कांहीं वेगळें झालें असतें. तें कसेंही असलें तरी त्या वेळेला ब्राम्हणांनीं पुढें सरणें हें अगदीं परिस्थितीला धरूनच कसें घडलें, व ब्राम्हणांच्या घरांत पेश-वाई जाण्यानें स्वराज्याचा नाश न होतां उलट फायदाच कसा झाला--इत्यादि

प्रश्नांसंबंधीं रा. **सरदेसाई** वगैरे इतिहासज्ञांनीं केलेल्या चर्चा प्रसिद्धच आहेत. स्वराज्याचें काम करूनही ब्राह्मण आर्यचाणक्यासारखे बाजूस कां सरले नाहींत, असा दोष त्यांना देणेंही योग्य होणार नाहीं. गेल्या शतकाच्या प्रारंभीं युरोपांत अतिशय सुधारलेल्या फ्रान्सच्या नेपोलियनलाही अमेरिकेच्या वॉशिंगटनचें उदाहरण पुढें असून देखील तसें करतां आलें नाहीं. सारांश इतकाच कीं कालाच्या ओघांत त्यावेळीं तशा गोष्टी घडल्या, व चित्पावन ब्राह्मणांच्या माथीं त्याचें खापर फुटलें. ब्राह्मणांच्या ऐवजीं ताराबाईच्या आड दुसरे कोणी आले असते, तर त्यांचाही तिनें असाच द्वेष केला असता, व त्याचाही परिणाम असाच झाला असता. याचा अर्थ असा कीं ताराबाई व मानाजी आंग्रे इत्यादिकांनीं जो पेशव्यांचा द्वेष केला, तो ब्राह्मण ह्मणून नव्हे, तर आपल्या स्वार्थाच्या आड येणारी जात ह्मणून केला. ताराबाईचा पक्ष स्वीकारून व तिच्या मुलाला गादीवर बसवून बाळाजी विश्वनाथानें तिचे दोन कान उपटले असते, तरी भूदेव ह्मणून त्याच्यापुढें दंडवत घालण्यास तिला कमीपणा वाटला नसता. असो. अशा रीतीनें हें बीं रुजल्यानंतर पुढें इंग्रजशाहींत, माणसाच्या पराक्रमाला गवसणी घालून खुंटीवर लटकवण्यांत आल्यामुळें, बुद्धीचे घोडे नाचविणाऱ्यांचा काळ आला. त्यामुळें साहजिकच ब्राह्मण पुढें सरले, पाश्चात्यविद्या व पाश्चात्य राहणी यांचाही त्यांनीं लौकरच स्वीकार केला व ते जास्त सुखसोयींनीं राहूं लागले. त्यामुळें ब्राह्मण व इतर वर्ण यांच्या मोठेपणाचीं विशिष्ट क्षेत्रें नाहींशीं होऊन व्यक्ति व कौटुंबिक जीवन या दृष्टीनेंही उभयतांच्या संस्कृतींत भयंकरच अंतर पडलें. अशी स्थिति पूर्वीं खास नव्हती. नानासाहेबांची गोपिकाबाई व मल्हाररावांची गौतमाबाई यांच्या, जातीस अनुसरून राहणी वेगळ्या असल्या, तरी व्यक्तिदृष्टीनें उभयतांच्या संस्कृतींत फरक नव्हता. जी गोष्ट मोठ्या प्रमाणांत थोरामोठयांची, तीच लहान प्रमाणांत गोरगरीबांची. गांवचा कुळकर्णी आणि पाटील अथवा एखादा सामान्य भिक्षुक व शेतकरी यांच्यांत व्यक्ति व कौटुंबिक जीवन यांच्या दृष्टीनें फरक नव्हता. जातीच्या विशिष्टपणाला धरून आचार कांहीं वेगळे पडले, तरी विचारांच्या दृष्टीनें व इतर सर्व मानवी गुणांच्या दृष्टीनें केवळ कांहीं खालील वर्ग सोडले तर सर्व वर्ण सामान्यतः एका पातळींत होते. सुखसोईच्या दृष्टीनें तर ब्राह्मणांपेक्षां इतर वर्णांचीच स्थिति बरी असे. अव्वल इंग्रजींतील ब्राह्मणांचें रोजचें नुसतें खाणेंपिणें घेतलें तरी आपल्याच जुन्या लोकांकडून अशी माहिती मिळते कीं, त्यांच्यामध्यें

व इतर वर्णांच्या खाण्यापिण्यांतही मोठासा फरक नव्हता. विशेष प्रसंगानें भात, मामुली प्रसंगाला गव्हाच्या खिरीचें पक्वान्न, व पुरणपोळी ह्मणजे तर मोठाच सण अशी स्थिति सुसंपन्न ब्राह्मणकुटुंबांतही होती. हें उदाहरण क्षुद्र आहे. परंतु त्याचा हेतु असा आहे कीं इतक्या बारीक गोष्टीपासूनही इंग्रजीच्या पुढील काळांत ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्या संस्कृतींत महदंतर पडलें. त्यामुळें एकास आपल्या श्रेष्ठतेची निर्विवाद जाणीव होऊन दुसऱ्यास आपली हीनता अधिक भडकपणानें भासूं लागली. त्यांतच परकी लोकांच्या विषारी वाङ्मयाचा परिणाम होऊन ब्राह्मणब्राह्मणेतरांचें भेसूर भूत उत्पन्न झालें. मिळून काय? मूळ तत्व दोघांचेंही सुटलें. आतां एक सिद्धांत तर अगदीं उघड आहे–कीं जो दुसऱ्याचा द्वेष करतो त्याला त्याचें श्रेष्ठत्व मनांतून निखालस पटलें असतें. एका बाजूनें असा प्रकार घडत असतां दुसरीकडून ब्राह्मण-वर्गांत, विशेषतः भिक्षुकवर्गाची स्थिति अतिशय खालावत जाऊन त्यांच्यांत व गृहस्थ ब्राम्हणांत अशाच तऱ्हेचें अंतर उत्पन्न झालें. वेदविद्येचें रक्षणाचें काम मुख्यतः यांच्याकडे असल्यामुळें त्यांचा अध.पात झाल्यामुळें त्यांच्याबरोबर एकंदर ब्राम्हणवर्गाविषयीं आणि वेद व तन्मूलक शास्त्रांविषयीं अनादर बुद्धि उत्पन्न झाली. अतिशयोक्तीचीं वर्णनें टाकून दिलीं तर एकंदर ब्राम्हणवर्गानें, जेणेंकरून इतर लोकांहून त्यांचें उच्चत्व उमटून पडेल, असें आपलें शील सोडलें यांत कांहींच शंका नाहीं. सत्यसमाजिष्ट वगैरे लोकांनीं ब्राम्हण, भिक्षुक, कुळकर्णी वगैरे लोकांची जी टवाळी केली, ती एकंदरीत अतिशय निंद्य व चीड आणणारी होती, हें खरें. तरीपण त्याबरोबरच विकृत कां होईना परंतु तींत सत्याचा अंश नाहीं, असें म्हणतां येणार नाहीं. खरें बोलणारा सख्खा बाप असला तरी नकोसा होतो. तेव्हां हें आमचें स्पष्ट लिहिणें कदाचित् वाचकांस रुचणार नाहीं. परंतु त्याला कांहीं इलाज नाहीं. आत्मसंशोधनाच्या कटु कर्तव्याकरितां निर्भीडपणानें तसें करणें भाग आहे. कदाचित् क्वचित् कोठें एखादें कांहीं आढळलें कीं त्या पराचा कावळा करून ढोल पिटणारे लोक याचा फायदा घेऊन 'हें बघा, तुमचेच लोक तुम्हांस काय म्हणतात,' असें म्हणण्यासही कमी करणार नाहींत. परंतु या दोनही प्रकारच्या लोकांस दुरूनच हात जोडून आत्मपरिक्षणाचें काम आपणांस केलें पाहिजे. भिक्षुक वर्गाचा झालेला हा ऱ्हास जर केवळ एकांगी असता, तर इतका जाणवला नसता. परंतु खेदाची गोष्ट ही आहे कीं, विद्या आणि शील या दोन्हीही रीतींनें हा ऱ्हास झाला, आणि आर्थिक परिस्थितींमुळें तो लक्षांत न येण्याइतक्या झपाट्यानें झाला. तशांतच, परकी राज्यकर्त्यांच्या

' लाज सोडा, लोकांस फोडा, आणि मतलब जोडा–' या त्रिष्टुप छंदांत पावलें टाकणाऱ्या कुटिल राजनीतीनें त्याला उचलून धरून हल्लीं आलेलें जातीद्वेषाचें भयंकर स्वरूप दिलें, व त्याच्या पोटांत अस्पृश्यता वगैरे वादांना महत्व आलें. खरें म्हटलें तर, महाराष्ट्रामध्यें अस्पृश्यतेचें एवढें तीव्र स्वरूप कधींही नव्हतें, व त्याचें जें भडक चित्र मांडण्यांत येतें, तशा तऱ्हेचे दुष्परिणाम आह्मांस कधीं जाणवलेही नाहींत. या वादास खरें महत्व मलबार, मद्रास, व बंगाल प्रांतांत होतें. तेथील लोकांचें त्या विषयींचें वाङ्मय वाचून, आणि येथेंही सरकारला खालच्या वर्गाचा मायावी कळवळा जो नेहमीच येतो, त्यामुळें महाराष्ट्रांत ही खरूज खाजवून काढलेली आहे. सारांश व्यक्तीद्वेषांतून निघालेल्या मनोवृत्तीस कांहीं परिस्थितीनें व कांहीं राजकर्त्यांच्या कुशलतेनें हें जातिद्वेषाचें स्वरूप येऊन एका ठिकाणीं खाणें आणि पिणें, येवढ्यांतच काय तें बंधुत्व आणि प्रेम येऊन बसलें. हल्लीं तर राजकीयदृष्टीनें सर्व गोष्टींचा विचार करणाऱ्या विद्वान पुढाऱ्यांना अशा तऱ्हेच्या एका ठिकाणीं खाण्यापिण्यावांचून एकी होणें अशक्यच वाटूं लागलें आहे. परंतु सर्वच लोक असे केवळ राजकीय विचाराचे नसल्यामुळें आणि राजकीय दृष्टीनें विचार करणाऱ्यांतही निरनिराळ्या विचारांच्या दिशा असल्यामुळें असें करण्याला कांहीं पूर्व इतिहासाचा, कांहीं शास्त्रवचनांचा आधार मिळेल तर बरें, असें वाटून, त्या दृष्टीनें व त्या तऱ्हेच्या परिभाषेनें हे प्रयत्न केले जातात, आणि तेवढ्याकरितां **डॉ० केतकरा**सारखे लोक हिंदुधर्म हा मुळीं प्रादेशिक असून कांहीं तत्वमूलक नाहींच असें ह्मणण्यापर्यंत स्वैरसंचार करतात. **डॉ० केतकरां**च्या या ह्मणण्यास त्यांचे स्नेही प्रसिद्ध मराठी लेखक रा० **बाळाभाऊ गडकरी** यांनीं कांहीं महिन्यापूर्वीच्या **वागीश्वरी**च्या अंकांत सप्रमाण खोडून काढलें आहे. त्यांतील विचारसरणी डॉ० मजकुरांस पूर्वी न सुचण्याइतकी व अजूनही कदाचित् न पटण्याइतकी मोठी गहन आहे, असें नाहीं. परंतु मुद्दाम पांघरलेल्या वेडावर उपाय काय? असो. अशा दृष्टीनें जातीभेदामुळें आणि वर्णभेदामुळें एकी अडून राहिली, असें ह्मणावें तर त्याच्या उलट असें आढळतें कीं, कित्येक महत्वाच्या प्रसंगीं निरनिराळ्या जातीचे लोकही एखाद्या विचारानें एकत्र होऊन, एखादें मोठें काम करूं शकतात. अगदीं आजकालची कायदेभंगाची चळवळ जरी घेतली, तरी असें आढळून येतें कीं, आपापल्या जातीचें विशिष्टत्व न सोडतां, सर्व जातीच्या लोकांनीं तिच्यांत एक दिलानें भाग घेतला, व चढाओढीनें ती रेटून नेली. परकी लोकांचे इतिहास व समाज-रचना या पाहिल्या,

तरीही हेंच आढळून येतें. ग्रीक लोकांत वर्णभेद नव्हता, व जाज्वल्य देशाभिमान होता. तरी देखील असें दिसून येतें कीं वेळोवेळीं त्यांचा नाश नीच स्वार्थास बळी पडून, त्यांच्यांतल्या ग्रीक लोकांनींच केला. रोमन साम्राज्याचाही हाच इतिहास आहे, व केवळ एकवर्णी असलेल्या मुसलमान राष्ट्रासही सूक्ष्मरीतीनें पाहिलें तर अपवादांत काढतां येणार नाहीं. याच्या उलट इलिझाबेथ राणीच्या वेळीं आपल्याकडील वर्णभेदापेक्षांही अतीशय तीव्र असे धार्मिक मतभेद असतां राष्ट्रीय आपत्तीच्या वेळीं ते सर्व मिटून सर्वांनीं एकदिलानें परचक्राचा प्रतिकार केला. अगदीं एकत्र खाण्यापिण्याचीही गोष्ट घेतली, तरी देखील त्यासंबंधाचे तीव्र भेद खुद्द आज या विसाव्या शतकांतही प्रत्येक युरोपियन राष्ट्रांत आहेत. थोडा प्रकार वेगळा, एवढेंच. यासंबंधीं लेखकाचा स्वतःचा एक लहानसा अनुभव विचार करण्याजोगता आहे. एकदां एका व्यापारी स्नेह्याच्या येथें लेखक बसला असतां त्या स्नेह्याकडे एक युरोपियन गृहस्थ आला. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें ढुंगणास एक पंचा, अंगावर कांहीं नाहीं, केस वाढलेले, अशा गबाळ मूर्तीस तेथें बसलेलें पाहून, हा कोण प्राणी, ह्मणून त्यानें इंग्लिशमध्यें प्रश्न केला. त्या प्राण्यास आपला प्रश्न समजेल असें त्याच्या स्वप्नींही आलें नाही. आमच्या स्नेह्यानें विनोदानें ' हे भटजी आहेत ' ( Priest ) ह्मणून सांगितलें. त्या वेळेला कांहीं फळें खाणें चाललें होतें. भटजी आहे, असें ऐकून साहेब मोठ्या गंभीरतेनें ह्मणाला– ' Your system has got this advantage; this poor priest can dine with Sir Moro at the same table, while it is not so with us. I cannot dine with Sir Sly.

( ही तुमच्यांत मोठी सोय आहे, हे गरीब भटजी सर मोरोपंत जोशी यांच्या पाटशीं पाट लावून जेऊं शकतील; पण आमच्यांत मात्र असें नाहीं. मला कांहीं सर स्लाय यांच्या बरोबर जेवतां येणार नाहीं. )

या वेळेला सर मोरोपंत जोशी हे होम मेंबर होते, त्याला अनुलक्षूनच हे शब्द त्यांनीं उच्चारले होते. ही एक क्षुल्लक गोष्ट आहे, व एका व्यक्तीवरून सबंध राष्ट्रासंबंधानें अनुमान करणें अगदींच बरोबर आहे, असें नाहीं. तरीपण शितावरून भाताची परीक्षा होते, हे खरें. खाण्यापिण्यासंबंधीं असे आर्थिक व काम पडल्यास प्रादेशिक भेद युरोपमध्यें फार तीव्र आहेत, असा निर्विवाद अनुभव आहे. एखाद्या प्रसंगीं मुद्दाम तें विसरल्यासारखें करून विश्वकुटुंबित्वाचा नाटकी

देखावा जरी होत असला, तरी भेद अंतःकरणांत इकडल्याप्रमाणेंच तीव्र असतात, व काम पडल्यास त्याचे दुष्परिणामही अतिशय तीव्र होतात. राजकीय भेद तर अतिशय तीव्र असून माणसामाणसांत, केवळ ते अमुक देशाचे ह्मणून ऐतिहासिक परंपरेनें वैर चालत आलेले आहे. त्याचे दुष्परिणाम होतात किंवा नाहीं, हें हिंदुस्थानांतील बंदिस्त वातावरणांत कळण्यास देखील साधन नाहीं. त्यांच्या देशाचें व राष्ट्राचें राजकीय आस्तित्व कायम ठेवण्याकरितां किती कायद्यांचीं नियंत्रणें केलेलीं असतात, व आर्थिकदृष्ट्या झालेले उच्च नीच भेद किती सूक्ष्मतेनें पाळण्यांत येतात, हें पाहिलें ह्मणजे या हिंदुस्थानांतील विश्वबंधुत्व सहभोजनावांचून अडून राहिलें आहे, या ओरडीचें हंसूं आल्याखेरीज राहत नाहीं. राजनीतीच्या कौटिल्यांत अशीं ओरड होणें व तिला सर्व तऱ्हेनें उचलून धरलें जाणें, हें अगदीं साहजिक आहे. परंतु आमच्यांतील विचारवान माणसांनाही जेव्हां तें अतिशयच अवश्य आणि सत्य वाटुं लागतें, तेव्हां मात्र दास्यदुर्बल मनोवृत्तीचा आचंबा वाटतो. असो. सारांश इतकाच कीं मनुष्यस्वभाव हा जोंपर्यंत आहे असा आहे, तोंपर्यंत खरें बंधुत्व, खरें प्रेम, खरी समता, व खरें स्वातंत्र्य हें सर्व लोकांमध्यें परिपूर्ण होऊन एकी होणें, हें अशक्यच आहे. जोपर्यंत मनुष्याचा स्वभाव सुखलोलुप आहे, जोपर्यंत त्याला महत्वाकांक्षा आणि स्वार्थही आहेत, जोंपर्यंत दुसऱ्या माणसाच्या कल्याणांत आपलें कल्याण आहे इतकें वाटण्याइतकी मानवी बुद्धि सर्वसहा उदात्त झाली नाहीं, तोंपर्यंत विषमता, स्वार्थमूलक अधमपणा, राग, द्वेष, मानापमान, विश्वासघात, सूड—इत्यादि सारे समंध जगामध्यें स्वैरपणानें संचार करणारच, व परिपूर्ण समता, स्वातंत्र्य, बंधुता हीं सारीं मनोराज्येंच राहणार. अशा स्थितींत समाजाचें एकंदर धोरण अधमपणाकडे जास्त न राहतां उदात्तपणाकडे राहील, अशी व्यवस्था करणें व वेळोवेळीं कांहीं एका विशिष्ट सूत्रांत माणसांना आणून आणि या सर्व गोष्टींच्या तात्पुरत्या आभासानें एकीच्या एका सूत्रांत त्यांना घालून पुढें असलेलें समाजहित करून येणें, एवढेंच काय तें शक्य असतें. युरोपियन लोकांत देखील या गोष्टी असल्याचें जें भासतें, तो देखील एक प्रकारचा अभासच आहे. फक्त त्याच्यामुळें व्यक्तीचें जीवन जास्त दुःखमय होणार नाहीं, स्वातंत्र्याच्या तो फारसा आड येऊं शकणार नाहीं, एवढीच गोष्ट विशिष्ट प्रकारच्या शिक्षणाच्या सांधनांनीं व परंपरांनीं तिकडच्या लोकांनीं साधल्यासारखी दिसत आहे. शिक्षणासंबंधानें फ्रेंच लेखक व्हिक्टर ह्युगो यानें एके ठिकाणीं असे

लिहिलें आहे कीं " Social education carefully attended to, can always draw out of a soul, no matter its nature, the usefulness, which it contains. "

( जीवाचा स्वभाव कसाही असो जर त्यास व्यावहारीकरीत्या सुशिक्षित करण्याचा प्रयत्न केला तर निदान त्याची उपयुक्तता तरी वाढतें हें खास. )

युरोपांतील सर्व प्रकारच्या शिक्षणशास्त्रांचें सामान्य धोरण पाहिलें तर तें या सूत्रांत बसतें. आणि आमच्याकडीलही नवीन तऱ्हेनें हा विषय मांडूं पाहणारे लोक तोंडानें जरी नैतिक उन्नति, आत्मिक उन्नति वगैरे मोठमोठे शद्ब वापरीत असले तरी त्यांच्या सर्व शिक्षण-प्रक्रियेचें धोरण या सूत्राप्रमाणें असावें, असें वाटतें. यांतील—no matter its nature—हे शद्ब फार महत्वाचे आहेत. आणि आह्मांस असें वाटतें कीं या nature बद्दल कांहीं काळ जरी no matter असें ह्मणून भागलें, तरी तसें अखंड न चालतां तो nature आज नाहीं उद्यां आपलें डोकें वर काढून, युरोपियन संस्कृतीची डौलांत चाललेली होडी उलटीपालटी केल्याखेरीज राहणार नाहीं.

सारांश गोष्ट इतकीच कीं, जोपर्यंत समाजांत भाऊ भावाचें तोंड पाहूं शकत नाहीं, अशी स्थिति उत्पन्न होते आहे, तोंपर्यंत सर्वप्रकारचे भेद हे राहावयाचेच. ते राहतात इतकेंच नाहीं तर कित्येक भेद इष्ट ह्मणून मोठ्या कसोशीनें सांभाळले जातात व वाढविले जातात. एवढेंच कीं ज्याला ज्या गोष्टीचें महत्व जास्त वाटतें, त्या दृष्टीनें तो हे भेद राखूं पाहतो, व त्याच्या आड येणाऱ्या अथवा त्याच्याशीं संबंध नसणाऱ्या इतर कारणांनीं होणाऱ्या भेदांस नाक मुरडून वाईट म्हणतो. * स्थितींत अशा हिंदुस्थानचें राजकारण सुरू करण्यास अवश्य वाटत असलेली मनोरम ( idealistic ) एकी घडून येणें केव्हांही अशक्य आहे. व जेव्हां केव्हां काम होईल तेव्हां, या नाहीं त्या तऱ्हेचे हे सारे भेद असेच राहून इतकेंच नाहीं तर, अशा तीव्रतेनेंच राहून एखाद्या सामान्य सूत्रांत सर्व लोकांस गुंतवूनच तें करावें लागेल. तेव्हां असलेल्या भेदांस शिव्या देऊन त्यांच्या माथीं सारें खापर फोडणें, व

---

* यांचें मजेदार उदाहरण बॅ० सावरकर यांचें आहे. जिवंत माणसांच्या रक्ताची शुद्धता ह्मटली कीं त्यांचें पोटांत ढवळून येतें. पण त्यांच्या मानानें केवळ मृत अशा शद्बांच्या शुद्धतेची कोण तळमळ त्यांना !

दुसरे भेद स्वतः त्याचवेळीं निर्माण करणें, हें बाजारच्या बायका ज्याप्रमाणें एक-मेकींना शिव्या देऊन एकीमेकीपुढें आपला उच्चनीचपणा आपल्या याराच्या जातीवरून मिरवूं पाहतात, त्याच तऱ्हेचें आहे.

अशा प्रकारें सर्व प्रकारचे तीव्र भेद, विषमता, उच्चनीचभाव, मत्सर, द्वेष, तिरस्कार वगैरे विकार, व खाण्यापिण्यासारख्याच तर काय, पण त्याहीपेक्षां क्षुल्लक गोष्टीपासून परस्परांस तुच्छ लेखण्याची प्रवृत्ति, या सर्व गोष्टी, वेगळ्या तत्वावर कां होईना, पण आमच्या इकडल्या प्रमाणेंच असतां, मुसलमान व इतर लोकांत 'वयं पंचाधिकं शतम्' अशी जी प्रवृत्ति दिसते, तिचं कारण काय, असा सहजच प्रश्न पडतो. केवळ सहभोजनानें अथवा एक बायबल, एक कुराण, अशा तऱ्हेची व्यवस्था असल्यानेंच तशी प्रवृत्ति दिसून येते, असें ह्मणावें, तर मोंगलाईच्या पडत्या काळांतील मुसलमानांत असें असूनही त्या वेळीं 'वयं पंचाधिकं'चें फारसें महत्व नव्हतें, असें दिसतें. तसें जर असतें, तर हिंदुपदपादशाही ही केवळ अशक्यच गोष्ट झाली असती. हिंदुस्थानच्या बाहेरील्ही मुसलमानी इतिहासाचें परीक्षण केलें, तरी देखील असें आढळून येतें कीं, ज्या गोष्टींकरितां एकी अडून बसली आहे, अशी आजकाल ओरड करण्यांत येते, त्या सर्व असूनही 'वयं पंचाधिकं' ही तेजस्वी ज्योत मुसलमानांत त्यावेळीं मालवून गेली होती, ह्मणूनच जिकडे तिकडे त्यांचें साम्राज्य संपुष्टांत आलें होतें. बरें, आजही मुसलमान, युरोपियन्स, जपानीज, वगैरे लोकांमध्यें जी या तत्वावरील संघशक्ति दिसून येते, तिचें मूलतत्व शोधूं गेलें असतां, असेंच आढळून येतें कीं तिच्या मुळाशीं प्रेम, बंधुत्व—असल्या तऱ्हेच्या कोणत्याही कोमल मनोवृत्ति नसून united we stand divided we fall या एका व्यावहारिक सत्याची उत्कृष्ट जाणीवच दिसून येते. तेव्हां आमच्याकडे देखील सर्व प्रकारच्या सामाजिक विलक्षणपणांना तिलांजलि देण्यावरच एकीचें गाडें कां अडून बसावें, हें पाहिलें पाहिजे.

एका इंग्लिश कवीची एक लहानशी कविता आहे. तिच्यांतील विषय असा आहे कीं एका रात्रीं बर्फाचें भयंकर वादळ सुटलें असतां त्यांत सांपडलेला कवि आपला बचाव व्हावा ह्मणून एका छोट्या गुहेंत शिरला. एक भयंकर लांडगाहि तशाच आपत्तींत सांपडून त्याच हेतूनें तेथें आला; आणि त्या ठिकाणीं त्या दोघांनींही ती रात्र अगदीं शांतपणें एकत्र घालविली. सकाळ झाल्यावर त्या कवीकडे नुसती नजरही न टाकतां तो लांडगा आल्यावाटेनें चालता झाला.

आह्मांस असें वाटतें कीं इतर सर्व समाजांत जें हें ' वयं पंचाधिकं 'चें तत्व दिसून येतें, व ज्याचा आमच्यांत अभाव आहे ह्मणून आमची अशी दैना झाली आहे, त्याच्या मुळाशीं हेंच रहस्य असावें. मनुष्यप्राण्याचें जर सूक्ष्म निरीक्षण केलें, तर असें दिसून येतें कीं, त्यांची एकी नेहमीं तीन कारणांकरितां घडून येते, व त्यांच्याचकरितां ती टिकतेही. मानवी एकीची अति उच्च अवस्था ह्मणजे समाजघटक जो मनुष्य त्याची सर्वसाधारण संस्कृतीतच इतकी उच्च असावयाची कीं सर्व प्रकारच्या क्षुद्र मनोवृत्तींची त्याला सहज किळस असावी. त्यांच्या आहारीं जाणें हें आपल्या मनुष्यत्वाला कमीपणा आणणारें आहे, ती एक लाजिरवाणी गोष्ट आहे, असें त्यांस निर्व्याजपणें वाटत असावें. अशा तऱ्हेची समाजांतील स्थिति समाजाच्या आयुष्यक्रमांत थोडा काळ आल्यासारखी केव्हां केव्हां दिसतेही. परंतु ती मनुष्यस्वभावाची नित्यप्रकृति नाहीं. आणि असें दिसून येतें कीं अनेक प्रकारानें कष्ट करून ऊर्जितावस्थेंत आलेल्या समाजाला जणुं काय त्या कष्टाचें फळ ह्मणून ती प्राप्त होते. अर्थात् मनुष्यस्वभावासंबंधानें सर्व साधारण नियम पाहतां अशी स्थिति ह्मणजे केव्हांही एक ध्येयवस्तूच असते. सर्वसाधारण लोकांच्या करितां असाच नियम दिसतो कीं त्यांची एकी सर्वसामान्य अशा लाभाकरितां, ह्मणजे लोभमूलक, व सर्वसामान्य अशी आपत्ति टाळण्याकरितां, अशी दोन प्रकारचीच असते. आजही हिंदुस्थानामध्यें मुसलमान लोकांत संघटनेचें जें वारें दिसून येतें व तिचा जो बळकटपणा दिसतो, त्याच्या मुळाशीं इस्लामी तत्वावरील असलेला जिवंत विश्वास अथवा आध्यात्मिक जीवनाची कळकळ यांच्यापेक्षां, जगांतील एकंदर घडामोडीमुळें हिंदुस्थानचें सारेंच डबोलें स्वतःच्या ढुंगणाखालीं घालावयास सांपडेल अशा आशेनें तोंडास सुटलेलें पाणीच जास्त दिसून येतें.

आजकाल नवीन चळवळीच्यामुळें जगांतील एकंदर राजकीय घडामोडीचें स्वरूप, व त्याचबरोबर त्यांतील हिंदु लोकांचें स्थान आणि त्यांचे लाभालाभ यांचें उत्तम ज्ञान समाजांतील सर्व थरांत चांगलेंच पसरलेलें आहे. असें असतां मुसलमान समाजाप्रमाणेंच हिंदु समाजांतही संघटनेस बळ कां चढूं नये? हा प्रश्नही विचार करण्याजोगता आहे.

' बहूनामप्यसाराणां समवायोहि दुष्करः ' ही सुक्ति तर सर्वांच्या नेहमीच तोंडांत खेळणारी आहे. अगदींच विसविशीत दिसणाऱ्या कापसाच्या धाग्यापासूनच मोठमोठाल्या बंधनरज्जु तयार होतात हें खरें. परंतु असें व्हावयास तो

कापसाचा पहिला धागा मुळांत पीळ घातलेला असावा लागतो. अशा तऱ्हेचे पीळ नसलेले कापसाचे कितीही धागे एकत्र करून त्यांचें एक जुडगें बनविलें ह्मणून काय व्हावयाचें आहे? त्याचप्रमाणें एकीचीही गोष्ट आहे. लाभालाभांच्या उत्तम जाणिवेमुळें एकीचे थाट आमच्यांतही दिसून येतातच, आणि ते सर्व कांहीं खोटे असतात, असें नाहीं. कायदेभंगाची चळवळ निघाल्याबरोबर साठ हजार लोक मोठ्या आनंदानें तुरुंगांत गेले व बायाबापड्या देखील राष्ट्रीय निशाणाखालीं पोलिसांच्या लाठीमारानें आपलीं डोकीं फोडून घ्यावयास तयार झाल्या, तें काय एकीचें महत्व कळल्याखेरीज? परंतु किती झालें तरी तें संभूयसमुत्थान ( mob-instinct ) आहे. अशा उत्थानामध्यें एकमेकांकडे पाहून एकमेकाचें बळ चढत असतें. अशा उत्थानानें साहसाची मोठालीं कामेंही साधतात. परंतु त्याबरोबरच हेंही खरें आहे कीं अशा उत्थानांतील आवेशाचें आयुष्य नेहमींच अल्पकाळ टिकणारें असतें. असल्या प्रयत्नांनीं एकादा गड घ्यावयाचें काम जरी साधलें, तरी राष्ट्ररूपी शरिराच्या प्रत्येक कणाची ताकद वाढवून त्याला वज्राप्रमाणें कणखर व निरोगी करण्याचें काम त्याच्याच्यानें होत नाहीं. परंतु असल्या लहानशा अनुभवावरून असें दिसून येतें कीं माणसास जर अशा प्रकारच्या सामान्य लाभालाभाचें ज्ञान झालें, ( Common gain and common danger ) तर त्याकरितां कोणतेही भेद आड न येऊं देतां, व सामाजिक भिन्नता तात्पुरती विसरून जाऊन ह्मणजे ती सहन करूनही, तो मागें दिलेल्या निग्रो पुढाऱ्याप्रमाणें—" In all things which are purely social, we can be as separate as the fingers yet one in the hand, essential to mutual progress"— असें मनापासून ह्मणतो. असें असतां व याचा वरीलप्रमाणें प्रत्यक्ष अनुभव असतां जाति व स्पृश्यास्पृश्यता वगैरे अजून देखील राष्ट्रहिताच्या आड येतातच !

कोणत्याही परकी राज्यकर्त्यांचें व इंग्लिश सरकारचे तर त्यांतल्यात्यांत विशेषतः असें धोरण असतें कीं प्रजेंतील सर्व लोकांना, त्यांच्यांत असलेल्या भेदांचा फायदा घेऊन व नसतील ते नवीन निर्माण करून वेगळे वेगळे करून ठेवावयाचे. कांहींही झालें तरी त्यांना common danger, आणि common gain ह्मणून भासूं द्यावयाचें नाहीं. अशा स्थितींत common dangerची जरी जाणीव झाली तरी सर्व समाजाची एकतानता व्हावयास तें भय फारच मोठें असावें लागतें. व अगदींच डोळ्यांसमोर येऊन उभें रहावें लागतें.

तेव्हां कोठें मनुष्य सर्वस्वावर उदार होऊन भित्र्याचा शूर व क्षुद्राचा संत बनतो. परंतु अशा प्रकारचें भय समाजांतील कोणत्याही एका वर्गास भासूं न देण्याची सरकार नेहमींच काळजी घेत असतें. कोणत्याही एका वर्गाच्या कंठीं प्राण न येऊं देतां त्याला निस्त्राण करण्याचें काम पद्धतशीरपणानें इतकें हळूं हळूं चाललें असतें कीं, तें कोणासच जाणवत नाहीं. अशा स्थितीमध्यें हा उपाय परावलंबी पडतो. बरें, लाभाच्या जाणिवेनें एकी उत्पन्न करावी असें ह्मटलें, तर त्याला दुसरी अडचण येते. ती आपण वर कापसाच्या व पिळाच्या उदाहरणानें पाहिली. अशा स्थिती-मध्यें कोणत्याही एकाच उपायानें हमाखास काम होईल असें कोणास सांगतां यावयाचें नाहीं. ती गोष्ट पुष्कळ अंशीं ‘ दैवं चैवात्र पंचमम् ’ अशा अघटित घटनेवरच अवलंबून राहते. तों पर्यंत कोणाही काय कार्यकर्त्यास एकच गोष्ठ करणें जरूर असतें; आणि ती गोष्ट ही कीं राष्ट्राचा घटक परमाणु जी व्यक्ति ती कशीही असो—ह्मणजे कोणत्याही मताची असो—परंतु त्या असार धाग्याला कांहीं तरी युक्तीनें, कांहींही झालें तरी तुटणार नाहीं असा बळकट पीळ घालून ठेवणें. निवळ मनुष्य जेलमध्यें जावयास तयार होणें, अथवा छातीठोकपणानें गोळीपुढें जाऊन उभें राहणें. हीं कामें अत्यंत साहसाचीं तर खरींच, परंतु त्याच्या बरोबरच विशिष्ट संस्काराचा पीळही असला पाहिजे, आणि तोही अशा तऱ्हेचा पाहिजे कीं, खाण्या-पिण्यासारख्या अगदीं क्षुल्लक गोष्टीपासून तों प्रायोपवेशनापर्यंत मोठमोठाल्या गोष्टीं-पर्यंत शरीराच्या कणाकणांतून तोच नाद निघाला पाहिजे. हें लिहिणें जास्त अतिरे-काचें व Idealistic वाटेल. कारण कित्येक लोकांची तर अशी समजुत आहे कीं कार्याकरितां वाटेल तें साहस करण्याची तयारी असली ह्मणजे पुरे आहे, माणसा-च्या खाजगी जीवनक्रमाशीं काय दरावयाचें आहे? या ठिकाणीं आह्मी मुद्दाम ‘ त्याग ’ शद्ब न वापरतां साहस शद्ब वापरला आहे. त्याचा हेतु असा आहे कीं या दोहोंत जो महत्वाचा फरक आहे, तो लक्षांत यावा. साहसांत देखील त्याग-बुद्धि आहेच; अत्याचारानें कां होईना, परंतु एकाद्या पुढाऱ्यास मारणाऱ्या सॉंडर्स सारख्याचा खून करून, मानेभोंवतीं आंवळलेल्या फासांत देखील हंसत राहणें, हें काय सर्वस्वावर उदार झाल्याशिवाय होतें? परंतु अशा प्रकारचा साहसी त्याग व राज्य आणि राष्ट्र यांच्याकरितां लागणारा त्याग यांच्यामध्यें महदंतर आहे. दुसऱ्याकरितां आनंदानें वधस्तंभावर चढणाऱ्या **सिडने कार्टन**च्या औदार्याबद्दल कोणासही आदरच वाटेल. व निदान तेवढा त्याग तरी करून माणसानें एका क्षणानें

सारें आयुष्य पावन करावयास तयार असलें पाहिजे, हें खरें. परंतु त्याचबरोबर हेंही खरें कीं प्राण अर्पण करणाऱ्या **सिडने कार्टनला** आपली हृदयाची व्यथा व दारू ही कांहीं सोडून देतां आली नाहीं. साहसाचा त्याग हा एकमुखी असतो, व ज्याला वर आह्मीं त्याग ह्मटलें हा सर्वतोमुखी आहे. अशा सर्वतोमुखी त्यागाची गरज राष्ट्राला अतिशय असते, या विषयीं पाश्चात्य राष्ट्रांत देखील आतां पुष्कळांस खात्री पटूं लागली आहे. सुप्रसिद्ध रशियन पुढारी **टॉट्स्की** यानें असें ह्मटलें आहे कीं, ' Not only the public activities of the individual member, are important for the party, but his private life as well. This is an indisputable fact; the more so, in that the conditions of the individual life are reflected in a man's public activities. The question is how to react on the individual life.'

(केवळ व्यक्तीच्या सार्वजनीक कर्तृत्वाचीच सांप्रदायास गरज असतें असें नाहीं, तर त्याच्या खाजगी जीवनक्रमाचीही तितकीच गरज असते, ही गोष्ट आतां निर्विवादपणें ठरली आहे. कारण, कांहींही झालें तरी मनुष्याच्या खाजगी जीवनक्रमाचा ठसा त्याच्या सार्वजनीक जीवनांत उमटल्याखेरीज रहात नाहीं. प्रश्न पडतो तो हाच कीं सार्वजनीक जीवनक्रमानें खाजगी चारित्र्यास वळण कसें लावावें.)

असो. तात्पर्य इतकेंच कीं सध्यांच्या काळांत पहिली गोष्ट कोणत्याही संस्कारानें कां होईना परंतु आह्मीं वर सांगितल्याप्रमाणें व्यक्ति जेणेंकरून पिळदार होईल ती. त्यानंतर माणूस या नात्यानें त्याची संस्कृति आह्मी एकीचा तिसरा मार्ग जो मनुष्यपणाची परिपूर्णता ह्मणून सांगितला, त्याला अनुसरून उत्तरोत्तर पूर्ण कशी होईल तें. या दोन गोष्टी ज्याला जशा साधतील तशा घडवून आणणें हेंच आजकाल पहिलें कर्तव्य होऊन बसलें आहे. कारण वरील सर्व विवेचनाकरून लक्षांत येईलच कीं सर्व तऱ्हेची उन्नती जिच्याकरितां आडून राहिली आहे ती एकी, समाजांत केंव्हां-ही या नाहीं त्या रूपानें असणारच असल्या अनेक प्रकारच्या विषमतेनें अडत नसून तेजहीनतेनें व सर्वोमिळती व्यक्ती हें विसरून गेल्यानें, आणि कोणीकडून तरी एक-ट्याच्या सुखानें संतुष्ट होण्याच्या निलाजऱ्या स्वभावानें अडून राहते. ज्या वयांत खरा मनुष्य तयार होतो, त्या वयांत त्याला सर्वप्रकारें पिळदार करण्याची मुद्दाम कसोशी केल्यानें पहिला दोष नाहींसा होतो, व मनुष्य या नात्यानें त्याची अंतः

संस्कृति—ही अर्थातच बाह्यनिरपेक्ष असली पाहिजे—वाढविण्याचा प्रयत्न केल्यानें दुसरा दोष नाहींसा होतो. सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें असतां असें लक्षांत येईल कीं, जरी हे दोष वेगळे वेगळे दिसले, तरी वस्तुतः ते एका तेजहीनतेचेच पर्याय आहेत,

मराठेशाहीच्या शतसांवत्सरिक श्राद्धानिमित्त केसरीचे संपादक रा. केळकर यांनीं लिहिलेल्या ' इंग्रज व मराठे ' या सुंदर ग्रंथांत मराठेशाहीच्या ऱ्हासाची मीमांसा केली आहे. तिचा निष्कर्ष ह्मणून रा. खरे या सुप्रसिद्ध इतिहास-भक्तानें तिला जी प्रस्तावना जोडली आहे, तिच्यांत देखील सर्वांचें तात्पर्य हेंच काढलें आहे. सर्वप्रकारचे गुण अंगीं असून देखील, केवळ एकराष्ट्रीयत्व या भावनेच्या अभावामुळें मराठेशाही बुडाली, असा त्या विवेचनाचा सिद्धांत आहे, आणि तो बहुतेक सर्वमान्य झाल्यासारखाच आहे. मराठेशाहीच तर काय, परंतु जगांतील एकंदर राष्ट्रांचे उदयास्त व उत्कर्षापकर्ष यांचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचा उदय आणि तिचा नाश, हींच त्यांचीं खरीं कारणें होत. त्याप्रमाणें 'मराठेशाही' ही भावना क्षणभर उत्पन्न झाल्यासारखी होऊन पुन्हां नष्ट झाली, व त्यामुळें मराठ्यांचा उदयास्त झाला, याविषयीं वाद नाहीं. तिच्या मागें जाऊन एकंदर हिंदुस्थानच्या वीस पंचवीस शतकांच्या इतिहासाचें अवलोकन केलें, व छोट्याशा मराठेशाहीचा प्रश्न सोडून एकंदर हिंदु राष्ट्राच्या उदयास्ताची व हिंदु संस्कृतीच्या अथवा आर्यसंस्कृतीच्या उत्कर्षापकर्षाची मीमांसा केली, तरी त्याचा निष्कर्ष एक राष्ट्रीयत्वाची भावनाच नष्ट झाली होती, असाच निर्विवाद निघतो. आतां, हें एकराष्ट्रीयत्व कशामुळें नष्ट झालें हाही विचाराचाच प्रश्न आहे. आमच्या समजुतीप्रमाणें मराठेशाहीच्या ऱ्हासाप्रमाणेंच ती स्वाभाविकपणें घडलेली गोष्ट आहे. तसें घडणें हें स्वाभाविक होतें, हें मागील प्रकरणांत दिलेल्या मराठेशाहीच्या ऱ्हासाच्या मीमांसेवरून लक्षांत येईल. मात्र इतकेंच कीं, मनुष्य प्रयत्नानें ही स्वाभाविक गोष्ट पालटतां आली असती. त्या उदाहरणांत सांगितल्याप्रमाणेंच दिवाळखोर कोट्याधीशाप्रमाणें समाज डोळे मिटून बसला; त्याला काय उपाय ? स्वाभाविक गोष्ट होती, परतु अनिवार नव्हती. असें असतां या उत्कर्षापकर्षाची मीमांसा इतर कांहीं रीतीनें करणाऱ्या विद्वानांचा एक वर्ग आहे. त्यांच्या विचाराची सामान्य दिशा रा. महादेवशास्त्री दिवेकर यांच्या ' आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष ' या ग्रंथावरून समजून येते. हें पुस्तक जरी शास्त्रीबोवांच्या नांवावर असलें, व त्यांतील सर्व विचारसरणी त्यांना पूर्णपणें मान्य असली, तरी वस्तुतः

ज्ञानकोशकार, इतिहासाचार्य राजवाडे, भारताचार्य वैद्य इ० लेखकांच्या लेखांच्या अगदीं शद्बशः नसला तरी, सारांशानें हा एकत्र केलेला संग्रहच आहे. एवढ्या छोट्याशा पुस्तकांत एकत्रित केलेल्या एवढ्या मोठमोठ्या पंडितांच्या केवळ सिद्धांताचेच परीक्षण करावयाचें म्हणजे त्याला जवळजवळ तेवढाच ग्रंथच लिहिला पांहिजे आणि, तितकीच विद्वत्ता आणि व्यासंग पाहिजे. मजसारख्या केवळ जिज्ञासूचें तें काम नव्हे. तरी पण त्या पुस्तकाचा विषयच असा आहे कीं, त्यासंबंधीं अगदीं ठळक अशा कांहीं शंका प्रगट केल्याखेरीज आमच्या विषयाची पूर्तता होत नाहीं, ह्मणून थोडक्यांत तसें करून पुढें जाणें भाग आहे. निर्भिडपणाबद्दल रा. दिवेकर शास्त्री यांची आह्मीं क्षमा मागतो. या पुस्तकांत उत्कर्षाचें प्रथमतः अनेक ग्रंथांच्या आधारें वर्णन केलें आहे. अर्थात् त्याविषयीं कांहीं वाद असण्याचें कारण नाहीं. त्यानंतर, अपकर्षाचें वर्णन देऊन त्याचीं अनेक कारणें दाखविलीं आहेत; आणि त्या सर्वांचा समन्वय एका बुद्धधर्माच्या उदयांत व प्रसारांत केला आहे. असें करतांना मुख्य खुबी अशी ठेवली आहे कीं, मागील प्रकरणाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें, धर्माच्या पांघरूणाखालीं राजकीय तत्वावर संस्कृती-करणाची भाषा बोलूं पाहणाऱ्या, वस्तुतः नास्तिक अथवा विशिष्ट तऱ्हेनें आस्तिक अशा लोकांना नाडणाऱ्या ज्या जातिसंस्था, स्त्रीजात, विवाहसंस्था, खाद्यापेय विचार आणि स्पृश्यास्पृश्यता या मुख्य पांच गोष्टी-त्यांच्या माथीं सर्व अवनतीचें खापर प्रत्यक्षपणें फोडलें असून, त्या गोष्टी समाजांत रूढ होण्याचें कारण ह्मणून बौद्ध धर्मास जबाबदार धरलें आहे. याचा अर्थ असा आहे कीं, या गोष्टी नुसत्या अपायकारक आहेत, इतकेंच नव्हे, तर त्या तत्वतःच तुमच्या धर्मास विरुद्ध असून बुद्धधर्मानें तीं राष्ट्रशरीरांत टोंचलेलीं विषें आहेत. आतां, हें ह्मणणें सर्वांशीं खरें आहे किंवा कसें याचा विचार आतांपर्यंतच्या विवेचनावरून ज्यानें त्यानें ठरवावा. अशाप्रकारें बुद्धधर्माच्या माथीं सर्व दोष मारून आपला हेतु साधत असतां जीं कांहीं चमत्कारिक विधानें ग्रंथकर्त्यानें केलीं आहेत, त्यांचाच फक्त विचार आपणांस करावयाचा आहे, व ही विचारसरणी देखील परकीयांच्या पावलांवर पाऊल टाकून कशी आहे, हें पहावयाचें आहे. बुद्धधर्मानें वैदिक संस्कृतीच्या नाशीचीं बीजें रोविलीं याविषयीं वरील सर्व लेखकांचें व आमचें एकमत आहे. परंतु बुद्धधर्माच्या ज्या मूलतत्वानें हें काम केलें, असें त्यांचें ह्मणणें आहे त्याविषयीं वाद आहे. शास्त्रीबोवांनीं मुख्यतः बुद्धानें उत्पन्न केलेल्या अहिंसेवर फार जोर दिला आहे. व त्याला जोडून बुद्धानें

केलेला क्षणिकवाद, प्राकृत भाषेचा पुरस्कार, वर्णाश्रमांचा नाश, आणि त्यांच्या समजुतीप्रमाणें त्या धर्मांतून निघालेलें मूर्तिपूजेचें खूळ (!) यांस जबाबदार धरलें आहे. याचा अर्थ असा कीं, बुद्ध धर्मापूर्वी अहिंसेचें तत्व वैदिक धर्मास मान्य नसल्यामुळें चातुर्वर्ण्यसंस्थेतील प्रत्येकाचा वैश्वानर जणुं काय पूर्वी मांसाच्या गोळ्यानेंच शांत होत असे! बुद्ध आला, व असा चमत्कार झाला कीं अमेरिकेंतील दारूबंदीप्रमाणें अथवा चीनांतील अफूबंदीप्रमाणें जिकडे तिकडे एकदम हिंसा बंद होऊन माणसाचें शौर्य व क्रौर्य हीं सर्व एकदम नाहिंशी झालीं. तेव्हांपासून एखाद्या दीनदुबळ्या अबलेप्रमाणें भारतवर्ष फारसा प्रतिकार न करतां, प्रत्येक परकीयाच्या जुलुमास सहज मान वांकवीत आलें आहे; व अजून जरी त्यास शहाणे व्हावयाचें असेल तरी त्यास पुन्हां मांस खावयास शिकलें पाहिजे. आमच्या समजुतीप्रमाणें ही विचारसरणी चुकीची * आहे. आधीं मुळीं अहिंसा हें बुद्धाचें मूलतत्वच नव्हे. बुद्धाच्या अष्टांगांत दयेबरोबर अहिंसा सहजच येते, व स्वतः त्यानें यज्ञांतील बोकडाचा प्राण वांचविण्याकरितां स्वतःच बळी जाण्याचें पत्करल्याचें काव्य प्रसिद्ध आहे, हें खरें; परंतु अशा रीतीनें दयेची आवश्यकता व कांहीं विशिष्टपणानें बाधित अशी अहिंसा यांचा पुरस्कार इतर धर्मप्रवर्तकांनींही केला आहे. बुद्धाप्रमाणेंच दया आणि विश्वबंधुत्व यांचा पुरस्कार टोळ आंणि मासे खात खात जॉन व येशु ख्रिस्त यांनींही केला आहे. स्वतः गौतमबुद्ध हा मांस खाण्यानें उत्पन्न झालेल्या व्याधीनेंच मृत्यु पावला, हें सुप्रसिद्धच आहे. त्याच्या नंतरही विशेष प्रकारची धार्मिक अवस्था धरणाऱ्या बुद्धभिक्षूंनीं व राजे महाराजांनीं मांसाहाराचा अजिबात त्याग केला असला, तरीं तो 'निवृत्तमांसस्तु जनकः' या न्यायानेंच होय. अहिंसेचा जर खरा पुरस्कार कोणी केला असेल, व अहिंसा हें तत्व जर कोणत्या धर्माचा आद्य प्राण असेल, तर तो जैनांनीं व जैनधर्माचा. परंतु त्या धर्मा-

---

* या चुकीचें कारण महानुभाव लोकांत ज्याप्रमाणें गृहस्थ व संन्यासी असें दोन वर्ग आहेत त्याप्रमाणें बौद्धांतही दोन वर्ग होते व त्यांचे शीलनियम व तत्वज्ञान जरी सारखे असले तरी प्रयत्नशास्त्र व त्याच्या धोरणानें बसविलेल्या आचारपद्धती या वेगवेगळ्या होत्या हें कोण लक्षांत घेतो ? पुढील महायान पंथ गृहस्थ लोकांकरितां व त्यांच्या आचारविचार पद्धतींतूनच वाढला. बुद्धाचे स्वतःचे आदेश बहुशः भिक्षुसंघास उपयोगी पडतील असें आहेत.

मुळें अहिंसातत्व वैदिक धर्मांतून गेलें, असें कोणीही इतिहासकार बोलत नाहीं. याचें कारण इतकेंच कीं, युरोपियन पंडितांनीं एकदां जे बुद्ध व बुद्धधर्म यांस उचलून धरलें तें धरलें. असो. अहिंसा तत्वाच्या उत्पत्तीचा हा वाद बाजूस ठेवून मूळ प्रश्नाकडे आपण वळूं. आधीं एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हल्लींच्या राजकीय परिस्थितींत मांसाहारावांचून सारें अडलें आहे, असें ह्मणणें हें अगदींच व्यर्थ आहे. एकंदर हिंदुसमाजांत जैन व अगदीं निवृत्तमांस असे दक्षिणी ब्राह्मण हे जर सोडले, तर अठरावीस कोटी लोक तरी असे आहेत कीं, ज्यांना मांस खाण्याची पूर्ण मुभा आहे. व अशी स्थिती आतांपर्यंत पूर्वीं होतीही. तेव्हां केवळ एकदोन कोटी लोकांचा विचार न करतां या सर्व लोकांना वाटेल तितकें मांस खाऊं घालण्याची सोय करून मुसलमान व ख्रिस्त्री लोकांचें धाबें दणाणून सोडतां येईल. ब्राह्मण लोकांनींही जर जगावयाचें असेल तर या जीवनकलहांत मांस खाल्लेंच पाहिजे कीं काय, अथवा तसें न केल्यास, खांद्यावर बंदुक टाकून स्वातंत्र्याकरतां त्यांना लढतां येणार नाहीं कीं काय, हा प्रश्न केवळ ब्राह्मणजातीचा आहे. त्याचा ते विचार करतील. त्याच्याकरतां सबंध राष्ट्राचें गाडें अडण्याचें कारण नाहीं. परंतु प्रश्न असा आहे कीं, खरोखर मांस न खाल्ल्यामुळें पारतंत्र्य आलें कीं काय? बौद्धधर्मामुळें मांसाहार बंद पडला, यज्ञयागादिक नाहिंसे होऊन लोक केवळ निवृत्तिमार्गांत शिरलें, हें मत जसें कांहीं अगदीं ठाम ठरल्यासारखेंच झालें आहे, व त्यामुळें माणसांना दुर्बलता आली, आणि मुसलमान लोकांना हां हां ह्मणतां आंत यावयास सांपडलें, हेंही सिद्ध झाल्यासारखेंच आहे! परंतु शंका अशी येते कीं बौद्धधर्माची भरभराट अशी होती किती दिवस? * खुद्द गौतमबुद्धानंतर, दोनएकशें वर्षेंपर्यंत ह्मणजे चंद्रगुप्ताच्या साम्राज्यापर्यंत त्याची फारशी प्रतिष्ठा नव्हती. अशोकाबरोबर तो साम्राज्यपदावर चढला, व त्याच्या घराण्याबरोबरच खालींही पडला. परंतु अशोकाच्या पूर्वींच त्याची निवृत्तिपरता जाऊन सर्वप्रकारें हिंदुधर्माची नक्कल असलेला महायान पंथ प्रचलित झाला. महायान पंथाचा पुरस्कर्ता रहुलभद्र यास श्रीकृष्ण आणि गणेश यांच्या उपासना होत्या, असें तिबेट ग्रंथावरून दिसून येतें, ह्मणून लोकमान्यांनीं त्याचा आधारही गीतारहस्यांत घेतला आहे. अशा

* अशीच शंका सुप्रसिद्ध लेखक प्रो. गो. चि. भाटे यांनींही घेतलेली वाचल्याचें आठवतें.

स्थितींत बुद्धधर्माचें हिंदुधर्मावरील डोईजड प्राबल्य राहिलेंच किती दिवस ? तात्विकदृष्ट्या आचार्यांच्या ग्रंथांपर्यंत त्यांच्या मताचा अमल दिसून पडतो. परंतु तत्वज्ञानाशीं संबंध केव्हांही देशांतील मूठभर लोकांचाच असतो, व सामान्य जनतेमध्यें आचार व व्यवहार यांचेंच माहात्म्य असतें. महायानाच्या रूपानें जर बौद्धधर्मानें हिंदूंच्या प्रवृत्तिधर्माचेंच अनुकरण केलें असेल, तर त्या रीतीनें कां होईना, प्रवृत्तीला माहात्म्य आल्यामुळें राष्ट्राचें अकल्याण कां व्हावें ? अशोक व हर्षवर्धन यांच्यासारख्या कांहीं राजांनीं हिंसा न करण्याबद्दल शासनलेख केलेले आहेत. परंतु तेवढ्यांवरून सबंधराष्ट्र पिढ्यानूपिढ्या निवृत्तमांस झाल्याची इतिहास साक्ष देत नाहीं. बरें, भारतवर्षाचा ऐतिहासिक कालांतील उत्कर्ष पाहिला तर तो बुद्धानंतरच्या या हजार बाराशें वर्षांतलाच आहे. चंद्रगुप्त, नरेंद्र आणि चाणक्य यांचें साम्राज्य बुद्धानंतरच झालें. अशोक स्वतः देखील साम्राज्य मिळविण्याच्या काळांत वेदिकधर्मीच होता. नवरत्नांच्या सभेंत चमकणारा विक्रमादित्य, अश्वमेध करणारा पुष्यमित्र, ' विदुषां ध्यानपात्रं य एकः ' असा सर्वगुणसंपन्न समुद्रगुप्त, व त्याचें सर्वव्यापी साम्राज्य, ' चूडापुष्पोपहारैर्मिहिरकुलनृपेणार्चितंपादयुग्मम् ', अशी प्रौढी मिरविणारा प्रौढप्रताप यशोवर्धन, खखरातांना ' निरवशेष ' करणारा ' शकयवन पल्हव–निषूदन ' वासिष्ठीपुत्र, बाणाची अनुकंपा करणारा ' सर्वसत्वानुकंपी महेश्वर ' * हर्ष, त्याची रग जिरविणारा पृथ्वीवल्लभ सत्याश्रय पुलकेशी आणि उत्तरचीनापर्यंत साम्राज्य चालविणारा ललितादित्य–हे सर्वही प्रतापरुद्र बुद्धानंतरच्या काळांतच झाले. यांनीं आपलीं साम्राज्यें यक्षिणीच्या कांडीसरशीं मिळविलीं नसून शौर्यानें मिळविलीं होतीं. बरें, त्या काळामध्यें त्यांच्यापुढें सारा देशी मामलाच होता, असें नाहीं. शक, यवन, पल्हव वगैरे पूर्ण मांसाहारी लोकांशींच त्यांची गांठ होती. हूण लोकांच्या क्रूरतेला तर जगाच्या इतिहासांतही तोड सांपडणार नाहीं. अशा लोकांशीं प्रसंग करून मोठमोठीं साम्राज्यें या महापुरुषांनीं मिळविलीं, अश्वमेधासारखे यज्ञ केले, ते काय निर्वीर्य बनलेल्या लोकांच्या साह्यानें ? बरें, इतका सारा प्रकार एखाद्या सिनेमाच्या फिल्मप्रमाणें कांहीं चुटकीसरसा घडला असेंही

---

* हर्षही अशोकाप्रमाणें बुद्धानुयायी पुढें झाला. तीस वर्षें क्षात्रकर्मानें राज्यविस्तार करून संसाराच्या शेवटीं संन्यास घ्यावा तसा त्यानें बौद्धपणा घेतला.

नाहीं. हिंदुधर्मी राजांचे हे पराक्रम व त्याला अनुसरूनच त्यांच्या प्रजेची सर्व प्रकारची भरभराट, हीं टाकला बाजार आठ नऊशें वर्षें अव्याहत चाललीं होतीं. इतकेंच कीं, त्यावेळचा बारीक इतिहास उपलब्ध नाहीं. जर राष्ट्र अहिंसेच्या मागें लागून दुबळें, मूर्तिपूजेच्या मागें लागून खुळें आणि विटाळचंडाळ स्पर्शास्पर्श इत्यादिकांच्या मागें लागून लुळें झालें असतें, तर एक नव्हे, दोन नव्हे, शेंकडों वर्षें, हा नाहीं तो परकी शत्रू उरावर असतां असा उत्कर्ष सारखा कसा टिकला असता ? बरें, मुसलमान तरी बखत्यार खिलजीनें गौड जिंकला, त्याप्रमाणें आपले सरळ हिंदुस्थानांत उतरलें, व त्यांना हिंदु लोकांनीं एकेक घर निमूटपणें खालीं करून दिलें आहे, असेंही नाहीं. महमद कासीमच्या अनुभवानंतर गजनीच्या महमुदासारखा विशेष पराक्रमी माणुस होईपर्यंत मुसलमानांनीं जी हिंदुस्थानासंबंधीं उदासीनता धरल्यासारखी दिसते, तो काय त्यांना देवालच्या बुद्धभिक्षुंचा संसर्ग बाधला म्हणून ? गजनीच्या महमुदानेंही पांच पंचवीस वर्षें वाटेल तसा वाटमारेपणा केला, तरी त्याचीही हिंदुस्थानांत कायमचें चंबुगवाळें टाकण्याची छाती झाली नाहीं. त्यानंतरही शेंदोनशें वर्षांच्या राष्ट्रीय अधःपातानंतर शहाबुद्दीनास फावलें, व मग मात्र मुसलमान जिकडे तिकडे पसरले. परंतु ते देखील प्रत्येक ठिकाणीं रक्तपात होऊन, खून, विश्वासघात, असल्या निंद्य मार्गांनींच पसरले. अशा स्थितीमध्यें अहिंसेच्या कपाळीं सर्व अवनतीचें फोडलेलें खापर व मांसाशनावर सर्वस्वीं दिलेला भर, हा कितपत खरा असूं शकेल कोण जाणे ! याच्या उलट असें आढळतें कीं, हिंदुस्थानाप्रमाणेंच मुसलमानांनीं युरोप, मध्यआशिया, व चीन वगैरे देशही पादाक्रांत केले, व तेही त्यांना कांहीं सोपें गेलें, असें नाहीं. गजनीच्या महमुदावर फिदा झालेल्या गिबननेंच केलेलीं बाटूसारख्या मुसलमानांच्या पराक्रमाचीं वर्णनें, तितकींच हृदयंगम आहेत. त्या त्या देशांतले लोक, तर वाटेल तें मांस खाणारे होते. ख्रिस्ती संन्याशाचा वर्ग बाजूस ठेवला तर, बाकीच्या ख्रिश्चन समाजास निदान आठव्या शतकानंतर तरी निवृत्तीचें वारेंही नव्हतें, असें म्हणतां येईल. त्यांच्यांतही विटाळचंडाळाचें बंड नव्हतें, स्त्रीचा बाटलेला देह, शुद्ध होण्यास रजोदर्शनाचीही त्यांना आवश्यकता वाटत नव्हती, व जुलमानें केलेला संभोग हा संभोग नव्हे, इतकें मानण्याइतक्या त्यांच्या बायकाही पुढारलेल्या होत्या ! असें असून त्यांना मुसलमान लोकांपुढें हार कां खावी लागली ? अशा रीतीनें उलट बाजूनें विचार केला असतां या पुस्तकांतील अनेक विधानांच्या

सत्यतेची शंका येऊं लागते, व देशाच्या अवनतीची उपपत्ति त्यांच्यांवर बसवूं पाहणाऱ्यांच्या हेतूंविषयींही संशय येऊं लागतो. ज्या **राजवाड्यांनीं** ही उपपत्ति बसविली आहे, त्यांनींच राष्ट्राच्या जयापजयाचें खरें रहस्य कशांत आहे, तें **राधा-माधवाच्या** प्रस्तावनेंतच सांगितलें आहे; तें **दिवेकरशास्त्र्यांनीं** नजरेआड कां केलें ? **जनस्थानांतल्या** अनार्य राक्षसांना किंवा **वालीसारख्या** रानटी जातींना **दशरथी रामानें** कां जिंकलें ? तर दुरून बाण टाकण्याची कला त्याला अवगत होती म्हणून. **कॉन्स्टँटिनोपल** तुर्कांनीं कां घेतलें ? अथवा **तालीकोटची** लढाई दुर्दैवी **रामराजा** कां हरला ? तर मुसलमान लोकांचा तोफखाना श्रेष्ठ प्रतीचा होता म्हणून. **शहाजीराजानें** चारी पादशहातींना दहशत बसविली, ती उत्तम हत्यारांच्या जोरावर. युरोपियन लोकांनीं हां हां म्हणतां सारें जग पादक्रांत केलें तें उत्तम हत्यारांच्या जोरावरच. व पेशवाई कां बुडाली ? तर तेंही हत्याराच्या बाबतींत परकीयावर अवलंबून राहून मराठ्यांनीं आपणांस लंगडें करून घेतलें म्हणून. ही राष्ट्रांच्या विजयाची मीमांसा **राजवाड्यांनींच** केली आहे. याच्याच जोडीला युद्धकलेच्या शास्त्रीय अभ्यासाचा अभाव हेंही आहेच. **नेपोलियनास** एकदां गौरवून एकानें म्हटलें कीं 'इतक्या थोड्या फौजेच्या साह्यानें शत्रूच्या मोठमोठ्या सैन्यावर विजय तरी तुम्हीं कसे मिळविले ?' तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं 'थोड्या फौजेनिशीं पुष्कळ लोकांवर विजय कसा मिळवितां येईल? ज्या ज्या ठिकाणीं मी असे विजय संपादिले, तेथें अशी खुबी असे कीं लढाईस प्रत्यक्ष तोंड लागलेल्या ठिकाणीं शत्रूच्या एका माणसापुढें माझीं चार माणसें मीं उभीं करीत असे.' यांतच युद्ध-शास्त्राचें रहस्य आहे, व याला धरून सैन्याच्या हालचाली हव्या तशा व हव्या तशा वेगानें करणें, अनुकूल स्थळींच लढाईचा प्रसंग घालणें, निरनिराळ्या टोळ्यांनीं एक-मेकांशीं दळणवळण राखून सहकार्य करणें, एकंदर सैन्यांत एकसूत्रीपणा राखणें, शिलकी फौज ठेवणें, कूटयुद्ध करणें, हूल दाखविणें, छापा घालणें, युद्धक्षेत्राचा बारीक अभ्यास करणें, शत्रूकडील बातमी राखणें, शत्रूपक्षासंबंधी सांगोपांग व सूक्ष्म अभ्यास असणें, युद्धाचा काल व क्षेत्रें यांची योग्य निवड करणें, इत्यादि अनेक धोरणें सांभाळावीं लागतात. अशा प्रकारचें युद्धशास्त्र **ग्रीक** यवनांना **गांधारापलीकडे** हांकूण देणाऱ्या **चंद्रगुप्त नरेंद्राच्या** वेळीं होतें. त्यानंतरही पुढें तें बऱ्या स्थितींत असावें. **यशो-धर्म्यानें** केलेल्या **हूण** विजयानंतर मात्र पुढें पुढें तें अगदीं नाहिंसें झालें, व अली-कडच्या काळांत तर ठाण मांडून तोंड देणें आणि फारच झालें तर फळी फोडून पार

जाणें, एवढाच त्या शास्त्राचा अर्थ राहिला. मध्यंतरी **मराठ्यांनीं** पुन्हां त्याचा थोडासा उद्धार केल्यासारखा दिसतो. युद्धानंतर शत्रूचा पाठलाग करण्याची व आपल्या क्रुरतेनें त्याला दहशत बसविण्याची मात्र त्यांच्यांत पद्धत नव्हती परंतु त्यांच्या एकंदर उच्च संस्कृतीमुळें तसें होणें साहजिक होतें. त्याचा **बुद्धधर्माशीं**, अहिंसेशीं व मांस खाण्याच्या प्रमाणाशीं कांहीं देखील संबंध नाहीं. बौद्धधर्मापूर्वी तयार झालेल्या **महाभारतावरून** देखील हेंच दिसून येतें. इतकेंच तर काय पण शत्रूचा पार धुव्वा कसा उडवून देतां येईल आणि अखंड विजयश्री कशी संपादन करतां येईल, याची जिवंत तळमळ असणाऱ्या ऋषींच्या वेदांतील प्रार्थनांत देखील, अशा प्रकारच्या क्रौर्याचा कोठें दुर्गंध येत नाहीं. तेव्हां, असें क्रौर्य पूर्वी असून बौद्धधर्मानंतर कमी मांस खाऊं लागल्यामुळें नाहिंसें झालें, असें कोणासही दाखवितां येणार नाहीं. मनुष्याच्या शौर्याचा आणि मांसाशनाचा हा संबंध गृहीत धरावयाचा म्हणजे, **अकबराच्या** प्रचंड सेनेस वर्षानुवर्षं खडे चारणारे **प्रतापसिंहाचे** मेवाडी, राजपुतान्यांतील इतर रजपुतांपेक्षां जास्त मांस खात होते, अथवा, **समर्थांनीं दासबोधांत** ठिकठिकाणीं एकांतीं नाजुक कारभार म्हणून उल्लेख केला आहे, तो कांहीं अशा मांसाशनाच्या गुप्त मंडळांचाच होता कीं काय, असें म्हणावें लागेल. अशी कल्पना तर सध्यां कोणीच करीत नाहीं. मग रा. **सरदेसाई** व श्रीयुत **देव** यांना कांहीं असल्या याद्या सांपडल्या असल्या तर कोण जाणे! युद्धानंतर क्रूरपणानें न वागण्याची व पाठलाग करून शत्रूला न छळण्याची वहिवाट तर अतिशय पुरातन आहे. वरील **नेपोलियन**च्या वाक्यांतील युद्धशास्त्राचें रहस्य स्ट्रॅटेजी व टॅक्टिक्स् यांसह ' **अभूमिष्ठं वा भूमिष्ठः। स्वभूमिष्ठं भंगं दत्वा विभूमिं प्राप्तं हन्यात्। यत् परस्य दुर्बलं तत् प्रभूतसारेण हन्यत्। परस्य सारिष्ठं द्विगुणसारेण।** ' इत्यादि सूत्रांत स्पष्टपणें सांगणाऱ्या **कौटिल्यानें**ही पाठलागाच्या बाबतींत ' **भग्नं न पीडयेत्** ' असा मुद्दाम नियम सांगितला आहे. असो. सारांश इतकाच कीं मुसलमान लोकांच्या विजयाची मीमांसा अशा सरळ रीतीनेंच होत असतां, त्याचें सर्व खापर अहिंसा, व नानाप्रकारच्या धर्मसमजुती यांच्यावर फोडणें हें सत्यास धरून होणार नाहीं. धर्मभोळेपणा, क्रुरतेचा अभाव इत्यादि शास्त्रीबोवांनीं प्रशस्तपणें वर्णन केलेल्या बाबींनीं कांहीं नुकसान झालें नाहीं, असें आम्ही म्हणत नाहीं. परंतु तीं कांहीं मुख्य कारणें नव्हेत. पराजित राष्ट्राचा अधःपात झाला म्हणजे तें पुष्कळअंशीं विवेकभ्रष्ट

होतें, व त्याचा जो विनिपात होतो, त्याचीं हीं नंतरची शतमुखें आहेत. त्यांतूनही एक गोष्ट अशी आहे कीं, पूर्वीचा सारा इतिहास मुसलमानांसारख्या बढाईखोर परक्यांनीं लिहिलेला. त्यांत कांहीं तत्थ्य असलें तरी पुष्कळ भाग अयथार्थ असण्याचाच संभव आहे. **हिंदुस्थानच्या** इतिहासांत एक गोष्ट तर कोणासही नाकबूल करतां यावयाची नाहीं. हिंदुलोकांचा पुरता अधःपात होईपर्यंत लढाई दिल्याखेरीज मुसलमानांचें फावलें, अशीं फारच थोडीं उदाहरणें दिसून येतात. व त्याही लढायांत युद्धशास्त्रांतलें उत्तम प्राविण्य, उत्कृष्ट शस्त्रसामुग्री, व विश्वासघात, फंदफितुरी, अधमपणा–इत्यादि अनेक साधनांनींच त्यांनीं जिंकलें आहे. **देवाल**च्या बंदरांतील हिंदुलोकांच्या दुबळेपणाचें चित्र पुन्हां पुन्हां लोकांपुढें मांडलें जातें. तशा तऱ्हेचीं कांहीं उदाहरणें, अथवा धार्मिक वेडगळ समजुती ह्मणजे–कलिप्रभाव, दैववाद, अवतार, शकुन, उल्कापात, दिनशुद्धि, गाईचा पवित्रपणा आड येणें, अथवा मूर्तीच्या दैवी सामर्थ्यावर विश्वास टाकून स्वस्थ बसणें–असले प्रकार घडलेले आहेत यांत कांहीं शंका नाहीं. परंतु एकंदर इतिहासामध्यें अशीं उदाहरणें अतिशयच थोडीं आहेत, व तींही **सिंधी** लोकांचा अपवाद सोडला तर बहुतेक सारीं पुढील अधःपाताच्या काळांतलीं आहेत. तसें नसतें तर, मुसलमान प्राणी नुसत्या **सिंधानें** स्वस्थ बसणारा नव्हता. हेंच त्याचें एक प्रमाण आहे. **शास्त्रीबोवांच्या** इतरही अनेक विधानांबद्दल अशीच दुसरी बाजू दाखवितां येईल, परंतु स्थलसंकोचामुळें तसें करतां येत नाहीं. स्त्रियांच्या विषयीं व **मुसलमानीधर्मात** कांहीं अचाट सामर्थ्य आहे, **हिंदुधर्म** हीन असून त्याच्यानें कांहीं पराक्रम होत नाहीं, अशा कांहीं लोकभ्रमाविषयीं ही त्यांनीं बरेंच प्रशस्तपणें लिहिलें आहे. एकदां राष्ट्राचा अधःपात होऊन जिकडे तिकडे मुसलमानांचा प्रलय झाल्यावर **दासबोधांत** ह्मटल्याप्रमाणें लोक दावलमलकाला नवस करूं लागणें, यांत कांहीं मोठें नवल नाहीं. परंतु त्यापूर्वीच्या ह्मणजे मुसलमानांच्या विजयाच्या खऱ्या अवस्थेंत **हिंदुधर्म** हीन आहे, व **मुसलमानीधर्मात** कांहीं अचाट सामर्थ्य आहे, ह्मणून लोकांनीं मान वांकविल्याची ह्मणण्यासारखीं उदाहरणें दाखवून द्यावींत. पराजित झाल्यानंतर त्या राष्ट्रांतील लोक स्वार्थामुळें, नीचपणामुळें, दुबळेपणामुळें इ० अनेक कारणांनीं जेत्यांचा सर्व प्रकारें अनुनय करतात, व अशा वाव्यांतून **शास्त्रीबोवांनीं** दिलेल्या **खुश्रू, कालापहाड,** इ० लोकांसारखे अपूर्व उत्साही अधम निपजतात. हे कुऱ्हाडीचे दांडे गोतास काळ झाल्यामुळें राष्ट्राचा अपकर्ष अतिशय झपाट्यानें व पूर्णपणें

होतो, हें खरे. परंतु त्या अपकर्षांचीं तीं मूलकारणें कशीं होऊ शकतात, हें समजत नाहीं. **हिंदु स्त्रियांच्या** पातिव्रत्याच्या कल्पनेविषयीं, मोंगलांच्या जनान्यांत गेलेल्या स्त्रियांनीं तेथें केलेल्या संसाराविषयीं, आणि रजपूत लोकांना मुसलमानाच्या घरांत मुलगी देणें कमी वाटत नव्हतें, परंतु मुसलमानाची मुलगी आपल्या घरांत घेणें कमीपणाचें वाटत होतें याविषयीं **शास्त्रीबोवांनीं** बरेंच आवेशानें लिहिलें आहे, 'स्त्रिया एकदां बाटल्यावर त्यांना शुद्ध करून घेतां येत नाहीं ( ह्मणजे अर्थात् **धर्मदृष्ट्या** ) ही कल्पना **अवैदिक** आहे,' हा **शास्त्रीबोवांचा** शोध तर अतिशय अपूर्व आहे! रानटी लोकांच्या ठिकाणीं स्त्रियांच्या विषयीं अनुदारपणा व त्यांच्या बाबतींत असहिष्णुता, मत्सर आणि सूड घेण्याची अनिवार लालसा यांच्यामुळें दुसऱ्यानें उडविलेली स्त्री कोणत्याही रीतीनें पूर्वीच्या लोकांच्या हातीं गेली, ह्मणजे जिवंत राहण्याची आशाच नसे. परंतु ती **धर्मदृष्ट्या** देखील शुद्ध करून घेतां येत नाहीं, असें कोणत्या अवैदिक धर्माचें मत आहे तें **शास्त्रीबोवांनीं** दाखवून दिल्यास फार बरें होईल. **बौद्ध, जैन, यहुदी, पारशी, खाल्डियन, इजिप्शिअन, रोमन, ग्रीक, ख्रिश्चन, मुसलमान** आणि **चिनी** इतक्या **अवैदिक** धर्मांचे तरी इतिहास थोडेबहुत पुढें आहेत. मनुष्यस्वभावदृष्ट्या नव्हे तर **धर्मदृष्ट्या** एकदां बाटलेली स्त्री शुद्ध होत नाहीं, असें दाखवून द्यावें. त्याचप्रमाणें बाटलेली स्त्री विसळून घेतलेल्या पेल्याप्रमाणें रजोदर्शनानें सहज शुद्ध होते, असा **वैदिक धर्मा**चा सर्वमान्य सिद्धांत आहे. 'अपवाद नसून उत्सर्ग' आहे, हेंही दाखवून द्यावें, ह्मणजे मग **वैदिक लोकां**च्या एवढ्या शहाण्या डोक्यांत सती जाण्यासारखी अवैदिक कल्पना कोणत्या रानटी लोकांच्या प्रसंगानें आली, व ती कशी रुजली, हें आह्मीं त्यांस विचारूं.

मुसलमानांच्या घरांत मुलगी देणें ही गोष्ट रजपुतांस कमीपणाची वाटली नाहीं, परंतु मुसलमानाची मुलगी करणें त्यांना कमीपणाचें वाटलें, या त्यांच्या अडाणीपणाबद्दल **शास्त्रीबोवांनीं** आश्चर्य प्रकट केलें आहे. मुसलमांनास मुलगी द्यावयाचा प्रसंग येणें, हेंच आधीं नामुष्कीचें होतें. परंतु त्यांतल्यात्यांत रजपुतांनीं काढलेला मार्गच योग्य कसा होता, हें मागील प्रकरणांतील विवेचनावरून लक्षांत येईलच. मुसलमानाची मुलगी आपल्या घरांत करणें हें संस्कृतीच्या दृष्टीनें विजातीयद्रव्य ( Foreign matter ) शरीरांत टोंचून घेण्यासारखें होतें. आरोग्यशास्त्राच्या दृष्टीनें देखील दुसऱ्याचें रक्त अशा रीतीनें रोग्याच्या शरीरांत घालीत असतांना त्या

रक्ताच्या शुद्धतेबद्दल केवढी चौकशी करण्यांत येते, तें डॉक्टरास विचारून पहा. येथें तर चौकशीचेंही कारण नव्हतें. मुसलमान कोणत्याही कारणानें जेते असले, तरी त्यांची संस्कृति सर्वतोपरी हीन असून स्वतःची संस्कृति अतिशय उच्च आहे, एवढा अभिमान त्यावेळेला एखाद्या दुसऱ्या कमअस्सलाचें उदाहरण वगळलें तर, कोणत्याही रजपुतास होता. स्वतःची मुलगी दुसऱ्याचे घरांत देणें, याच्या योगानें, फार झालें तर, एखादा अवयव कापून टाकल्याप्रमाणें शरीरांत व्यंग उत्पन्न होई. परंतु त्या शरीराची एकंदर प्रकृति बिघडण्याचें कारण नव्हतें. मुसलमानांच्या जनान्यांत गेलेल्या स्त्रियांनीं आपल्या नवऱ्याचा खून न करतां त्यांच्याबरोबर एकनिष्ठेनें संसार केला, हेंही समाजांत जिवंतपणा नसल्याचें, व वर सांगितल्याप्रमाणें, स्त्रिया एकदां बाटल्यावर शुद्ध करून घेतां येत नाहींत या अवैदिक कल्पनेचें फळ होय, असें त्यांचें मत आहे. त्यामुळें अधर्मानें हक्क गाजवणाऱ्याचा संधी साधून सूड घेतला पाहिजे, हें शिक्षणच त्यांना मिळालें नव्हतें, असें त्यांचें ह्मणणें आहे. आतां, या विचारसरणींत दोन दोष आहेत. ग्रीस देशांतील प्रसिद्ध डेल्फीच्या मंदिरांत, दर्शनास गेलेल्या दोन मित्रांपैकीं एकानें तेथील वरुण देवतेचीं स्मारकें आपल्या मित्रास दाखवून ह्मटलें कीं—' पाहिलास ? हा या देवतेचा प्रभाव ? इतक्या लोकांचें रक्षण हिनें समुद्रांत केलें ' त्यावर त्याचा मित्र हांसून ह्मणाला कीं, ' तूं सांगितोस हें ठीक आहे; परंतु ज्या शेंकडों जहाजांना हा देव न पावतां तीं समुद्राच्या तळाशीं गेलीं, त्यांचीं स्मारकें येथें कोठें आहेत ?' या आख्यायिकेंतील सारांश सहज लक्षांत येण्याजोगा आहे. कोणत्याही कारणानें बाटलेल्या लोकांचा प्रश्नच नाहीं. अशा बाट्यांचें पारतंत्र्यांत पीक पिकतच असतें. परंतु स्वतः न बाटतां आईबापांनीं ज्या मुली तुर्कोच्या घरांत घातल्या, त्यांचीं लग्नें जुलमानेंच लाविलीं गेलीं, हें शास्त्रीबोवाही कबूल करतात. एकंदर चारपांचशें वर्षांच्या इतिहासामध्यें अशी उदाहरणें पाहिलीं तर, तीं एवढ्या मोठ्या राष्ट्राच्या मानानें अपवादात्मक ह्मणतां येतील. त्यांतूनही सर्व इतिहास मुसलमान लोकांनीं लिहिलेले. अशा स्थितीमध्यें वरुणाच्या स्मारकांसारखाच प्रकार घडला असणार हें उघड आहे. ज्या कित्येक स्त्रिया जनानखान्यांत गेल्या त्यांचीं नांवें आज टिकलीं, पण ज्या कित्येकांनीं देहत्याग करून आपल्या शीलाचें रक्षण केलें, त्यांचे इतिहास कोणी लिहिले आहेत ? बिकानेरच्या राणीनें नवरोजांत अकबराच्या छातीवर ठेवलेला खंजीर इतिहासांत चुकून चमकत राहिला आहे. परंतु असे हजारों खंजीर त्या वेळेला शेतकऱ्याच्या

सामान्य झोंपडीपासून तों राजेमहाराजांच्या राजवाड्यापर्यंत चमकल्याशिवाय राष्ट्र जिवंत राहिलें, असें **शास्त्रीबोवांस** वाटतें काय ? त्यांचा क्षणमात्रही विचार न करतां मुद्गलच्या सोनाराची मुलगी किंवा एखाद्या गवहेलकराची मेव्हणी असलीं तींच तींच उदाहरणें घेऊन त्यावेळच्या स्त्रीजातीला डाग लावतांना **शास्त्रीबोवांस** कांहींच कसें वाटत नाहीं ? आह्मीं **शास्त्रीबोवांस** अभिमानानें सांगतों कीं 'धर्माचें स्थान शरीर नसून हृदय ह आहे' 'स्थूलशरीरापेक्षां सूक्ष्मशरीराचा धर्माशीं जास्त संबंध आहे.' 'छलबलानें धर्म हा लादतां येत नाहीं,' अथवा 'जुलमानें झालेला संभोग हा संभोग नव्हे, त्यानें भ्रष्टता येत नाहीं' हें कळण्याइतकी त्यावेळच्या स्त्रियांत पूर्ण अक्कल होती. परंतु आमच्या आजकालच्या डोक्यांत जी येणें शक्य नाहीं अशीही एक अक्कल त्यांना होती. ती ही कीं, धर्म ही केवळ हृदयाची अथवा सूक्ष्म शरीराची गोष्ट नसून, हृदय आणि देह, सूक्ष्मशरीर आणि स्थूलशरीर उभयतांची मिळून ती आहे, व त्या उभयतांची शुद्धि सारखी ठेवून जगण्यांतच राम आहे. त्यांपैकीं कोणतीही एक जरी बिघडली तरी बुद्धीवादाचें पांघरूण त्याच्यावर घालून समाधानानें नांदण्याइतका निर्लज्जपणा त्यांच्यामध्यें नव्हता. नाइलाजानें कां होईना, जें बिघडलें तें फेंकून देऊन, जें शुद्ध आहे त्यासच धरून राहण्याइतकी तेजस्विता त्यांच्यांत होती. आणि ह्मणूनच प्रत्यक्ष शरीरसंबंध तर काय, पण नुसत्या नारळ घेतलेल्या पतीकरितां रजपूत स्त्रियांनीं आपणांस आनंदानें जाळून घेतलें आहे. या ध्येयांतील उच्चपणा व त्यांतील तेजस्विता न पटण्याइतकी **शास्त्रीबोवांची** बुद्धि भ्रष्ट झाली आहे काय ? स्वतःचें शरीर विटाळून घेऊनही सूड घेण्याची कल्पना दिसावयास थोडी मनोरम दिसते, हें खरें; परंतु तिच्या पोटांतही एक प्रकारचा नास्तिकपणा आहे. त्यापेक्षां सूड घेण्याचें काम परमेश्वरावर सोंपवून खऱ्या योद्धयाप्रमाणें त्याकरतां आपली जागा न सोडतां आपल्याकडे आलेलें जें–ह्मणजे शरीर रक्षणाचें–काम त्याकरतां आनंदानें अग्निकाष्ठें भक्षण करणें, अथवा डोकें आपटून प्रांण देणें, ही स्त्री जातीनें आचरावयाच्या कर्तव्ययोगाची पराकाष्ठा नाहीं काय ? नाइलाजानें कां होईना असें न करतां, ज्या मोंगलाच्या घरांत गेल्या, त्या तितक्या कमअस्सलच होत्या; ह्मणून त्या तेथें सुखानें नांदल्या. त्यांनीं आपल्या विधर्मी पतीकडून स्वतःच्या धार्मिकतेचें कोडकौतुक पुरवून घेतलें, यांत नवल तें काय ? **हिंदु** मनाला या दोन टोकांतील मधली स्थिति पटणेंच शक्य नाहीं व पाश्चात्य वाङ्मयाच्या अनुकरणानें तशा प्रकारचीं ध्येयें

लोकांपुढें ठेवूं पाहणें, ह्मणजे त्या उच्च ध्येयाचा उपमर्द करण्यासारखें आहे. आणि ह्मणूनच कितीही काव्यमय भाषेंत रंगविलेला **गडकऱ्यांचा पुण्यप्रभाव** हा अखेरीला खऱ्या तेजस्वी **आर्यस्त्रीला** फिक्काच पडल्यासारखा दिसतो. पतीला वाचविण्याकरतां आपल्या पुण्यप्रभावानें **वृंदावनाला** पालटण्याची लालूच मनास दाखवून, **वृंदावनाच्या** गळ्यांत माळ घालण्यास त्याची मोट बांधणारी **वसुंधरा** ही अखेरला नादानच ठरते. त्यापेक्षां–' वीर–कंकण बांधलेले तुह्मी वीरासारखे मरा, मी तुमच्या मागून आनंदानें येतें ' असें **मल्हारराव होळकरांस** रोख ठोक बजावणाऱ्या **गौतमाबाईचा** पुण्यप्रभाव हा अखंड तेजस्वी आहे. अशा तऱ्हेच्या सतीला पतीच्या मरणाचा एवढा बाऊ तरी वाटण्याचें काय कारण ? शिवाय, **वसुंधरे**च्या विचारसरणींत, ईश्वराचें नांव जरी घेतलेलें असलें, तरी इरसाल नास्तिकपणा, व कर्मयोगभ्रष्टता आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. तसेंच मरण्यापेक्षां सूड घेऊन मरण्याची कल्पना, व त्या आशेनें देह जगविण्याची कल्पना दिसावयास जरी गोड दिसली, तरी, एकंदरींत ती घातुक * आहे हें,

* हा भ्रम उत्पन्न होण्याचें कारण संस्कृति आणि राजकीय स्वातंत्र्य या दोन, अन्योन्याश्रयी असलेल्या वस्तुतः अगदी भिन्न अशा गोष्टींचा, विचारसरणींत जाणुन अथवा न जाणुन केलेला संकर. सूड घेऊन राजकीय स्वातंत्र्य मिळविल्याचीं क्वचित कोठें उदाहरणें नाहींत असें नाहीं. परंतु त्यानें प्रत्यक्ष संस्कृती राखल्याचें उदाहरण एकादेही आढळणार नाहीं. कारण संस्कृति हा शरीर व जीवात्मा या उभयतांचा मिळुन स्वभाव आहे. संस्कृति राखण्यास ' आत्मयज्ञा'चीच गरज असते. सूड घेण्यांकरितां स्वतःची शुद्धता गमाविण्याची कल्पना संस्कृतीहीन होऊन संस्कृति वाढविण्याइतकीच व्यवहार्य आहे ! युद्धक्षेत्रांत पलीकडच्या अंगाला प्रत्यक्ष आईवर जुलूम होत असला तरी तिच्याकरितां आपली जागा सोडणारा सैनिक गोळी घालून ठार मारला जातो हें लक्षांत ठेवण्याजोगे आहे. कर्तव्याची कठोरता काढून टाकूं पाहणारा युक्तिवाद कितीही मोहक असला तरी दुष्ट असतो; संस्कृती विघातक असतो. फितुराच्या बाबतींत कौटिल्यानें 'नदूष्णमदुष्टस्य विषेणेवांभसश्चरेत् । कदाचिद्धि प्रदुष्टस्य नाधिगम्येत भेषजम् ' ॥ असा मुद्दाम इशारा दिला आहे तो अशा सर्व बाबतींत ध्यानांत ठेविला पाहिजे. हिंदु स्त्रियांच्या पुढें राजकीय स्वातंत्र्यापेक्षां संस्कृतीरक्षणाचें परमोच्च ध्येय होतें. तें

ह्मातारी मेल्याचें दुःख नाहीं, पण काळ सोकावतो, या ह्मणीप्रमाणें, काळास यत्किंचितही सोकावूं न देणाऱ्या **वैदिक** लोकांच्या पूर्ण लक्षांत होतें. अशी चार दहा उदाहरणें जरी घडलीं असतीं, तरी त्यानिमित्तानें एकदां जगण्याची संवय लागली असती तर, साऱ्या समाजाचा केव्हांच सत्यानास होऊन गेला असता. त्या भानगडींत न पडतां देहशुद्धीचें एकच तत्व पुढें ठेवून, जर त्या पुण्य-प्रतापी मावल्यांनीं आत्मयज्ञ केले नसते, तर **काशीची** कळा केव्हांच निघून गेली असती, **मथुरेच्या** मशीदींत **लखुजी जाधव** नमाज पढण्यास गेला असतां, आणि जन्म घेण्यास हिंदु आईबाप न मिळाल्यामुळें **शिवाजी-महाराजांचा** अतृप्त आत्मा पृथ्वीच्या वातावरणांत अखंड फिरत राहिला असता. रा. **राजवाडे** यांनीं केलेले सत्राव्या शतकांतील लोकांच्या इस्लामी भवनाचें वर्णन कितीही खरें असलें, तरी त्याबरोबरच हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, इतकेंही करून लोकांनीं आपला राष्ट्रीयपणा जिवंत ठेवला होता, ह्मणूनच जिकडे तिकडे सुंता न होतां मुसलमानांच्या अपकर्षाचा फायदा घेऊन **वैदिकधर्मी** लोक ह्मणून त्यांनीं पुन्हां डोकें वर काढलें. हें काय राष्ट्रांत अथवा समाजांत जिवंतपणा नसण्याचें लक्षण आहे? तसें असेल तर, जिवंतपणाची व्याख्याच वेगळी केली पाहिजे! ज्या स्त्रियां-च्या तेजानें **टॉड** सारख्या परस्थाचे नेत्र दिपून जाऊन त्याचें अंतःकरण आदरानें आणि पूज्य बुद्धीनें थरारून येतें, त्यांची कर्तव्यनिष्ठा आणि उच्चध्येयें, हीं मेलेलीं समजावयाचीं आणि आधीं निमूटपणें जुलुमास मान वांकवावयाची, व मग एकाद-वेळां भ्याडपणानें खून करून सूड घेतल्याचें समाधान मानावयाचें हा जिवंतपणा समजावयाचा, ही विचारसरणी कांहीं औरच आहे! अलीकडील **वागीश्वरीच्या** एका अंकांत एका विद्वानानें अर्वाचीन सतीत्वाचें एक मोठें ध्येय जवळजवळ याच तत्वास अनुसरून एका गोष्टीच्या रूपानें पुढें मांडलें आहे. त्यांतील सारांश असा आहे कीं, एका दारूड्यास दारू पिण्यापासून एकवेळ परावृत्त करण्याकरितां (एक-वेळच कारण, असल्या विलक्षण अटीवर दारू सोडण्याचें कबूल करणारा बदमाष

---

त्यांनीं केवढ्या उदात्त रीतीनें पार पाडलें त्याची यथार्थ कल्पना एकीकडे स्वातं-त्र्याची ओरड करीत दुसरीकडून शक्य तितकी सारीं सुखें आंग्ल प्रभूंच्याच कृपेनें—काम पडल्यास वशीले लावून देखील, उपभोगण्याकरितां धडपडणाऱ्या आह्मां करंट्यांना काय येणार!

आपला शद्व खरा करील, असें मानणारी स्त्री अतीशय मूर्खच ह्मटली पाहिजे! ) एका सेविकेनें आपलें चुंबन घेऊं द्यावयाचें त्यास कबूल केलें. गोष्टीचा शेवट तसाच केल्यास ती वाचकांस खास रुचणार नाहीं अशा अंतर्गत जाणिवेमुळें लेखकानें, त्या पुढें केलेल्या गालास लोकांनीं त्या गुंडाचा स्पर्श होऊं दिला नाहीं, असें दाखविलें आहे. तो शेवट कांहींही असला, व त्या सेविकेच्या या करण्यांत मोठें सतीत्व खरोखरच आहे किंवा नाहीं, हा वाद जरी बाजूस ठेवला, तरी या आत्मत्यागाची कल्पना मानसशास्त्रदृष्ट्या किती वेडगळ आहे, व त्यामुळें असें ध्येय लोकांपुढें ठेवण्यांत आपण त्यांची केवढी दिशाभूल करीत आहों, याची लेखकास यत्किंचितही कल्पना आली नाहीं. **गौतमबुद्ध** अथवा **विवेकानंद** यांच्या सारख्या महात्म्यांनीं लोकसेवेच्या आवेशांत क्वचित् कोठें ह्मटलें असलें कीं एका जीवाचा उद्धार करावयास सांपडला तर आपण जन्मभर नरकांत रहावयास तयार आहों, तर तेवढेंच उचलून धरून त्याची नक्कल करूं पाहण्यापूर्वी करणाऱ्यानें आपली ही किंमत ओळखली पाहिजे. एवढ्याचकरतां **श्री भागवतांत** ' विनश्यत्याचरन्मौढ्यात् यथा रुद्रोऽब्धिजं विषम् '–असें ह्मटलें आहे. एका व्यसनी माणसाच्या मदिरेचा एक घुटका कमी करण्याकरितां मदिराक्षीचा घुटका त्याला पाजण्याचा हा कांहीं अपूर्व आत्मत्याग आहे ! असो. अशा गोष्टी क्वचित् कोठें घडत असल्यास कर्त्याच्या सद्धेतूमुळें त्या निंद्य ठरूं नयेत, एवढ्यापुरतेंच त्यांचें महत्व असावें. ध्येय ह्मणून उज्ज्वलपणानें त्यांना लोकांपुढें मांडणें लोकशिक्षणदृष्ट्या हानिकारक आहे. अशा विकृत मनोवृत्तीनें पाहिल्यास हिंदुस्त्रियांनीं त्या वेळेला राष्ट्राचा खराच घात केला असें ह्मटलें पाहिजे ! कारण या शास्त्राप्रमाणें **हिंदुस्थान**चें कल्याण करणें त्यांना फार सोपें गेलें असतें. भराभर मुसलमानाच्या घरांत शिरावयाचें, व एक दिवस त्याचा खून करून बाहेर पडावयाचें, असाच सपाटा त्यांनीं केला असतां तर, आह्मांस वाटतें कीं **शास्त्रीबोवां**च्या कल्पनेप्रमाणें चारदहा वर्षांत एकही मुसलमान **हिंदुस्थानां**त शिल्लक राहिला नसता ! असो. सर्व विवेचनाचें तात्पर्य एवढेंच कीं राष्ट्रीयत्वाच्या अभावामुळें तेजहीनता आली, तेजहीनतेमुळें एकी असंभवनीय झाली व एकीच्या असंभवामुळें धूर्त शत्रूनें हळू हळू सारें घर घशांत टाकलें. राष्ट्राचा जिवंतपणा, आणि मनुष्याची तेजस्विता हीं माणसें कोणता पोशाख करतात, काय अन्न खातात कसा व्यवहार करतात, कोणतीं मतें बाळगतात, इत्यदिकांवर फारच थोडा अवलबून असून ते जीं मतें बाळगतात, ज्या आचारव्यवहारांचा अभिमान धरतात त्यांच्याशीं

त्यांचा एकजीवपणा किती आहे, त्यांच्याकरतां वेडे होण्यास ते किती तयार आहेत, केवढा आत्मयज्ञ करूं शकतात, अथवा त्यामुळें त्यांच्या पराक्रमाचा पारा किती वर चढूं शकतो, यांवर अवलंबून आहे. या शक्ति त्यांच्या अंगांत नसतील, तर त्यांनीं कोणतेही आचारविचार पाळले, किंवा कशींही मतें बाळगिलीं, तरी त्या दुर्बळांच्या हातून काय व्हावयाचें आहे ? हें तत्व विसरून जाऊन साप साप म्हणून भुई धोपटल्यासारखें उगीच वाटेल त्या निमित्तावर दांतओठ खाण्यांत काय अर्थ आहे ? तेजसंपन्नमाणसें कितीही भिन्नमतांचीं असलीं, तरी सामान्य लाभ आणि सामान्य हानि यांत त्यांची एकी व्हावयास वेळ लागत नाहीं. अशा प्रकारची तेजसंपन्नता आपल्या राष्ट्रीयत्वास अनुकूल अशा शिक्षणाच्या परंपरा उत्पन्न करून, मोठ्या प्रयत्नानें उत्पन्न करावी लागते, व उत्पन्न झाल्यानंतर तिची जोपासना करून प्रतिश्रमपूर्वक ती टिकवावी लागते. त्यांत जरा ढिलेपणा झाला तर, कोठेंतरी भोंक पडून तें वारें निघून जातें. हें वारें उत्पन्न करण्याचें शिक्षण हें अगदीं स्वतंत्र आहे. त्याचा, अमुकच पोशाख केला पाहिजे, अथवा असेंच अन्न खाल्लें पाहिजे, अशा बाह्य परिस्थितीशीं केवळ **काव्यशास्त्रां**तील **संचारीभावा**इतका अथवा फारच झालें तर **अनुभावा**इतकाच संबंध असेल. अशी तेजस्विता असलेल्या लोकांत, अमुक गोष्ट अशीच असली पाहिजे, असें पुढें आपोआप उत्पन्न होतें. परंतु तेवढ्यावरून, अमुक गोष्ट अशीच केली, म्हणजेच ती तेजस्विता उत्पन्न होते, असें म्हणणें म्हणजे **राणोजी**सारखे **प्रतापराव**च्या चाबकाच्या प्रभावानें बायकोस वठणीला आणूं पाहण्यासारखें आहे. तेजस्विता हिंदुस्थानांत पूर्वी होती, म्हणूनच सातआठशें वर्षांचा एवढा उत्कर्ष झाला. परंतु **यशोधर्म्याच्या हूण**विध्वंसानंतर परकी शत्रु असा कोणीच उरला नाहीं, व परदेशांत जाऊन परकीराजकारण सुरूं ठेवावें व त्यामुळें स्वतःच्या तेजस्वितेची ज्योत जागती ठेवावी, हें संपत्तींत लोळत पडलेल्या लोकांना दुर्दैवानें सुचलें नाहीं. त्यानंतर पुढें जी चारपांचशें वर्षांची शांतता मिळाली, त्यामुळें कसरत सोडून दिलेल्या मल्लाच्या शरीरासारखें राष्ट्रशरीर ढिलें पडलें, पूर्वपरंपरा निःसत्व झाल्या, व पुढच्या एकंदर घाताची तयारी झाली. त्याचा, **दिवेकरशास्त्री** म्हणतात त्याप्रमाणें मांस खाण्याशीं, अथवा स्पर्शास्पर्शाशीं, किंवा स्त्रियांच्या पतिव्रत्याच्या उलट कल्पनांशीं कांहीं संबंध नाहीं. मधल्या काळांत व्यक्तिविषयक पराक्रम राहिला व सर्व व्यक्तींत मिळून खेळणारें असें एक वारें नाहिसें झालें. **महमदानें** जें केलें तें हेंच. असें एक वारें तो कांहीं लोकांत उत्पन्न करूं शकला. यांतच त्याचें **महमदपण**

आहे. मुसलमान लोकांच्या अनंत अवगुणांस व अपकारांस सोडून दिलें तरी, त्या पांचसातशें वर्षांतल्या मुसलमानांत हाच एक गुण विशेष दिसून येतो. त्यांच्या अंगांत ' आपण देवाचे लाडके लोक आहों ' ' देवान आपल्यास हें दिलें आहे, ' ' तो आपला पाठीराखा आहे, ' म्हणून ' त्याच्याकरतां सर्व करावयाचें, ' अशा-प्रकारचें एक वारें सरसहा खेळत होतें. हाच **महमदा**चा चमत्कार. **मेवाडच्या** लोकांनीं हें वारें राखून ठेवलें होतें, म्हणून त्यांनीं जगाच्या इतिहासांत तोड नाहीं, असलें अपूर्व तेज प्रगट केलें. **समर्थांनीं** व **शिवाजीमहाराजांनीं**ही जें केलें, तें हेंच. मराठे लोकांत त्यांनीं हें वारें उत्पन्न केलें. महमदानें, **समर्थांनीं** अथवा **शिवाजीनें** जें हें केलें, तें कांहीं **शास्त्रीबोवां**च्या म्हणण्याप्रमाणें राष्ट्राच्या जिवंतपणाची कांहीं न्यारीच कल्पना लोकांपुढें मांडून केलें असें कांहीं कोठें इतिहास सांगत नाहीं. **ईश्वरासारखा पाठीराखा असल्यावर मनुष्यानें दुबळें बनून दुःख सोसणें,** हें **नादानपणाचें आहे, म्हणून उठा, आणि पराक्रम करा, ईश्वर तुमचा पाठीराखा आहे,** असें सरपळणें शिकवूनच केलें. * **कसाही आचारविचार पाळ, परंतु ईश्वराची आठवण विसरूं नकोस, त्याचा संबध क्षणभरही तुटूं देऊं नकोस, ' समर्थाचिये सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥ असा विचार करून धरीं रे नरा धैर्य धाकासि सांडीं ॥** असा संदेश **समर्थांनीं** राष्ट्रास दिला.

Faith is the substance of freedom ( आत्मविश्वास म्हणजेच स्वातंत्र्य, असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. **समर्थांनीं** देखील ' **म्हणे दास विश्वासता मुक्ति भोगी** '—असाच सिद्धांत केला आहे. असा कांहीं तरी विश्वास अथवा वारें असल्यावांचून राष्ट्र या नात्यानें कोणताही समाज टिकत नाहीं. एकदां राष्ट्र अधःपतित झालें म्हणजे त्यांत अनेक प्रकारची कीड उत्पन्न होते, तशी ती हिंदुसमाजांतही झाली आहे, व ती योग्य रीतीनें काढूनही टाकली पाहिजे याविषयीं आमचा वाद नाहीं, हें मागील प्रकरणांतील विवेचनाच्या धोरणावरून लक्षांत येईलच. अस्पृश्यता, खुळ्या कल्पना, दुबळेपणा वगैरे गोष्टींबद्दल **शास्त्री-बोवां**इतकीच आम्हांसही चीड आहे. मांसाशन देखील शौर्यास आवश्यक आहे किंवा नाहीं, या वादांतही आम्ही शिरत नाहीं. **हिंदु** समाजाची मांडणी व संस्था,

---

* कसाही म्हणजे स्वैर नव्हे; नियतच पण कोणत्याही प्रकारचा.

अशी आहे कीं **जैन व दक्षिणी ब्राह्मण** हा केवळ अल्पसंख्याक वर्ग वगळल्यास बाकीच्या लोकांनीं वाटेल तेवढें मांस खाऊन राष्ट्राचें खुशाल कल्याण करतां येईल, हेंही आह्मी मागें सांगितलें आहे. या अल्पसंख्याक लोकांनींही खाणें अवश्य आहे किंवा नाहीं, हा देखील वाद आह्मी काढीत नाहीं. आमचें एवढेंच ह्मणणें आहे कीं त्या वादाला वगळून देखील राष्ट्राचें काम भागूं शकेल. स्त्रियांच्या संबंधींही **शास्त्रीबोवां**पेक्षां आमची कमी उदार वृत्ति आहे, असें खास नाहीं. आपत्तिमुळें, दुर्बळतेमुळें किंवा अज्ञानामुळें सर्वोत्तम ध्येयाच्या मार्गापासून चलित झालेल्या स्त्रिया ह्मणजे साऱ्या वाईटच; त्यांना समाजांत पुन्हा स्थान नाहीं, सुखसमाधानाला, आत्मोन्नतीला अथवा कर्तव्यपूर्तीला कांहींच क्षेत्र नाहीं, अथवा नसावें, असेंही आमचें मत नाहीं, हेंही पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. परंतु त्यांच्या करुणेच्या भरांत, **आर्यस्त्रियांनीं** स्त्रीजातीच्या **निष्काम कर्मयोगाची** एकदां गांठलेली जी परमसीमा, एकदां ठरविलेलें जें अत्युच्च ध्येय त्यांचें ध्रुवपद आह्मीं ढळवूं शकत नाहीं. मनुष्य केंव्हांहीं पडत झडत व उठत बसतच पर्वताचें शिखर गांठतो. अशाचप्रमाणें, **शास्त्रीबोवांना** अपेक्षित असलेल्या गोष्टींना आह्मी या पडझडींत काढतो व डोळ्यापुढचे **गौरीशंकर** नजरेआड करूं इच्छित नाहीं. एवढाच त्यांच्यांत व आमच्यांत फरक आहे. समारोपादाखल आम्हीं थोडक्यांत पुन्हा एवढेंच म्हणतों कीं अपकर्षाचीं कारणें म्हणून ज्या गोष्टींचीं हीं भडक चित्रें या वर्गांतील लेखकांकडून रंगविलीं जातात, त्या गोष्टी कांहीं झालें तरी गौण आहेत, व त्यांचा राजकारणाशीं मेळ न घालतां, त्या निवळ धर्मावरच सोंपवून देणें बरें. धार्मिक दृष्ट्या, वाटल्यास, लोक त्या ठेवतील नाहींतर टाकतील, त्याच्या करितां धार्मिक चळवळ स्वतंत्र आहे, ती शुद्ध धार्मिक व्हणूनच करा, म्हणजे फायदा होईल. संकर करून दिशाभूल केल्यानें कांहींच पदरांत पडणार नाहीं. तेजस्वितेवांचून राष्ट्राचें अडलेलें आहे. त्या सर्व गोष्टींनींही कांहीं थोडें अडलें असलें तरी, त्यांना जें फाजील महत्व दिलें जातें, तें घातक आहे. त्या गोष्टी गिळून टाकूनच एकत्वाच्या भावनेनें उभें राहतां आलें पाहिजे, अशीच शिकवण अखेरीस द्यावी लागेल. **हिंदुस्थानचें** खरें कल्याण, **हिंदुस्थानच्या** राजकारणांतून जातवारीचें तत्व काढून टाकण्यांत आहे, असें जें **राऊंड टेबलच्या** प्रसंगांत आपल्या अनुभवाची परिपक्वता करून **डॉ० मुंजे** यांनीं नुकतेंच ( १४-४-३१ ) मत दिलें आहे, तें विचार करण्याजोगतें आहे. त्यांतील तत्व, व आम्ही म्हणतों यांतील तत्व, हीं

दोन्ही एकच आहेत. फक्त मांडण्याची तऱ्हा कदाचित् वेगळी असेल. आणि आज नाहीं उद्यां हीं जी अनेक कारणांची यादी देण्यांत येते, त्या सर्वांच्या बाबतींत हेंच धोरण अखेरीस स्वकारावें लागणार आहे. चळवळींत सामर्थ्य आहे, ह्मणून ती चिकाटीनें करीतच राहिले, तर वाईटाबरोबर कांहीं थोडें फार बरेही त्यांतून कदाचित निघेल. परंतु तें राष्ट्रीयत्वास पोषाक न होतां गळ्याशींच येईल. कारण, अप्रामाणिक भेदाबरोबर प्रामाणिक भेद, आणि त्यांकरितां त्याग करण्याची तयारी, ही अशा रीतीनें उलट वाढून या तंट्यांना अंत राहणार नाहीं. **नाशीक** सारख्या ठिकाणीं **श्रीरामाचें** दार रोखून **सत्याग्रह** करणें हा कांहीं अस्पृश्यता निवारणाचा खरा उपाय नाहीं. कारण तसल्या बुजगवण्यानें उलट पक्षाच्या लोकांनीं तरी आपलीं प्रामाणिक मतें सोडून देण्याचा भित्रेपणा काय म्हणून करावा? उद्यां जर **मँचेस्टर** पांच पन्नास हजार व्यापारी याच तत्वानें **महात्मा गांधींच्या** दारांत प्रायोपवेशन सरून बसले, तर ते आपला चरका सोडून देतील काय? अथवा **वैदिक लोकांची** यज्ञाच्या प्रसादावर श्रद्धा आहे, म्हणून अशा पांच दहा हजार सत्याग्रही लोकांना वांचविण्याकरतां **महात्माजी** बकऱ्याचा एकदा प्रासादिक गोळा घशांत सोडून घावयास तयार होतील काय? या उदाहरणाचा येथें प्रत्यक्ष संबंध दिसत नसतां तें देण्याचें कारण इतकेंच कीं, ज्या गोष्टींची उपेक्षा करावयास राष्ट्रास शिकवावयाचें, त्यांस आपल्या मतलबाकरतां असें उचलून धरल्यानें शेवटीं एकी तर उत्पन्न होणार नांहींच, परंतु अनवस्था मात्र सारखी वाढत जाईल. असो.

आह्मी आधींच ह्मटलें आहे कीं, हा सर्व ग्रंथच परीक्षण करण्याजोगता आहे, परंतु तें स्थलमर्यादेच्या आणि पुष्कळ अंशीं आमच्या योग्यतेच्याही बाहेरचें आहे. ‘ तत्वज्ञानामुळें नीतीला पुढें येण्यास फारसा वाव मिळत नाहीं, ’ ( सदरहु पुस्तक पा० २१ ) हा सिद्धांतही थोडा विचित्रच आहे. तत्वज्ञानाचा आणि नीतीचा शास्त्रीबोवांनीं दाखविलेला हा विरोध, आणि तत्वज्ञानाच्या सूक्ष्मपणामुळें व कर्कशपणामुळें व **वैदिक**कर्मकांडाच्या खटाटोपामुळें सामान्य जनांना निष्पाप आचरण, जाज्वल्य त्याग, परोपकार, प्रेम, वगैरे सद्गुणांचें संवर्धन इ० करता येत नव्हतें, तो उपकार **बुद्धधर्मानें** करून ठेवला—हा त्यांचा सिद्धांत **लोकमान्यांस** ठाऊक असता तर, नीतिशास्त्रास **गीतें**तील तत्वज्ञानाच्या अढळ पायावर बसविण्याची त्यांनीं व्यर्थ खटपटच केली नसती. सामान्य जनसमुहाच्या सद्गुणांवर हा शिंतोडा उडविण्यापूर्वी नुसतीं **ऋक्संहिताच शास्त्रीबोवांनीं** लक्षपूर्वक वाचून पहावी;

एवढेंच आह्मी त्यांस सुचवितों. **बौद्धधर्मा**पूर्वीच तयार झालेली **गीता व भारत** यांपासूनही न झालेला बोध कदाचित् त्यांस आढळेल.

**यज्ञ** हे वसाहती वाढविण्याकरितां होते, हा या लोकांचा शोधही दिव्य व अपूर्वच आहे. हा जर **श्रीरामचंद्रा**स ठाऊक असता, तर त्यांनीं आपला अश्वमेध **गोदावरीच्या** कांठींच केला असता, आणि **युधिष्ठिरानें** राजसूय यज्ञाकरितां **इंद्रप्रस्थांत** जागा न निवडतां कोठें तरी **ब्रम्हदेशांत** अथवा **मद्रास** इलाख्यांत तळ दिला असता. खुद्द **वेदां**तदेखील वसाहतीचा आणि यज्ञाचा हा संबंध अशा तऱ्हेचा दिसून येत नाहीं. **यज्ञ** हे हवाशुद्धीकरितां आहेत, या कल्पनेवर प्रसिद्ध **हंसस्वरूप** स्वामी विनोदानें असें ह्मणत कीं ' तसें असेल तर पळी पळी तूप व चिमटीभर तीळ प्रत्येक वेळां होमांत टाकून डोळे मुजवून घेण्याचें काय कारण ? एक तुपाचा बुधला व तिळाचा कोथळा गाड्यावर घालून चवाठ्या चवाठ्यावर होळी केली कीं काम झालें ! ' यज्ञानें हवा शुद्ध होत असेल तर तो आनुषंगिक परिणाम होय. तें कांहीं त्याचें तत्व नव्हे. त्याचप्रमाणें यज्ञानें वसाहती वाढत असतील तर तो त्याचा आनुषंगिक परिणाम होय. तेंच यज्ञाचें तत्व आहे, असें **युरोपियन पंडितांनीं** तोडलेल्या ताऱ्यांचें अनुकरण करून ह्मणणें, यापेक्षां बुद्धीची दास्यदुर्बलता ती अधिक कोणती ? बाठ्या हिंदूंच्या उत्साहाबद्दल **शास्त्रीबोवांनीं** मोठा खेद प्रदर्शित केला आहे, परंतु त्यांत विशेष काय आहे ? खुद्द या पुस्तकांतील कित्येक विधानें पाहिलीं ह्मणजे लेखकांच्या बाटलेल्या बुद्धीच्या उत्साहाचा पारा कांहीं कमी अंशावर आहे, असें मुळींच आढळत नाहीं. एवढेंच कीं,त्यांचें कार्य–क्षेत्र जास्त अव्यक्त असल्यामुळें त्यांचा विध्वंसकपणा चटूकन् लक्षांत येत नाहीं. ह्मणजे ही अधिक भयंकर गोष्ट आहे. पारतंत्र्यांत असें चालावयाचेंच, व त्याला तोंड देऊनचं पुन्हां वर डोकें करावयाचें असतें. युरोपियन पंडितांनीं आपल्या दुष्ट अथवा कोत्या बुद्धीनें दयाधर्म व उच्च नीतिमत्ता हिचा सार्वत्रिक प्रसार प्रथम **बुद्धानें** केला, असें ह्मटलें, ह्मणजे तें प्रमाण मानून त्यांचीच री * ओढूं लागणें, अथवा

* या 'री' ओढण्याची मजल कोठपर्यंत जाते हें पाहिलें ह्मणजे खरोखर कींव उत्पन्न होते. ओघाला आलें ह्मणून सहज एक उदाहरण देतो. आश्विन मासांत येथें नाशीकचें सुप्रसिद्ध प्रो. ओतुरकर यांची ' इतिहास ' या विषयावर एक सुंदर व्याख्यानमाला झाली. ही सर्व मालाच अनेक दृष्टींनीं विचाराई आहे. तसें येथें

इंग्रजी वाङ्मयांत सॉनेट सारखा एखादा प्रकार आहे, म्हणून आमच्याकडची पद्यगणनेची पद्धत सोडूनदेऊन शार्दूलविक्रिडिताला मुद्दाम चौदा चरणांवर लंगडाकरून सुनीतासारखें एखादें नांव दिल्याखेरीज साहित्यशास्त्राला

---

करणें अर्थातच शक्य नाहीं. इतिहासाचा केवळ स्वतंत्ररीतीनें विचार करणाऱ्या व्याख्यात्यांनीं दिलेलें एक बारीकसें उदाहरण देतो. वैदिक ऋषी मनुष्य जातीच्या शैशवावस्थेंत असून जड अशा सृष्ट पदार्थांची उपासना करणारे होते हा तर अगदी अढळ असा सिद्धांत ठरलेला आहे. त्यांची शंका घेण्याचें पाप आतां कोण करील! आणि त्याची गरज तरी काय? तेव्हां त्याला अनुसरून त्यांच्या त्या अवस्थेचें रसभरीत वर्णन करिताना त्यांनीं सांगितलें कीं ' ज्यावेळेस पहिली रात्र (!) आली त्या वेळेस शैशवावस्थेंतील मनुष्यप्राण्याला काय वाटलें असेल! तो केवळ गांगरून गेला असेल वगैरे वगैरे. ' शेक्स्पीयरच्या मनोज्ञ मिरांडेनें ज्याप्रमाणें वयांत आल्यावर एक दिवस अचानकपणें एक तरुण पुरुष पाहिला त्याप्रमाणेंच 'पुराकल्पा'तील मनुष्यप्राण्यानें वयाच्या १६ व्या वर्षी एक दिवस एकदम एक पहिली रात्र पाहिली अशी प्रोफेसर साहेबांची समजूत दिसते! नुसता ऋग्वेदच जर ते काळजीपूर्वक वाचतील तर त्यांना स्वतःच्या असल्या समजुतींचे हंसू आल्याखेरीज राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. स्वतंत्र विचाराच्या बाण्यानें इतिहाससंशोधनाच्या रंगभूमीवर कितीही ऐटीनें उभे राहिलें तरी या विक्रांतांना पाश्चात्यबुद्धीरूपी मदालसेच्या मायावी हातांचा ' राक्षसी महत्वाकांक्षी '-पाश तडकन् तोडून टाकतां येत नाहीं हेंच अखेरीस खरें! आपल्या सिद्धांताच्या स्पष्टीकरणार्थ त्यांनीं रॉबिन्सन क्रूसोचा रानटी सेवक फ्रैडे हा मालकाच्या बंदुकीस देव समजून तिच्याशी बोलत असे त्याचें उदाहरण दिलें. या ठिकाणीं प्रो॰ साहेबांनीं एक गोष्ट स्पष्ट सांगावयास पाहिजे होती. ती ही कीं फ्रैडेस देवाची कल्पना बंदुकीवरून आली कां देव म्हणून पूर्वीच कांहीं कल्पना होती तिच्या कर्तृत्वाचा भास त्या बंदुकींत झाला म्हणून तो तिला देव समजूं लागला? ऋग्वेद पंजाबांत रचिला गेला, यज्ञकाल उपनिषत्कालानंतरचा, बुद्धानें कर्मकांड खोटें ठरवून अहिंसेचा पुरस्कार केला, शंकराचार्यांनीं चातुर्वर्ण्याची घडी बसविताना ढिलेपणा केल्यामुळें पुढील आपत्ती ओढवली, देशरक्षणाचा भार केवळ एकच वर्णावर पडल्यामुळें सांप्रतची अनर्थ परंपरा ओढवली गेली वगैरे त्यांनीं सांगित-

सुनीत लागत नाहीं, असें वाटणें, हीं क्षमाचीं लक्षणें आहेत, याचा सूक्ष्म विचार करावा. भाषेच्या कमाईशिवाय कवित्वाचा शिरपेच डोक्यावर धरूं पाहणाऱ्या कवींना पद्यांतयमक नव्हत असल्यामुळें नियमक कवितेच्या आग्रहांत कांहींतरी अर्थ आहे, असें ह्मणतां येईल; परंतु इंग्रेजींत काव्यगणना पंक्तींवर असते, म्हणून मराठी-हती तसें करून, चौदाओळी जुळविल्याखेरीज मनाची मळमळ न जाणें, हें केवळ दास्यदुर्बलतेचें लक्षण आहे. असो. नाहीं नाहीं म्हणतां या पुस्तकासंबंधीं पांचपंचवीस पानें लिहावीं लागलीं. कारण सदिच्छेनें कां होईना, पण **वैदिकधर्माच्या** मूळ प्रकृतीचा व ईश्वरावरील आस्तिक्यबुद्धीचा अत्यंत लोप होऊन, सुधारणेच्या नांवा-खालीं जें एक प्रकारचें वाङ्मय देशांत फैलावलें जात आहे, त्याचें हें पुस्तक सारभूत असल्यामुळें तसें करणें भाग पडलें. या सर्व लोकांच्या बुद्धिवादाचा सारांश काढला तर इतकाच निघतो कीं केवळ **हिंदु** * हें नांव ठेवून, आर्थिकदृष्ट्या झगडा करण्या-पुरतें ऐक्य सांभाळा, व प्रत्यक्ष व्यवहारांत सर्व तऱ्हेनें पाश्चात्यांचें अनुकरण करा. पूर्वी ज्याप्रमाणें साहेबी पोशाखाची तंतोतंत नक्कल करणें ही सभ्यतेची सीमा समजली गेली, त्याचप्रमाणें हेंही आहे. कालांतरानें ती लाट जाऊन साधी पैरण आणि गांधी-टोपी यांस सभ्यतेचा मान मिळाला तशीच हीही लाट जाऊन नवा काळ येईल यांत शंका नाहीं. परंतु कोणी तरी त्या दिशेनें प्रारंभ करावयास पाहिजे होता, त्याची ही थोडीशी सुरुवात केली इतकेंच. जास्त अधिकारी लोक यानें जागे होऊन या दिशेनें मुद्दाम त्यांनीं प्रयत्न करावा एवढीच इच्छा आहे. कोणते तरी भेद समाजांत रहा-वयाचेच, कांहीं तरी संस्कारांना पूज्यत्व असलेंच पाहिजे. कोणत्या तरी चालीरीतींना प्रमाणभूत धरलें पाहिजे, कर्म आणि भोग हे तर मनुष्याच्या मागें लागले आहेत, पण ते विशेष रीतीनें करण्याचा अभिमान बाळगण्यांतच जर मनुष्याचें मनुष्यपण आहे, तर मग जें माझें आहे, ज्यानें राष्ट्राच्या अंतःकरणाची घडण बनविली आहे,

---

लेलीं स्वतंत्र (!) तत्वें अशीं पूर्वीपासून ठाम ठरलेलींच आहेत. त्यापैकीं कित्ये-कांचा विचार प्रसंगानुसार या पुस्तकांत केलेला वाचकांस आढळून येईल.

उमरावती. ३१-१-३२.

* अलीकडे कांहीं आठवडे केसरींत येत असलेल्या रा. भावे याच्या 'अभिनव भारताचें रूपदर्शन' या लेखमालेंत ही गोष्ट फारच सुंदर रीतीनें मांडून दाखविली आहे. ही सारी लेखमालाच वाचण्याजोगी आहे. ३१-१-३२

इंग्रजी शिक्षणाचे मानसपुत्र व पाश्चात्य संस्कृतीचीं बांडगुळें सोडून दिलीं तर ज्यांच्या जिवंत धाग्यांनीं अजूनही आमचीं हृदयें तयार होतात, तें मुद्दाम सोडून द्यावयाचें, व जे केवळ परकें ज्याला कांहींच आगापिछा नाहीं, तें केवळ सोईचें वाटतें ह्मणून घ्यावयाचें, यांत भूषण तें कोणतें आहे? आणि सोईच्या प्रश्नाचा देखील पुष्कळ प्रमाणांनीं अनेकवेळां बाऊ केला जातो. त्याच्या ऐवजीं थोडी गैरसोय सोसून देखील जें माझें आहे, तेंच मी जगांत प्रमाणभूत ह्मणावयास लावीन, असा अभिमान असला पाहिजे. **मॅकडोनल्ड** साहेबाच्या बूट आणि सूट यांचेंच अनुकरण मी काय म्हणून करावें? माझ्या पुणेरी जोड्यांत अथवा काठेवाडी आंगरख्यांतच मी अशा उच्च स्थानीं बसेन, कीं माझ्याकडे येण्याकरितां **लॉर्ड विलिंगडननें** जोडा आणि आंगरखा धारण केला पाहिजे. केवळ सोईच्याचमागें लागलें म्हणजे तरी सर्व मनाजोगतें घडतें असें कोठें आहे? त्यापेक्षां साहेबाच्या गवती छपराचें अनुकरण मी करणार नाहीं, माझ्या पुणेरी पगडीचें कौतुक त्यानें केलें पाहिजे, असा अभिमान कां धरूं नये? व्यक्तिशः अशा तऱ्हेच्या अभिमानानें जेव्हां शिक्षणास प्रारंभ होतो, तेव्हांच तें खरें तेजस्वी शिक्षण होऊन त्यांत राष्ट्रीयता येतें. प्रत्येकानें असा वेगळा अभिमान धरल्यास फाटाफूट कधींच संपावयाची नाहीं, अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. अशा तऱ्हेच्या सर्व भिन्न अभिमानांचे, वर्तुळांतील रेषा ज्याप्रमाणें निमुळत्या होऊन स्वतःचें अस्तित्व राखूनही केंद्ररूपी विशिष्ट बिंदूंत समाविष्ट होतात, त्याप्रमाणें या सर्व चालीरीतींचें एका विश्वकल्पनेच्या पायावर उभारलेल्या विशिष्ट संस्कृतींत अभेदानें पर्यवसान होतें. केवळ विचारशून्य बनून पूर्वपरंपरांना चिकटून राहून आत्मघात करून घेणें यांत कांहीं वेडेपणा आहे; असें जरी घटकाभर गृहीत धरलें तरी त्याला देखील अतीशय मनोधैर्य व आत्मत्याग लागतो, यांत शंका नाहीं. सोईप्रमाणें वाटेल तें झुगारून देऊन, वाटेल तें करण्यांत मोठा आत्मयज्ञ व आत्मबल आहे, असा भ्रम बाळगणाऱ्या लोकांनीं हें पक्कें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, विध्वंसास लागणाऱ्या या शक्तींपेक्षां संरक्षणाच्या कामासच यांची जास्त गरज असते, व अशा रीतीनें जेव्हां प्रामाणिकपणानें माणसें तपश्चर्या करतात तेव्हां त्याच गोष्टींना पुन्हा शिरोधार्यत्व येतें. हें सर्व विवेचन केवळ आवेशाचें व आभासपूर्ण वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. नुकत्याच घडलेल्या **लेडी विलिंगड** व श्री. सौ. **कस्तुरीबाई गांधी** यांच्या भेटीनें आणि त्या इंग्रज स्त्रीनें केलेल्या खादी पोशाखाच्या आदरान हा सिद्धांत दोन आणि दोन चार

इतका सिद्धकरून दिला आहे. हें सर्व लक्षांत ठेवून **दिवेकरशास्त्र्यां**सारख्या विद्वानांनीं निर्मळ मनानें आपला प्रयत्न करावा, केवळ आपल्या मर्जीस आली ह्मणून एकच बाजू उचलून धरूं नये, एवढीच त्यांस आपलेपणानें विनंति आहे. एरवीं एवढ्या मोठमोठ्या लोकांवर टीका करण्याइतकी माझी योग्यता नाहीं. आणि व्यक्तिविषयक त्यांच्यासंबंधीं कोणत्याही प्रकारचा क्षुद्र विचार माझ्या मनांत नसून आदरच आहे, एवढें पुन्हा सांगून हें पुष्कळच लांबलेलें विषयांतर संपवून, पुन्हा आपल्या विषयाकडे वळूं.

यात्रमाणें **हिंदुधर्मा**च्या अथवा खरोखर म्हणावयाचें म्हणजे **वैदिक-धर्मा**च्या पुनर्घटनेसंबंधीं कांहीं गोष्टींचा विचार केला, व त्याकरितां **वैदिक-धर्मा**तील **वर्णाश्रमसंस्था** वगैरे परंपरांचें मूळ कशामध्यें आहे, व त्याला धरून त्यांच्यांत फेरबदल कोणत्या दिशेनें केले पाहिजेत, त्याचप्रमाणें राष्ट्राच्या हल्लींच्या अधःपाताची जबाबदारी त्यांच्यावर कितीशी पडते, वगैरे विचारांची एक बाजू दाखविली. आतां त्यासंबधानें उरलेल्या एक दोन शंकांचा थोडक्यांत विचार करून या सर्व हल्लींच्या गोंधळांतून अखेरीस काय निघण्याचा संभव आहे, व काय निघालें पाहिजे, ह्मणजे निघणें श्रेयस्कर आहे, त्याचप्रमाणें तेवढ्याकरितां व्यक्तीनें स्वतःच्या दृष्टीनें काय केलें पाहिजे, यांचा विचार करूं. त्यापूर्वी या परंपरांची, संभावीत रीतीनें कां होईना, पण एक प्रकारें टवाळी करणाऱ्या वर्गातील लेख-कांच्या, वरवर उत्तम दिसणाऱ्या एक दोन विचारसरणींचा विचार करूं. त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें "जातिभेदाचा मुख्य आधार केवळ भावना आहे. आज-तरी त्याच्यामागें दुसरी कोणतीही शक्ति उभी नाहीं. आपल्या मानण्यांत त्याचें खरें जीवन आहे, आणि त्याचें खरें मरण आपल्या न मानण्यांत आहे." जातिभेद ह्मणचे आह्मी वर दाखविल्याप्रमाणें वैदिक धर्मास प्राणभूत असलेल्या चातुर्वर्ण्यांत अनेक कारणांनीं विकृति होऊन उत्पन्न झालेल्या पोटजाती, एवढाच जर अर्थ घेतला, तर बॅ. **सावरकरांचा** व आमचा कांहीं मतभेद होईलसें वाटत नाहीं. परंतु वर सांगितल्याप्रमाणें वैदिक धर्मातील कांहीं शास्त्रांच्या तत्वांस धरून असलेलें **चातुर्वर्ण्य** व ही विकृत **जातिसंस्था** या भिन्न भिन्न असतां, हे दोन्हीं शब्द आपल्या सोईप्रमाणें कोठें वेगळाले तर कोठें समानार्थक असे वापरून, आणि सर्व गोष्टींविषयीं नेहमींच सांपडणाऱ्या कांहीं हास्यास्पद उदाहरणांचा दाखला देऊन लिहिलेले लेख चटकदार असले तरी, त्यांत हेत्वाभास असतो

ह्मणून, तो उलगडून दाखविणें भाग आहे. मंत्रशास्त्र आणि योगशास्त्र व यांच्या आधारावर असलेलें वेदाचें वेदत्व हें ज्याला मान्य नसून त्या वेदाकरितां आणि त्याच्या पायावर उभारलेल्या संस्थेचा **पोथीजात** ह्मणून ज्यांस उपहास करतां येतो, त्यानें आपणास वैदिकधर्मी न ह्मणविलेलें बरें. जगांतील कोणताही धर्म, या नाहीं त्या प्रकारानें पोथीजातच आहे. इतकेंच नाहीं, तर त्या त्या धर्माच्या मूळ पोथ्या त्या लोकांना किती पूज्य असतात, हें विद्वानांस सांगावयास नकोंच. पोथी ही काय उपहासाची वस्तु आहे ? वैदिक धर्मातील या अतिशय प्रमुख अंगाचा अशा रीतीनें उपमर्द करून देशामध्यें नवीन कलहाचें बीज लावूं पाहणारांना आह्मीं असें विचारतों कीं तुमच्या ह्मणण्याप्रमाणें या कोणत्याही गोष्टींना केवळ भावनेचाच आधार आहे, व त्यांचें अस्तित्व मानण्या न मानण्यावर अवलंबून आहे. परंतु हा नियम जगांत नाहीं कोणत्या गोष्टीस लागू ? आह्मीं मागेंच दाखविलें आहे कीं, याचप्रमाणें पाहिलें असतां राष्ट्र आणि देशाभिमान हींही केवळ थोतांडेंच होऊं शकतील. ज्याला आगापिछा कांहींच नाहीं, अशा या मध्यव्यक्त कालापुरतेंच पाहून ज्यानें त्यानें आपली वाटेल तशी सोय लावून घ्यावी. बॅ. सावरकरांच्या लेखाची पोथी तरी त्याला कशाला हवी ? हेंच तत्व सर्वांत जास्त चांगलें व शहाणपणाचें नाहीं कां होणार ? जों पर्यंत देशांत पोथीविषयीं पवित्रता वाटणारे आणि पोथीजात वस्तु-विषयीं प्रामाणिकपणानें प्रामाण्य वाटणारे कांहींतरी प्राणी आहेत, तोपर्यंत या तऱ्हेच्या विचारसरणीनें भेद मोडतील कां अधिक वाढतील ? **बॅ. साहेबांस** वरील शास्त्रें जरी थोतांड वाटत असलें, तरी जोपर्यंत त्यावर विश्वास असणारे आणि त्यांचा खरेपणा अनुभवणारे कक लोक आहेत, तोपर्यंत या भावना निर्मूल कशा करतां येतील ? जर मानणें न मानणें आणि भावनाच शिकवावयाच्या असतील, तर मनाच्या मोठेपणानें यांच्या पलिकडे जाऊन एकीच्या खऱ्या कल्पनेनें, **बूकर वॉशिंगटन**प्रमाणें "In all things which are purely social, we can be as separate as the fingers, yet one in the hand, in all things essential to mutual progress" असें ह्मणावयास कां शिकवूं नयें? ती तरी भावनाच आहे. मग जेणेंकरून व्यक्तीचें अंतःकरण जास्त उदात्त बनेल, व नानाप्रकारचे भेद राहूनही तो राष्ट्राचा अभिन्न घटक होऊन कार्य करूं शकेल, असें थोर-पणाचे मानणें कां शिकवूं नये ? अशा उदात्त ठिकाणावर उभे राहिलेल्या लोकांच्या मार्गांतील अडचणी अतिशय सुलभपणें व अनायासानें सुटत जातात, असा प्रत्यक्ष

अनुभव आहे. त्याचप्रमाणें मागील एकंदर विवेचनावरून आधुनिक सुधारकांचें एक सामान्य तत्व दिसून येईल. तें तत्व असें कीं असल्या महत्कार्यांत काम करणारानें तत्वाच्या बारीकपणाचा वाद करीत बसूं नये. एकदम धडाकीनें तशी परंपरा सुरूं करावी, ह्मणजे मागाहून त्याची युक्तायुक्तता लोकांस आपोआप पटते. हें ह्मणणें दिसावयास मोठें गोड दिसतें व त्याच्या खरेपणाचा व्यवहारांत कांहीं प्रसंगीं अनुभवही येतो. परंतु त्याबरोबरच या विचारसरणींत एक मोठी चूक आहे, तींही लक्षांत ठेवण्याजोगी आहे. एक तर, अशा प्रकारचे सिद्धांत उपयोगांत आणतांना त्यांची व्याप्ति कांहीं एका विशेष मर्यादेपर्यंतच घ्यावयाची असते. त्याचप्रमाणें याही सिद्धांतामध्यें तत्वाचा बारीकपणा आणि ठोकळपणा असा भेद अंधश्रद्धा आणि डोळसश्रद्धा अशा भेदासारखा विचित्र आहे. श्रद्धा ह्मटली ह्मणजे ती एका तऱ्हेनें अंधच असते. डोळसश्रद्धा असा पदार्थच असूं शकणार नाहीं. डोळस श्रद्धा ह्मणजे प्रत्यक्ष अनुभवच; आणि कोणत्याही गोष्टीच्या प्रत्यक्ष प्रतीतीनंतर, श्रद्धा ती कशावर ठेवावयाची ? आणि सिद्धी तरी कशाची मिळवावयाची ? विचारानें, अनुमानादि प्रमाणांनीं एखाद्या गोष्टींची सिद्धि– झाल्यावर, कांहीं विशेष प्रक्रियांनीं त्या गोष्टीशी प्रत्यक्ष सिद्धि करतां येतील, असें जें मनाचें वाटणें त्याचेंच नांव श्रद्धा. ही अर्थातच त्या गोष्टीच्या प्रत्यक्ष अनुभवास सोडून असल्यानें केव्हांही अंधच असणार, आणि ह्मणून अंधश्रद्धा व डोळसश्रद्धा हा वाक्प्रचारच विचित्र आहे. तसाच तत्वाचा बारीकपणा आणि ठोकळपणा हा भेदही विचित्र असून, अनुयायी ह्मणविणाऱ्या वर्गाची दिशाभूल करण्याकरितां उपयोगांत आणलेली नेहमीची युक्ति आहे. खरोखर प्रामाणिक माणसाची आपल्या बुद्धीप्रमाणें तत्वतः पूर्ण खात्री पटल्याखेरीज त्याचें पाऊलच पुढें पडणार नाहीं. बारीक आणि जाड असली धरसोड त्याला सहनच होणार नाहीं. कार्यकर्त्या मनुष्यांनीं वाद करीत न बसतां एकदम कार्यास सुरुवात करण्याची कांहीं वेळां आवश्यकता असते, हें खरें; परंतु जो वाद करावयाचा नसतो, तो, दुसऱ्यास त्याची युक्तायुक्तता पटेल किंवा नाहीं, कार्यास हात घातल्यास त्यांत यश येईल किंवा नाहीं, आल्यास तें वाटतें तितकें येईल, किंवा प्रयत्नास महाग पडेल, इत्यादि गोष्टींचा, तत्वाचा नव्हे. तत्वाचाच वाद सोडावयाचा ह्मटला, तर, पुन्हा आह्मीं वर ह्मटल्याप्रमाणें बारीक आणि जाड, यांच्यामधील रेषा, ज्यानें त्यानें आपल्या बुद्धीनेंच मांडावयाची असल्यानें, वाटेल ती गोष्ट बारीक तत्वभेदांत

काढून –' आज माझें ह्मणणें तुह्मांस पटावयाचें नाहीं परंतु पुढें आपोआप पटेल, ' असें दुसऱ्यास बजावीत प्रत्येकास आपला आयुष्यक्रम वाटेल तितक्या निलाजरे-पणानें काढतां येईल, व त्याही रीतीनें अनवस्थाच होईल. सारांश काय, कीं भरसोड आणि अप्रामाणिकपणा हीं कोणत्याही स्वरूपांत केव्हांही वाईटच. कशाहीं कारणा-करतां ती कोणासही शिकवूं नका. प्रमाणिकपणानें तत्व तर पूर्णपणें पटलेंच पाहिजे, मग त्याचा विचार बारीक असो कीं जाड असो. स्वतःस तें पटल्यावर दुसऱ्याचा प्रश्न जेव्हां पुढें उभा राहतो तेव्हांचा हा प्रश्न आहे. कारण तत्वाचा वाद न करीत बसतां धडाकून कामास सुरुवात करावी, असें ह्मटलें ह्मजजे अविवेकी तरुणाला,– " एखाद्या मुलीवर मन गेलें असतां तिच्या पालकाशीं विवाहाच्या युक्तायुक्ततेचा वाद करीत न बसतां, कोणीकडून तरी प्रथम तिला विटाळून ठेव ह्मणजे तिच्या बापास विवाहाची युक्तता चट्कन् पटेल " असें सांगण्यासारखें आहे. तत्वासंबंधानें अप्रामाणिक राहून एखादा मनुष्य कार्य करूं लागल्यास, त्या तऱ्हेचीही एखादी लाट समाजांत उठतेच. परंतु एकंदरींत तो प्रकार वर सांगितलेल्या विवाहाच्या तऱ्हेचाच असतो, व त्यानें समाजाचें हित झालेलें कधींही आढळण्यांत आलें नाहीं. आजपर्यंत जेवढे कार्यकर्ते होऊन गेले, ते स्वतःही अतिशय तत्वनिष्ठ होते, व इतरांसही, तें तत्व पटवून देण्याच्या कामीं एकापायावर सदैव तयार असत. त्या-विषयीं त्यांनीं कधीं कुचराई केल्याचें अथवा माघार घेतल्याचें कधींही आढळून येत नाहीं. तत्व पटवून अनुयायी करून घेतलेल्या माणसास प्रत्यक्ष कृतीविषयीं ज्या अनेक अडचणी व शंकाकुशंका येतात, त्यांच्याविषयीं मात्र अनुभवी पुढा-ऱ्यानें आपल्या शिष्यवर्गास अथवा अनुयायास–' आधीं केलें मग सांगितलें–' तूं आपला मुकाट्यानें कामास लाग,–असें जोरानें सांगावयाचें असतें. परंतु त्यापूर्वी आपलें गुरुत्व तरी त्याला, त्यांना पूर्णपणें पटवून द्यावेंच लागतें. केवळ बाजारबुण-ग्यांकरितांच हा उपदेश असेल, तर आमचें कांहींच ह्मणणें नाहीं. त्यांच्या संख्येची कोणत्याही सैन्यांत कितीही वाढ झाली, तरी तिला खरी किंमत कांहींच नसते. तात्पर्य इतकेंच कीं, वर्णाश्रम संस्थेवर जिवंत विश्वास असणारा फारच मोठा वर्ग आहे, व त्याच्या विश्वासास धार्मिक तत्वांचा भरभक्कम पाया आहे, याची अंतर्गत जाणीव असल्यामुळें, हें काम किती दुर्घट आहे, याची या विध्वंसक लोकांस अंत-र्गत जाणीव असते. ती दुर्घटता नाहिंशी करण्याकरितां ज्या कांहीं युक्त्या योजल्या जातात, त्यांतील ही एक प्रमुख आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

त्याचप्रमाणें या सबंध लेखांत दुसरेंही एक आभासात्मक विधान आहे. त्यांतील आभासाचा उलगडा मागें केलेल्या रा. **दिवेकरांवरील** टीकेनें बहुतकरून होईलच. आज जगामध्यें आह्मी सर्वांत पददलित आहों, व आह्मांस आमची उन्नति करून घेतां येत नाहीं, हें तर निर्विवाद आहे. आणि त्याचप्रमाणें जगांतल्या कित्येक राष्ट्रांनीं आमच्या देखत देखत आपली उन्नति करून घेतली, हेंही खरेंच आहे. परंतु ती उन्नति, ते स्वतंत्र होते ह्मणून त्यांस करून घेतां आली, किंवा त्यांच्यांत सब गोलंकार होता ह्मणून करून घेतां आली, हाच मोठा प्रश्न आहे. त्याचप्रमाणें त्या काळांत आह्मी जर स्वतंत्र असतो, व इवल्याशा लिलिप्यूशनांकडून, झोपेंत असतां गलिव्हरप्रमाणें, पूर्ण जखडले गेलों नसतों, तर, सबगोलंकार नसूनही आमची उन्नति झाली नसती, अथवा उन्नतीच्या आड येणार नाहीं अशी आमच्या समाजाची एखादी घडी, सबगोलंकार न करतांही आह्मी बसविली नसती, असेंही कांहीं ह्मणतां येत नाहीं. अशा स्थितींत, दोन विपरीत परिस्थितींतील उदाहरणें मुद्दाम समोरासमोर मांडून समीकरण सोडविल्यासारख दाखविणें, हीही वादविवादांतली नेहमीची हातचलाखी आहे. जातिसंस्थेचा समाजाच्या भयंकर अवनतीपेक्षां एका उच्च संस्कृतीच्या रक्षणाशीं व मानवी संस्कृतीच्या परमोच्चतेशीं अधिक संबंध आहे, हें आह्मी मागें सांगितलेंच आहे. केवळ खाण्यापिण्याचें सुलभ व उत्तम सुख, एवढाच उन्नतीचा अथ केला असतां त्याच्या सापेक्षतेनें उत्पन्न होणाऱ्या सामाजिक उन्नति अवनतींचा जातिसंख्येशीं खरोखर कांहीं संबंध नाहीं. मानवाचें मनुष्यपण विशिष्ट संस्कृतीनें राहण्यांत आहे. अशा कांहीं विशिष्ट संस्कृतीनें आह्मी पूर्वी परमोच्च पदास पोहोंचलों होतों, आतां जरी पददलित झालों असलों तरी, त्या विशिष्ट संस्कृतीला सांभाळून पुन्हां उच्च पदास जाण्यांतच आमची थोरवी आहे, त्या विशिष्ट संस्कृतीचा आणि चातुर्वर्ण्यसंस्थेचा शरीरप्राणांइतका दृढ संबंध आहे किंवा कसें,—इत्यादि प्रश्न यामध्यें मुख्य असतां, उन्नतिअवनति असले कांहींतरी शद्ब सामान्य अर्थानें वापरून असलीं आभासात्मक समीकरणें केली जातात. असो.

**बॅ. साहेबांच्या** लेखांतील सव विधानांचें मुद्दाम परीक्षण या ग्रंथांत अर्थातच करावयाचें नाहीं. तरीपण ओघानेंच मागील सर्व विवेचनांत त्यांच्या एकंदर विचार सरणीचा सामान्य विचार आलाच आहे. मुख्य गोष्ट अशी आहे कीं, या लोकांची विचारसरणी आणि आमची विचारसरणी या दोन्हीही अगदीं वेगवेगळ्या पायावर आहेत. एकदां त्या ठिकाणीं उभें राहून विचार करावयाचें ह्मटलें

ह्मणजे पुढील सर्व मांडणी संगतवार दिसते. खरा वाद कोणत्या पायावर उभें रहावयाचें हाच आहे. त्याचें महत्व दाखविण्याकरतांच या ग्रंथाचें दुसरें प्रकरण लिहिलें गेलें आहे. स्मृतिग्रंथांतून पितृसावर्ण्य, मातृसावर्ण्य, अनुलोम, प्रतिलोम,–वगैरे सर्वांचे उल्लेख हटकून सांपडतात, ह्मणून त्यावेळेला त्या सार्वत्रिक प्रथाच होत्या, असच ह्मणतां येत नाहीं. कायद्याचें लिहिणें वेगळें आणि इतिहासाचें लिहिणें वेगळें. मनुष्य स्वभावाचा शक्य तेवढा व्यापक विचार करून कायद्याची रचना होते, ह्मणून त्यांत आलेली प्रत्येक गोष्ट म्हणजे सार्वत्रिक रूढीच होती, असें कसें म्हणतां येईल? इंडियन पीनल कोडांत, सृष्टिविरूद्ध कर्म करणाऱ्यास शिक्षा सांगितली आहे; म्हणून विवाहित स्त्रीशीं अनैसर्गिक समागम करण्याची हिंदु लोकांत सार्वत्रिक पद्धतच आहे, असा आधार कोणी देऊं शकेल काय? पंच महापातकांमध्यें गुरुतल्पाचाही समावेश आहे. म्हणजे त्यावेळीं विद्यार्थीवर्गात गुरुपत्निगमनाचें पातक सरसहा होतें, असें म्हणावें लागेल. सारांश, उल्लेख असला म्हणजे तेवढ्यावरून तें आपल्या कामापुरतें ब्रम्हवाक्य समजावयाचें, व त्यास वाटेल तितकें महत्व द्यावयाच, हेंही "वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः"–याच्या इतकेंच घातक तत्व आहे; आणि म्हणूनच अशा सर्व गोष्टींची परीक्षा तत्वसमन्वयाच्या निकषावर केली पाहिजे, असा आमचा आग्रह आहे. समाजामध्यें मूळ तत्वाला धरून नसलेल्या अशाही चाली कांहीं कारणानें शिरतात, व त्यांसही तात्पुरती मान्यता द्यावी लागते, हें **मनुस्मृतीं**तील नियोगास संमति देतांना **भृगूंनीं** जें वांकडे तोंड केलें आहे, व दुरात्मा **वेणाच्या नांवानें** जीं बोटें मोडलीं आहेत, त्यावरून दिसून येतें. एका शास्त्रीय पद्धतीस प्रक्रियारूप असलेल्या यज्ञामुळें, पुढें, यज्ञांतील पशुहिंसा व **गवालंभन** हें सुरू झालें. असवर्ण विवाहामुळें **पलपैतृकाचा** आचार सुरू झाला. त्याचप्रमाणें चातुर्वर्ण्याची बिघडलेली घडी फिरून नीट बसविण्याच्या काळीं **मातुसावर्ण्याची** आवश्यकता भासली. या सर्व गोष्टींचा थोडाबहुत ऊहापोह मागील विवरणांत येऊन गेलाच आहे, तेव्हां त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. ग्रंथामध्यें उल्लेख असला तरी, उन्नतीच्या दृष्टीनें जर त्याच्या पुढें पाऊल आपण टाकलें असलें तर, मुद्दाम मागें जावयाचें कीं काय? कै० **राजवाडे** यांनीं दाखविल्याप्रमाणें **यमीसूक्ताचा** अर्थ करूं गेल्यास वैदिक लोकांत केव्हां तरी सख्या बहिण भावंडांच्या विवाहाची परंपरा होती, असें ह्मणावें लागतें; व तशा प्रकारचा संबंध तिथें आहे, ह्मणून तिचा पुन्हा आदर करावा, असें हे लोक ह्मणूं

शकतील काय? **पोथीजात** जातिसंस्थेवरून उत्पन्न होणाऱ्या अनवस्थेचें व दुरवस्थेचें वर्णन बॅरिष्टरब्राम्हण, मोटारब्राम्हण, यांच्या काल्पनिक उदाहरणांनीं डॉ. **साहेबांनीं** उत्तम केलेलें आहे. त्याविषयीं आम्हांस कांहीं लिहावयाचें नाहीं. कारण एक तर, चातुर्वर्ण्य संस्थेमध्यें मूळ तत्व सुटून अशी दुरवस्था झाली आहे. असें, थोड्या वेगळ्या रीतीनें कां होईना, पण आमचेंही म्हणणें आहे. व दुसरें असें कीं, अशाच प्रकारचीं दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें कल्पून, ( कारण उदाहरणें सर्वच प्रकारचीं सांपडतात.) जन्मजात जातींचा उच्छेद, आणि गुणजात जातींचा उद्धार या सूत्राचा खरा अर्थ आणि ' गुणजात जातींचा उद्धार ' या शब्दांची निरर्थकता—ही उपाहासक्तीनें आम्हांसही दाखवितां येतील. परंतु तशा प्रकारच्या लेखनांत शिरून या एकंदर ग्रंथाची गंभीरता मोडणें योग्य होणार नाहीं.

आतां आपल्या मूळ विषयाकडे वळूं. **चातुर्वर्ण्या**संबंधीं आमच्या पद्धतीनें विचार करितां अजूनही त्याविषयीं दोन मुख्य शंका शिल्लक आहेत. एक अशी कीं, मागें म्हटल्याप्रमाणें सर्व गोष्टी जरी कबूल केल्या, **चातुर्वर्ण्या**ची शास्त्रीय उत्पत्ति मान्य केली, व त्याला आवश्यक असलेली शरीररूपी यंत्रांची भिन्नता गृहीत धरली, तरी असें वाटतें कीं, पूर्वी कांहीही असलें तरी आतां त्याचें काय ? आतां तर एवढा सांवळागोंधळ झाला आहे कीं, आब्रह्मचांडाळ यत्चयावत् सारींच शरीरें पूर्णपणें बिघडून गेलीं आहेत, व ज्यांच्यावर विश्वास ठेवतां येईल, अशा तऱ्हेचे या शरीरांची पात्रापात्रता निवडणारे अधिकारी योगशास्त्रज्ञ कोणीही दिसत नाहीं. तेव्हां हे बेसूर तबले लावावयाचे तरी कोणी ? आणि त्यापासून काय निष्पन्न होणार ? ती गोष्ट केवळ गंधर्वनगरींतील वाडे वसविण्यासारखी आहे. त्या ऐवजीं, जें आज प्रत्यक्ष पुढें दिसत आहे, त्याला धरून जें योग्य दिसतें, तें कां करूं नये ? दुसरी शंका अशी कीं, साऱ्याही गोष्टी खऱ्या असल्या तरी, जें विष शरीरांत भिनलें आहे, तें भिनलेंच आहे. त्याचा परिणाम आतां कांही केल्यास नाहिंसा करतां येणार नाहीं; तेव्हां मीमांसकांच्या **'अपूर्वा'**-प्रमाणेंच तुमच्या काल्पनिक संस्कृतीस धरून ठेवण्यापेक्षां, क्षुब्ध झालेल्या इतर वर्गांना शांत करून सद्यःश्रेय साधण्याकरितां सबगोलंकार कां करूं नये ? यांच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं, सबगोलंकाराची ही जी लाट उठली आहे, ती कांहीं केल्या ओसरणें आतां शक्यच नाहीं; उलट हळू हळू ती वाढून तिच्या प्रळयांत सर्व कांहीं बुडून जाणारच. मग आपणच आपल्या हातानें तसें करून,

चांगुलपणा आणि शहाणपणा यांचा टिका आपल्या कपाळास कां लावूं नये ? या दोन्ही शंका जरी वेगवेगळ्या दिसतात, तरी त्यांचा अंतर्भाव एकमेकींत होत असल्यामुळें दोघींचा मिळून एकच विचार करूं. जेथें अगदीं अवश्य होईल तेथें मात्र पृथक् निर्देश करूं.

यांतील जी दुसरी शंका तिच्या पोटांत दोन मुद्दे आहेत. एक असा कीं, वैदिकसंस्कृति ही मीमांसकाच्या एकाद्या आंधळ्या 'अपूर्वा'प्रमाणें कांहीं तरी असून, वाटेल त्या आत्मत्यागानें जतन करण्याइतकी तिची किंमत आहे किंवा काय ? व दुसरा मुद्दा असा कीं साऱ्या गोष्टी खऱ्या असल्या तरी आतां आभाळच इतकें फाटलें आहे कीं, आकाशाला ठिगळ देणें शक्य नाहीं, हें मत तरी कितपत खरें आहे ? पहिला प्रश्न अधिक तात्विक आहे व दुसरा प्रश्न युक्तायुक्ततेचा ह्मणजे यशापयशाचा आहे. या ग्रंथांत मागें जें वर्णन केलें आहे, त्यावरून वैदिकसंस्कृतीची योग्यता काय आहे, व ती एवढ्या आत्मत्यागानें राखून ठेवण्याच्या योग्यतेची आहे किंवा नाहीं, याचा साधारण बोध खास होईल. आह्मांस असें वाटतें कीं, हे दोनही मुद्दे अशा प्रकारचे आहेत कीं ज्याच्यावर अगदीं एकमत असें होऊंच शकणार नाहीं. कारण कांहींही झालें, तरी अखेरीस हा प्रश्न मानण्यावर येऊन पडतो. आणि त्यामुळें याचा एकमुखी निकाल होणें केव्हांही शक्य नाहीं. त्याकरितां वाद करीत न बसतां, या दोन वेगवेगळ्या सांप्रदायांतील लोकांनीं प्रत्यक्ष प्रयोगानें त्याचा निकाल लावून घेणेंच योग्य ठरेल. येथें कांहीं कोणास दोषही देतां यावयाचा नाहीं, कारण जोंपर्यंत वैदिकसंस्कृतीच्या, मागें सांगितलेल्या अंगप्रत्यंगांची प्रतीति प्रत्यक्षपणें अनुभवणारे कांहीं तरी लोक आहेत, व त्यांना धरून चातुर्वर्ण्याची उपयुक्तता त्यांच्या अंतःकरणास पटत आहे, तोंपर्यंत समाज, देश, अशा कांहींतरी कमीप्रतीच्या ध्येयाच्या दृष्टीनें केलेले युक्तिवाद कितीही सुंदर असले, तरी त्यांना ते नुसते पटणें शक्यच नाहीं. बरें, याच्या उलट--'हा पहा वैदिकसंस्कृतींतील अनेक शास्त्रांचा खरेपणा;' अशी हातावरील आवळ्याप्रमाणें त्यांची प्रतीति जोंपर्यंत दुसऱ्यास देतां येणार नाहीं, तोंपर्यंत, सर्व प्रकारच्या विरुद्ध संस्कारांत वाढलेल्या लोकांस, त्यांचा खरेपणा व उपयुक्तता पटणें शक्यच नाहीं. ह्मणजे, आतां वेळच अशी आली आहे कीं, देशांत विचारांचे व क्रियाशक्तीचे दोन निरनिराळे प्रवाह कांहींकाळ तरी स्वतंत्र रीतीनें वाहिलेच पाहिजेत. तेव्हां या दोन सांप्रदायांच्या लोकांनीं एकमेकांस शिव्या

देण्यांत व केवळ निषेधपर ठराव करण्यांत शक्तीचा अपव्यय न करतां, स्वतःच्या सांप्रदायास सुसंघटित करण्याचा यत्न करावा, हेंच ठीक आहे. आणि असें होण्यांत कांहीं मोठेंसें नुकसान नाहीं. नाहींतरी नुसत्या वादविवादांनीं कोणतेंही भेद न मोडतां, उलट अधिकाधिक वाढत आहेत. तेव्हां, त्यापेक्षां पद्धतशीर दोन सांप्रदाय उत्पन्न झाले, तर जास्त चांगले. मग कांहींकाळ त्यांच्यांत अतिशय विरोध व वैमनस्य राहिलें, तरी हरकत नाहीं. तसल्या विरोधामुळेंच देशांत पुन्हां जिवंतपणा उत्पन्न होईल. एवढेंच होईल कीं त्यांतील प्रत्येकाला कांहींकाळ, मुसलमान हा एकच प्रतिस्पर्धी न उरतां, दोन प्रतिस्पर्ध्योंशीं लढावें लागेल. परंतु, तत्वनिष्ठा आणि तेजस्विता यांच्या ठिकाणीं कार्य करीत असतांना, विरोधकांच्या बलाबलाविषयीं प्रश्नच संभवत नाहीं. मात्र, हीं दोनही जातिवंत पाहिजेत; नकली नकोत. ह्मणजे ' समरीं बहु सिंहांशीं कलह करी कुपित पोत शरभाचा ' हें तर ठरलेलेंच आहे. सध्यांच्या स्थितींत असा प्रसंग ' वैदिकसंस्कृति सांभाळून धरूं '-ह्मणणाऱ्या लोकांवरच येणार हें उघड दिसतें आहे.

हा सुसंघटनेचा उपदेश आम्हांलोकांनाच जास्त केला पाहिजे. कारण आमचे प्रतिपक्षी जे आहेत, त्यांचा तर चोहींकडून आम्हाला खणून काढण्याचा यत्न चाललाच आहे, व त्यांचें कार्य केवळ विध्वंसक असल्यामुळें त्यांच्यांत जास्त संघटना ती काय असावयाची ? असें ह्मणून चालणार नाहीं. निवळ विध्वंसनक्रियाकरून व सबगोलंकारसाधून कांहीं एक होणार नाहीं, हें आह्मीं मागें दाखविलें आहेच. कारण त्यांचें सर्व शहाणपण केवळ आधिभौतिक दृष्टीनें आहे. व असल्या आधिभौतिक अधिष्ठानावरील चळवळीनें क्वचित् काळ कांहीं कार्य झाल्यासारखें जरी दिसलें व एकीही झाली तरी दुसऱ्याच क्षणीं त्याचा डोलारा ढांसळून पडतो, व पुन्हा त्यांना पूर्वपदावर यावें लागतें. हा दुसरा क्षण, अर्थातच विश्वांतील घडामोडीच्या व्यापक कालगणनेचा घ्यावयाचा. तेव्हां, एक **चातुर्वर्ण्य** नको असलें, तर तें सोडून द्या, परंतु **आर्यसमाजा**सारखी कांहीं तरी धार्मिक संघटना करा, असें त्याही लोकांना आमचें ह्मणणें आहे. ह्मणजे देशामध्यें एक नवीन जोमदार धर्म उत्पन्न करा. अशा प्रकारचा नवीन धर्म उत्पन्न होणें आतां अपरिहार्यच आहे.

भारतवर्षाच्या उपलब्ध असलेल्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष इतिहासाकडे पाहिलें, तर असें दिसून येतें कीं वेळोवेळीं त्याच्यावर अशा आपत्ति आलेल्याच

आहेत. त्यांत मरून न जातां **वैदिकसंस्कृति** जी जिवंत राहिली आहे, व प्रत्येक वेळेला, जमीनीस पाठ लागून उठलेल्या **भीमा**प्रमाणें सहस्राधिक बलि झालेली आहे, त्याचें रहस्य यांतच आहे. हें कसें होतें, हें आपण थोडक्यांत पाहूं. **वैदिकसंस्कृति** ही स्वभावतःच इतक्या उच्च पायावरील व थोर दर्जाची आहे कीं, सामान्यतः मनुष्याला ती झेंपावयास जड जाते. व टिकवावयासतर अतिशयच कष्ट पडतात. कारण सामान्य सर्व माणसांच्या जीवनाची व क्रियेची प्रेरकशक्ति भोगवासना ही आहे; आणि **वैदिक संस्कृतीच्या** यथार्थ घटकाची प्रेरकशक्ति त्यागरूपच असली पाहिजे. तेव्हां अर्थातच हें धूड झेंपावयास जड जातें. व राष्ट्रीय आपत्तींच्या वेळीं तर अगदीं कंठींप्राण येतात. अशा वेळेला तिची जीवनज्योति इतकी क्षीण होऊन जाते कीं आतां ती मालवतेच कीं काय, असें वाटतें. अशा स्थितींत एक नवीन धर्माची ढाल मध्यें उत्पन्न करून, तिच्याच आड त्या ज्योतीचें रक्षण करावयाचें, व आपत्तीचें वादळ नाहिंसें झालें ह्मणजे पुन्हा प्रखर होऊन त्या ज्योतीनें आपल्या तेजांत नवीन धर्मास वितळवून टाकावयाचें, असें आजपर्यंत अनेकवेळां झालें आहे. पुराणांतील अप्रत्यक्ष इतिहास सोडून दिल्यास, उपलब्ध असलेल्या अत्यल्पकाळाच्या प्रत्यक्षइतिहासांतील दोन ठळक उदाहरणें ह्मणजे **बौद्धधर्म** आणि **भागवतधर्म**-विशेषतः वारकरी सांप्रदाय,--कारण आमचें विवेचन सर्वसामान्य असलें तरी **महाराष्ट्रास** धरूनच आह्मीं प्रामुख्यानें विचार करीत आहों-यांचीं होत. कुस्ती खेळत असतांना एकादा सडपातळ परंतु अतिशय कुशल, व एकादा अतिशय निवळ बलवान् शरीराचा अशी जोड लागलीअसतां, पुष्कळ वेळां असें आढळण्यांत येतें कीं, किरकोळ दिसणारा गडी खालीं येऊन जमीनधरून बसतो. चिकाटीनें जमीनधरुन बसण्यापलिकडे तो कांहींच करीत नाहीं. वरचा बलिष्ठ गडी त्याला चीत करण्याकरितां आपली पराकाष्ठा करून थकला, ह्मणजे हा चट्कन् त्याला एका झटक्यासरशीं उलथून चारीमुंड्या चीत करतो. तसाच प्रकार वरील दोन्ही प्रसंगीं घडलेला आढळतो. पहिल्या प्रसंगीं असें झालें होतें कीं भारती युद्धांत झालेल्या राष्ट्रहानीनें पूर्वीच्या वैदिक परंपरा मोडून गेल्या होत्या. त्यानंतर **व्यास वैशंपायन** इत्यादिकांनीं **वैदिकधर्माची** नवी घडी बसविण्याची जरी प्रयत्न केला, तरी त्यांतील परंपरा अनेक शास्त्रांची प्रत्यक्ष प्रतीति देण्याइतक्या समर्थ पुन्हां केव्हांच झाल्या नाहींत. परंतु देशांत परशत्रूचें भय नसल्यामुळें आणि सर्वप्रकारची समृद्धि असल्यामुळें, लोकांची बौद्धिक

वाढ उत्तम होऊन अनेक प्रकारचीं दर्शनें उत्पन्न झालीं, व मतामतांचा गलबला झाला तेव्हां बहुजनसमाजास वैदिकसंस्कृति झेंपेनाशी होऊन तिच्या वास्तविक स्वरूपाविषयीं शंका येऊं लागल्या. पूर्वीची वैदिकधर्माची यज्ञप्रधानता, यज्ञसंस्थेचें रहस्य लोपून गेल्यामुळें पटेनाशी झाली. वैदिकधर्माच्या **ब्रह्मज्ञान** आणि **ब्रह्मविद्या** या दोन अंगांपैकीं **ब्रह्मविद्येचा** लोप होऊन ब्रह्मज्ञानावरच लोकांचा जास्त भर पडला. आतां ही जी स्थिति त्यावेळीं झाली, ती कोणत्याही तऱ्हेच्या राष्ट्रीय अशा तात्कालीन आपत्तीनें झालेली नसून, महायुद्धासारखी भयंकर आपत्ति आणि त्यानंतर देशास एकदम मिळालेली अप्रतिहत स्वस्थता यांच्यामुळें झाली. आज आमची जी स्थिति झाली आहे, तिचें मूळ कारणही जवळजवळ तसेंच असून, त्यांत आणखी पारतंत्र्याची भर पडली आहे. महाभारती युद्धामध्यें व त्यानंतर लौकरच झालेल्या यादवीमध्यें, सर्व प्रकारच्या कर्त्या लोकांची एक पिढीच्या पिढीच कापली गेली, आणि मुद्रणकलेचा उपाय नसल्यामुळें सर्व प्रकारच्या विद्यांच्या परंपरा समूळ ढिल्यासारख्या झाल्या. जगांत वारंवार होणाऱ्या महायुद्धाचे असे परिणाम नेहमींच घडून येतात. मुद्रणकलेच्या उत्कर्षामुळें **जर्मनीस** या संवटाचा प्रतिकार करतां आला; नाहीं तर महायुद्धाचा आघात त्याला कधींच सोसतां आला नसता. पहिल्या **फ्रँकोजर्मन** युद्धामध्यें जर्मनीची अशा प्रकारची किती हानी झाली, तें इतिहासज्ञांस ठाऊकच आहे. पूर्वीचें **वैदिकसंस्कृतीचें** पिढ्यानपिढ्या परिणत झालेलें स्वरूप, आणि उपलब्ध असलेल्या प्रत्यक्ष इतिहासांतील विकृत स्वरूप यांच्यामध्यें भयंकर अंतर पडण्याचें कारण महाभारती युद्ध, व त्यानंतरची यादवी. अशा प्रकारचा परिणाम त्या युद्धाचा खास होईल, हेंही त्यावेळच्या प्रज्ञावंतांस ठाऊक होतें, व त्यामुळें तें हातीं घ्यावें किंवा नाहीं याचाही त्यांना मोठाच प्रश्न पडला होता. **भगवद्गीते** संबंधीं लक्षांत ठेवण्याजोगी एक गोष्ट अशी आहे की, तिच्यामध्यें मनुष्यासमोर उत्पन्न होणाऱ्या कार्याकार्याच्या प्रश्नासंबंधीं कशीही व्यवस्थिति सांगितलेली असली, व कसल्याही प्रकारचें उच्च तत्वज्ञान सांगितलें असलें, तरी एक गोष्ट अगदींच उघड आहे कीं, **अर्जुनानें** काढलेल्या मूळ शंकांना **भगवंतांनीं** कांहींच उत्तर दिलेलें नाहीं. अथवा त्या चुकीच्या किंवा वेडगळपणाच्या आहेत, असेंही म्हटलें नाहीं. स्वतःच्या इच्छेचें दडपण **अर्जुनावर** घालून देवानें त्याला युद्ध करावयास लावलें, ही गोष्ट वेगळी. परंतु **अर्जुनाची** भीति कांहीं खोटी नव्हती, हेंही तितकेंच खरें आहे. **अर्जुनानें** म्हटल्या प्रमाणें:—

**कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।**

आणि

**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ।**

अशी स्थिति लौकरच झाली, आणि शाश्वत असे **कुलधर्म** व **जातिधर्म** उत्सन्न झाले. परंतु देशांत स्वातंत्र्य आणि समृद्धि असल्यामुळें, आणि मनुष्य या नात्यानें त्यावेळचे लोक पतित झाले नसल्यामुळें, सर्वप्रकारें अधःपात होऊन हीनदीन दशा मात्र आली नाहीं. उलट जनतेची भावनाप्रधानता जाऊन हल्लीप्रमाणेंच ती जास्त बुद्धिप्रधान बनली. त्यामुळें आतांप्रमाणेंच विचारसरणीचे दोन प्रबल ओघ राष्ट्रांत निर्माण झाले. मात्र इतकेंच कीं, आतांप्रमाणें ते केवळ परस्पर विरोधी नसून, मनुष्यजीवितार्चें कोडें वेगवेगळ्या दिशेनें सोडविणारे, परंतु मनुष्य या नात्यानें पूर्णपणें परिणत झालेले मानवसमूह होते. त्या काळच्या **बुद्ध** व **महावीर** यांच्या उपदेशाकडे पाहिलें म्हणजे हें उत्तम लक्षांत येतें. व त्या बरोबरच, वैदिक संस्कृतीचा आणि वैदिक मानववंशाचा अभ्यासकरण्यास अनेक प्रकारें अयोग्य असलेल्या पाश्चात्य पंडितांनीं याही ठिकाणीं किती मिथ्या ग्रह उत्पन्न करून ठेवलेले आहेत, हेंही लक्षांत येतें. उदाहरणार्थः–**यज्ञसंस्था**. त्याकाळीं लोकांस यज्ञयागाची चीड आली होती, व **बुद्धानें** यज्ञसंस्थेचा निंद्यपणा दाखवून लोकांस दयाधर्म शिकविला, असा ऐतिहासिक सिद्धांत या लोकांनीं ठरवून टाकला. पाश्चात्य पंडिताप्रमाणेंच आमच्याकडेही वैष्णव वीरांनीं

**' निंदसि यज्ञविधेरहह श्रुतिजातम् ।**
**सदयहृदयदर्शितपशुघातम् ' ॥**

अशा प्रकारें यज्ञसंस्थेचा निषेध केला आहे. परंतु **गौतमबुद्धाच्या** अथवा **जयदेवाच्या** निषेधांत, आणि पाश्चात्य पंडितांच्या विधानामध्यें एक अतिशय महत्वाचा फरक आहे, तो कोणीच लक्षांत घेत नाहीं. तो फरक असा कीं, **गौतमबुद्धानें** जरीं यज्ञाचा निषेध केला आहे, तरी यज्ञसंस्था ही खोटी आहे, म्हणजे अर्थात् यज्ञांतील मंत्र–म्हणजे वेदच–हे खोटे आहेत, असें कोठेंही म्हटलें नाहीं. तर त खरे असले तरी, जीवाच्या खऱ्या कल्याणाच्या दृष्टीनें त्यांना कांहीं किंमत नाहीं, अशा अधिष्ठानावरून म्हटलें आहे. जवळजवळ अशाच प्रकार सुमारें हजार वर्षांनीं **मीमांसक** आणि **वेदांती** यांच्या संबंधानें झाला. वेदांत्यांनींही

मीमांसकांचे ‘ स्वर्गकामो यजेत ’ हे ह्मणजे अर्थात् वेदमंत्र हे खोटे आहेत, असें कोठेंही ह्मटलें नाहीं. तर जीवाच्या परमकल्याणाच्या दृष्टीनें किती झालें तरी ते क्षुद्र आहेत, ह्मणून चित्तशुद्धीपलीकडे त्यांस जास्त महत्व देऊं नये, असें ह्मटलें आहे. हे फरक अतिशय सूक्ष्म आहेत, परंतु त्या काळच्या स्थितीची आणि आजच्या जनस्थितीची तुलना करतांना अतिशय महत्वाचे आहेत. आजकालचे लोक मंत्रशास्त्र, वेद वगैरे सारेच खोटे ह्मणतात, आणि त्यावेळचे लोक, आह्मीं पूर्वी अनेकवेळां ह्मटल्याप्रमाणें, हीं शास्त्रें खरीं आहेत असें गृहीत धरूनही, आपलें ध्येय पालटून, तीं नको असें ह्मणतात. असें होण्याचें कारण, त्या त्या काळीं **ब्रम्हविद्येपेक्षां ब्रम्हज्ञानास** जास्त महत्व आलें होतें, हें होय. हें कसें तें समजण्याकरितां वैदिक धर्माच्या एकंदर घटनेचा अगदीं थोडक्यांत पुन्हा विचार करूं.

ज्ञान आणि विद्या हे शब्द जरी अर्वाचीन संस्कृत वाङ्मयांत व अलीकडच्या काळांत अगदीं समानार्थक समजले गेले आहेत, तरी मूळ वैदिक काळांत त्यांस स्वतःचे असे वेगळेवेगळे अर्थ होते. पैकीं ज्ञान हा सामान्य शब्द असून **विद्या** ही विशेष संज्ञा आहे. विद्या ह्मणजे ज्ञान हें तर खरेंच. परंतु ज्या ज्ञानांत कांहीं विशेष प्रक्रिया आहे, अशा प्रकारचें ज्ञान. संस्कृतामध्यें सारे गत्यर्थ शब्द ज्ञानवाचक असतात. ‘ या ’ ह्मणजे गति, आणि ‘ विद् ’ ह्मणजे कांहींतरी मिळविणें, संपादणें; या दोन धातूंपासून **विद्या** शब्द झाला आहे. ह्मणजे, जेणें करून कांहीं मिळवावयाचें आहे, कांहीं सपादलें जातें, अशी गति ह्मणजे प्रक्रिया ( Process ) ह्मणजे **विद्या**. अर्थात् ही प्रक्रिया ज्ञानरूप असतेच. **छांदोग्य, कौषीतकी**, इत्यादि उपनिषदांत **विद्या** शब्द या अर्थानें वापरला आहे. **तंत्रशास्त्रांत** तर **विद्या** शब्द या विशिष्ट अर्थानेंच वापरला जातो. स्थलसंकोचामुळें आपणांस येथें मूळ सिद्धांतांत जास्त सविस्तरपणें शिरतां येणार नाहीं. **ब्रम्हर्षि अण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्रांतील ‘ स्थित्यंतर, ’ ‘ चातुर्वर्ण्य, ’ इत्यादि प्रकरणांवरून या विषयाची जास्त चांगली कल्पना येईल. एवढें खरें कीं, व्यक्ताव्यक्त सृष्टी ह्मणजे कांहींतरी एक एकमेवाद्वितीयं अशी वस्तु असून, ती एकमेवाद्वितीयं अशा केवळ स्थितिमध्यें, ह्मणजे निर्गुण स्थितिमध्यें राहते, व ‘ सर्वं खल्विदं ’ अशा नानाकारस्वरूपानेंही राहते. आणि या दोन्हीही प्रकारानें तिचें व आपलें पूर्ण ऐक्य अनुभवणें यांचेंच नांव महामुक्ति. हेंच मनुष्यजीवाचें अंतिम साध्य. विश्वाचा आणि मनुष्यजीवाचा संबंध त्याच्या स्वतःच्यामुळेंच आला असल्यामुळें मनुष्यजीवाच्या सर्व संशोधनाचा प्रारंभ स्वतः-

पासूनच होतो. आणि ह्मणूनच 'मी कोण' 'माझ्या भोंवतालचें विश्व हें काय आहे,' व 'त्याचा माझा काय संबंध,' इत्यादि प्रश्नांपासून त्याचें संशोधन सुरू होतें. इंद्रियाच्याद्वारेंच व्यवहार करावा लागत असल्यामुळें स्वतःचें पारतंत्र्य त्यास कळून येतें, इंद्रियें हीं फसविणारीं कशीं आहेत, ह्मणजे अर्थात् त्यांच्याद्वारें प्रतीत होणारें विश्व हेंही 'माया'रूप कसें आहे,–वगैरे त्याच्या लक्षांत येऊन, या सर्व अध्यासांच्या लाटांत त्रिकालाबाधित, अखंड दंडायमान, अशी कांहीं वस्तु आहे कीं काय, तें तो पाहूं लागतो. त्यामुळें व्यतिरेकाची पूर्णता होऊन त्याला स्वतःच्या निर्विकल्पतेची 'अहंब्रह्मास्मि' अशी खूण पटते. कांहींकाळ त्या अवस्थेंत तो राहतो. परंतु विश्व आणि स्वतःचा शोध ज्याच्यामुळें तो करावयास लागतो, तें मूळ कारण ह्मणजे, स्वतःच्या अपूर्णतेची अंतर्गत जाणीव, व पूर्णत्व प्राप्त करून घेण्याची स्वभावसिद्ध अनिवार तृष्णा, हीं अजिबात गेलेलीं नसतात. कारण एकमेवाद्वितीयं असा निर्गुण निर्विकल्प अनुभव आलेला असला, तरी 'सर्वं खल्विदं ब्रम्ह तज्जलानिति,' म्हणजे उत्पन्न होणारे, पुन्हा लीन होणारे, आणि मध्यंच कांहीं काळ स्फुरणारे(तज्जलानिति=तत् ज=जायते+ला=लीयते+अन्=स्फुरणें to breathe)असे हे नानाप्रकारचे अध्यास देखील ब्रह्मरूपच आहेत, ही प्रतीति त्यास यावयाची असते. ह्मणून प्रयत्नबलानें जरी तो निर्विकल्पतेस पोहोंचला, आणि थोडाफार काळ तेथें राहिला, तरी अखेरीस हट्टानें पाण्यांत बुडवून धरलेल्या भोंपळ्याप्रमाणें, उसळी मारून दुप्पट वेगानें बाहेर येतो. आणि ह्मणूनच मुक्त, जीवन्मुक्त, नित्यमुक्त, महामुक्त वगैरे संज्ञा अस्तित्वांत आल्या. यांतील जीवाची परतंत्रता, फसविणाऱ्या इंद्रियाच्या द्वारें प्रतीत होणाऱ्या ज्ञानाची अध्यासरूपता, आणि त्या अध्यासाच्या मुळाशीं असलेलें एकजिनसी ब्रह्मरूप तत्व, या सर्वांच्या ज्ञानास **ब्रह्मज्ञान** असें ह्मटलें. अशा रीतीनें ब्रह्मज्ञान झाल्यावर–ह्मणजे स्वतःची शिवरूपता पूर्णपणें अनुभविल्यावर निजनिर्धारानें नानाप्रकारच्या मोडींत स्वतःस घालून, शक्तिरूपता अनुभवण्याचें जें शास्त्र त्याचें नांव **ब्रह्मविद्या.** अर्थात् उलट क्रमानेंही हीच गोष्ट होऊं शकेल. ह्मणजे, ब्रह्मविद्येच्या अभ्यासानें स्वतःची शक्तिरूपता अनुभवल्यावर, व पूर्णता प्राप्त करून घेण्याची अनिवार तृष्णा शक्तिरूपानें तृप्त करून घेतल्यावरही, ब्रह्मज्ञानानें त्या सर्वांसुद्धां स्वतःची शिवरूपता, व एकमेवाद्वितीयं अशी केवलता अनुभवतां येईल. सारांश, अन्वय आणि व्यतिरेक या, पुढील वाङ्मयांत प्रचारांत आलेल्या संशोधनाच्या दोन प्रथांसधरून, ब्रह्मविद्या

आणि ब्रम्हज्ञान या मूळ संज्ञा आहेत. आचार्यांच्या ह्मणण्याप्रमाणेंही अध्यासरूप विश्वास पारमार्थिक सत्ता नसली तरी व्यावहारिक सत्ता आहेच. व्युत्थान स्थितींतील या व्यावहारिकसत्तेंत मनुष्याचें सारें जीवन, विश्व, समाज, वगैरे सर्व येत असतात. आणि तेवढ्याकरतां इंद्रिय-गोचर विश्व, इंद्रियातीत विश्व, कर्मचक्र वगैरे सर्व गोष्टी जीवाच्या मागें लागतातच. या सर्वांचा हेतु 'सर्व खल्विदं ब्रम्ह' या रीतीनेंही आपली व्यापकता जीवानें अनुभवावी, व पूर्णत्वाची तृष्णा भागवून घ्यावी, हा आहे. त्याच्याकरितां अर्थातच, विशेष तऱ्हेची समाजरचना, मंत्र, योग वगैरे गूढ शास्त्रांप्रमाणें स्वयंसिद्ध असलेले वेद आणि चातुर्वर्ण्य इत्यादि परंपरा उत्पन्न झाल्या, हें आम्हीं मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. परंतु मागें सांगितल्याप्रमाणें या शास्त्रांची प्रत्यक्ष प्रतीति वाटेल त्यास मिळणें कठीण होऊं लागलें, व समाजाच्या सुस्थितीमुळें व सर्व प्रकारच्या उत्कृष्ट शिक्षणामुळें, बहुजनसमाज बुद्धिप्रधान बनला. तेव्हां, अर्थातच, डोळ्यापुढें जेवढें आहे, तेवढेंच मनुष्य पाहूं लागला, व त्यामुळें मनुष्याच्या बुद्धीचें समाधान झाल्याखेरीज त्याला कोणतीही गोष्ट पटेनाशी झाली. परंतु त्याबरोबरच बुद्धीच्या निर्मळतेमुळें व तीव्रतेमुळें, खाण्यापिण्याच्या केवळ सुखानेंहीं त्याचें समाधान होईनासें झालें. अशा वेळीं, त्यास कांहींतरी नवीन धर्म लागणेंच भाग होतें. बुद्धाची उपदेशाची तऱ्हा पाहिली तर, त्यावरून हेंच दिसून येतें. या विश्वाचें वास्तविक स्वरूप काय आहे, त्याचा व जीवाचा खरा संबंध काय, प्रतीत होणाऱ्या स्वरूपापलीकडे कांहीं आहे किंवा नाहीं, असल्या प्रकारच्या कोणत्याही प्रश्नाला तो कधींही सरळ उत्तर देत नाहीं. त्याच्या उपदेशाची सरसहा पद्धति ठरलेली आहे. 'या प्रश्नाशीं तुला काय करावयाचें आहे? विश्वाचें भासमान् स्वरूप चंचल, क्षणिक आणि दुःखमय आहे, त्याच्या योगानें कर्मचक्रांत मनुष्य पडून अखंड क्लेश भोगीत असतो, तेव्हां, त्या विश्वाचा संबंध तूं तोडून टाक, ह्मणजे तुला निर्वाणशांति मिळेल'–हें त्याच्या उपदेशाचें सार आहे. दयाधर्म, अहिंसा, नीति वगैरे गोष्टींवर बुद्धानें भर दिलेला आहे, परंतु तो केवळ कर्मचक्रांतून सुलभपणें सुटका व्हावी, एवढ्यापुरताच आहे. विश्व व आपण एकच आहों, व आपल्या करतांच आपल्याला या सर्वांचा अंगिकार केला पाहिजे, हें तो सांगत नाहीं. त्याचा सर्व भर व्यतिरेकावर आहे. आणि वेद आणि वेदांसधरून असलेल्या सर्व प्रकारच्या परंपरा या तर ब्रह्मविद्येकरतां आहेत. तेव्हां, अर्थातच, इहलोक, परलोक, मंत्रशास्त्र, सिद्धि, कर्मतत्व–इत्यादि

सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी एका अर्थानें त्या अध्यासांतीलच * आहेत, यांच्या योगानें कर्मचक्रांतून तुझी सुटका होऊन तुला निर्वाणशांति मिळणार नाहीं, म्हणून त्यांच्याविषयीं विचार करण्यांत वेळ न गमावतां, निर्वाणशांतीच्या व्यतिरेक मार्गास तूं लाग, असें त्याचें जेथें तेथें सांगणें आहे. आणि म्हणून पहिल्यापासून या गोष्टींस खोटें असें तो म्हणत नाहीं, तर प्रत्येक वेळीं, केव्हां मोठ्या चातुर्यानें मूळ प्रश्नच उडवून देऊन, केव्हां खुबीदार दृष्टांतानें हे वाद निरर्थक आहेत, असें भासवून, केव्हां संध्या, यज्ञ इत्यादि वैदिकक्रियांची अर्वाचीन संतांप्रमाणें विज्ञानात्मक रूपकें बनवून, आणि पात्रानुसार अगदीं क्वचित् प्रसंगीं त्यांची टवाळी करूनही, तो आपला कार्यभाग साधीत असे. प्रत्यक्ष बुद्धाचे उपलब्ध असलेले बहुतेक सर्व उपदेश, हेत्वाभासात्मक आहेत, याचें कारण हेंच. त्यावेळच्या बुद्धिप्रधान समाजाला तें म्हणणें पटणें अगदीं सहजच होतें. आणि त्याच्यामार्गांत लोकांची चोहींकडून सपाटून भरतीही झाली. परंतु त्यांत लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं चातुर्वर्ण्यांतील मनुष्यानें ग्रहस्थाश्रम संपवून ज्याप्रमाणें संन्यासाश्रम घ्यावा, त्याप्रमाणें एक पुढची पायरी म्हणूनच त्या पंथांत त्यावेळीं लोक शिरले. त्यांना प्रतिकार करणेंही त्यावेळीं शक्य नव्हतें. कारण, अतिशय बुद्धिप्रधानतेनें हल्लींच्या पाश्चत्य राष्ट्रांप्रमाणें केवळ जडवादांत पडण्यापेक्षां एकादा धर्म सांभाळून राष्ट्रानें राहणें जास्त चांगलें होतें. म्हणून त्यांचा प्रतिकार न करतां वैदिकधर्मी लोक वरील कुस्तींतल्या दृष्टांताप्रमाणें मागें सरून मुकाट्यानें जागा धरून बसले. स्वतःच्या परंपरा राखणें, गुप्तपणें त्यांचें तेज संभाळणें व संवर्धित करणें, इतकें काम अनेक हाल अपेष्टा सोसून त्यांनीं केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, कालांतरानें बुद्धिप्राधान्याची ही लाट आपोआप ओसरली. कारण बुद्धि ही कांहीं झालें तरी, निरस आणि कर्कश असते. तिच्या वैभवानें मनुष्याचें अंतःकरण घटकाभर दिपून गेलें तरी, अखेरीस त्याचें समाधान कधींच होत नाहीं, व मनुष्याचें अंतःकरण, ज्याची सुखमयता प्रत्यक्ष अनुभवितां येते, अशा सगुणाकडे वळतें ? त्यामुळें राष्ट्र, अनंतकाळ बुद्धिप्रधान राहूं शकत नाहीं. बुद्धिप्राधान्याची लाट ओसरल्याबरोबर त्याचे साहजिकच दोन परिणाम झाले. एक तर असा झाला कीं खालीं दबलेला **वैदिकधर्म** दुप्पट जोरानें वर आला, आणि

---

* हा शद्ब आमचा आहे. बुद्धास हा अर्थातच ठाऊक नव्हता.

दुसरा असा झाला कीं केवळ तत्वज्ञानानें आणि नैतिक तत्वांनीं समाधान होणें अशक्य झाल्यामुळें, बुद्ध धर्मानेंच थोडाफार महत्वाचा फरक करून आणि बहुतेक संज्ञा आणि भाषा यांचा फरक करून वेदिकधर्माचाच स्वीकार केला. **महायान** पंथ हा वैदिक धर्माचीच नक्कल आहे, याविषयीं कांहीं वाद नाहीं. त्याची मूळ पीठिकाही **गणेश व श्रीकृष्ण** यांच्यापर्यंत जाऊन पोहोंचते, हें मागें आलेंच आहे. अशा रीतीनें दोन्हीकडून पेंचांत सांपडल्यामुळें **गौतमबुद्धाच्या** बौद्धधर्मानें जो भारतवर्षांतून पळ काढला, तो अजून त्याकडे त्याच्याच्यानें ढुंकून पाहवत नाहीं. या मधल्या काळांत वैदिकधर्म सांभाळून ठेवणाऱ्या अल्प समाजाचें अर्थातच पुष्कळ हाल झाले असतील. त्याला लुळा खुळा आणि खाबू ह्मणून घ्यावें लागलें असेल, व इतर रीतींनेंही अनेक प्रकारचें दैन्य त्याला सोसावें लागलें असेल. त्याच्या ग्रंथसंपत्तीचाही नाश झाला असावा, असें देखील मानण्यास जागा आहे. परंतु ईतकें सर्व सोसून योग्य काळीं त्यानें आपला प्रभाव पुन्हा प्रकट केला, आणि तोंपर्यंत वैदिक धर्माचें आकलन करण्यास असमर्थ झालेलें राष्ट्र, कोणत्यातरी एका धर्माच्या कक्षेंत राहिल्यामुळें, संपत्तींत लोळणाऱ्या रोमसारख्या इतर राष्ट्रांप्रमाणें, त्याचा सर्वस्वीं अधःपात न होतां, पुन्हा वैदिकधर्माचा स्वीकार करण्यास आणि त्यांतील **ब्रम्हविद्येच्या** परंपरांचा पुनरुद्धार करण्यास तें लायख राहिलें. पुढील पांच सहाशें वर्षांत तंत्रमार्ग, अनेक प्रकारच्या वेदिक उपासना, धर्मांत उत्पन्न झालेलें व्रतवैकल्याचें नवीन अंग, हठयोगी लोकांचा नाथसांप्रदाय, इत्यादिकांची जी वाढ झालेली दिसते, तिचें मूळ खुळचटपणांत नसून, वैदिक धर्माच्या पुन्हा **ब्रम्हविद्ये-कडे** वळण्यांत आहे. त्यानंतर झालेल्या दुसऱ्या ह्मणजे **इस्लामी** आपत्तीच्या काळीं याच्या उलट स्थिति होती. समृद्धतेच्या ऐवजीं, सर्वप्रकारें दैना झाली होती, तिचें वर्णन इतिहासामध्यें रसभरितपणें केलेलें सर्वांस माहीतच आहे. जेथें जीव जगविण्याचीच पंचाईत पडली होती, तेथें कसलें बुद्धिप्राधान्य आणि कसलें भावना प्राधान्य? ' दे माय धरणीं ठाय ' ही एकच भावना त्यावेळीं प्रबल होती. अशा स्थितींत धर्मधुरीण संतांनीं पुन्हा थोडीशी माघार घेऊन **ब्रम्हज्ञान व ब्रम्हविद्या** या दोहींचीही अपेक्षा न करतां ' रक्षिता देव देवांचा त्याचा उत्छाह इच्छिला. ' भागवत धर्माची पताका लावून भक्तिमार्गाचा उद्धार केला. चंद्रभागेच्या वाळवंटांत चातुर्वर्ण्यास थोडीशी विश्रांति घ्यावयास लावली, आणि जिकडे तिकडे सारी सुंता होण्यापेक्षां रहीम हाही आमचा रामच आहे, असें शिकवून ' राम ' ह्मणून मलंग

फकीरापुढें वांकावयास शिकविलें. सारांश असा कीं नाइलाजास्तव सर्व समाज जवळजवळ जरी इस्लामी वळणावर गेला होता, आणि सावित्रीपातित्यापर्यंत पुन्हा स्थिति आली होती, तरी आचार, विचार आणि उच्चार यांतील वैदिकधर्माचें तत्व जीव धरून राहील असें केलें, व प्रत्येक क्षणाला जरी आपला आचार इस्लामी असला तरी आपण वैदिकधर्मी आहों, व कांहीं काळानें आपत्तींतून वर डोकें काढून पुन्हा वैदिक आचार विचारांनीं जगांत वावरूं, अशी स्फूर्ति अंतःकरणांत अखंड जागृत ठेवली. कालांतरानें राजकीय परिस्थितीमुळें महाराष्ट्रांत मुसलमानी पकड ढिली पडून वैदिक-धर्मास आपल्या मूळ स्वरूपाची आठवण झाली. **श्रीसमर्थांचें** दिव्य चरित्र, ५८ वर्षांचा त्यांचा प्रचंड व्याप, ' मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥ ही त्यांची शिक्षणपद्धति, हिंदुस्थानभर पसरलेले त्यांचे शेंकडों मठ, ' दोन्ही सामर्थ्यें एकवटतीं । प्रत्यक्ष काळास नाटोपितीं ' हें त्यांचें स्वानुभवाचें सांगणें, आणि भक्तांच्या साभिमानतेनें निघालेलीं समर्थ-कृपेचीं वचनें, हा सर्व त्याचाच परिणाम होय. परंतु दुर्दैवानें असें झालें कीं महा-राष्ट्राखेरीज इतर ठिकाणीं मुसलमानी अंमल अधिक जोरांत होता, त्याच्याशीं झगडून पूर्वपरंपरा प्रस्थापित करण्याइतके **समर्थांचे** मठ बलवान् व **समर्थांच्या** उपदेशांस धरून परंपरा प्रसविणारे असे होण्यापूर्वीच, त्रिंशद्वार्षिक युद्धाची जीवा-पाड आपत्ति येऊन पडली. त्यामुळें महाराष्ट्रास स्वतःचें राजकीय आस्तित्व टिकवितां टिकवितांच पुरेवाट झाली. स्वराज्याचा गाडा मोठी शर्थ करून त्यानें धडपणें बाहेर काढला, हीच त्याची धन्य होय. खुद्द महाराष्ट्रांतच त्यामुळें **सम-र्थांच्या** मठांचें खरें स्वरूप पालटून गेलें, एकमेकांशीं व महाराष्ट्राच्या बाहेरील मठाशीं त्यांचें दळणवळण तुटून गेलें. अशा स्थितींत घरींच माल तयार होईना, तो दूरच्या पेठांस कोठून पुरवला जाणार ? अशी साहजिकच स्थिति झाली. त्यामुळें, मागील उदाहरणांतल्याप्रमाणें मुसलमानी धर्माचा अजिबाद पाडाव करून, **ब्रह्म-विद्येच्या** उद्धारानें स्वतःचें तेज वाढवून बुद्धधर्माप्रमाणें त्याची हकालपट्टी करण्याचें अर्थातच राहून गेलें. हा एक प्रारब्धाचा खेळ झाला. परंतु कांहीं झालें तरी स्वराज्यामुळें पुन्हा धर्मास थोडेसें बाळसें आलें. परंतु भारतवर्षाचें दुर्दैव संपलें नसल्यामुळें, मागें सांगितल्याप्रमाणें तीस वर्षांच्या जिवापाड मेहनतीनंतर, स्वराज्यांतील लोकांस एकदम मिळालेली स्वस्थता, आणि भारती युद्धासारखाच पानिपतचा प्रचंड आघात, यांमुळें पुन्हा अधःपात झाला. त्यानंतर इंग्रेजशाहीनें

कुटिल राजनीतीनें, उंदीर फुंकून फुंकून रक्त काढतो त्याप्रमाणें, समाज सर्वप्रकारें निःसत्व करून, हल्लींची स्थिति आणून ठेवली. अशा स्थितींतही पूर्वींच्या अनेक प्रसंगांप्रमाणें अस्सल वैदिकधर्म काम पडल्यास थोडीशी माघार घेऊन, व नानाप्रकारच्या हालअपेष्टा सोसूनही, आपल्या परंपरांचें रक्षण करीलच, आणि अल्पकाळानें पारतंत्र्याची व दास्यदुर्बलतेची लाट ओसरल्यावर पूर्वीपेक्षांही अधिक तेजस्वितेनें पुन्हा डोकें वर काढील, याविषयीं आह्मांस तर तिळप्रायही शंका नाहीं. परंतु त्या शुभमंगल प्रसंगीं, बौद्धधर्माच्या कक्षेंत राहून कां होईना, पुन्हा वैदिकधर्माचें ग्रहण करण्यास आमचा समाज पात्र राहिला, तसेंच व्हावें, व समर्थांची शिकवण पारतंत्र्यानें जवळजवळ मरून गेलेल्या समाजाला चटकन् उचलून धरतां न आल्यामुळें, त्यांनीं उत्पन्न केलेल्या तेजाचें संवर्धन न होतां, जसें तिरोभवन होऊन गेलें, तसें होऊं नये ह्मणून, हे जे आमचे प्रतिपक्षी लोक आहेत, त्यांना जरी वैदिकधर्माचें अस्सल स्वरूप झेंपत नसलें तरी, केवळ बुद्धिवादांत त्यांनीं न राहतां, आणि केवळ जडवादांत लोळत न पडतां, त्यांना पचनीं पडेल अशा वैदिकधर्माच्या कोणत्या तरी स्वरूपांत आर्यसमाजाप्रमाणें रहावें, असें आह्मांस मनापासून वाटतें. ह्मणूनच त्यांनींही आपला एक व्यवस्थितधर्म स्थापन करावा असें आह्मी त्यांस कळकळीनें ह्मणतों. त्यामुळें कांहींकाळ जरी आम्हांस सुसंघटित अशा घरच्या व बाहेरच्या अशा दोन बलिष्ट प्रतिस्पर्ध्योंशीं झगडा करावा लागून, न भूतो न भविष्यति असे आमचे हाल झाले, तरी ते आम्ही मोठ्या आनंदानें पत्करूं. कारण त्यामुळे पुन्हा डोकें वर काढीपर्यंत जी काय कळ सोसावी लागेल तीच. पण एकदां तो क्षण आल्यावर, बौद्धधर्माच्या प्रसंगाप्रमाणेंच आमचें कार्य सुलभ व झपाट्यानें होईल, आणि गेलेला सर्व प्रांत पुन्हा जशाचा तसा आमच्या कक्षेंत येईल. सारांश इतकेंच कीं बुद्धितत्वाची एकांगी वाढ आणि इंद्रियजन्य सुखाचा ध्यास यांचें प्रमाण बेसुमार वाढल्यामुळें समाजाच्या फार मोठ्या भागास वैदिकधर्म त्याच्या वास्तविक स्वरूपांत झेपेनासा झाला आहे, हें खरें. हे सर्वच लोक केवळ नास्तिक व अप्रामाणिक आहेत असेंही ह्मणतां येत नाहीं. त्यांच्यांतही कित्येक लोक प्रामाणिक आहेत, परंतु, जशी ज्याची बुद्धि असेल, तिच्या सांच्यांत कोणतीही गोष्ट पूर्णपणे बसल्याखेरीज, पुढें त्यांचें पाऊलच पडत नाहीं. अशा लोकांस बुद्धधर्मासारख्या एकाद्या केवळ तत्वप्रधान धर्माची आवश्यकता आहे, आणि तशा एकाद्या स्वरूपांत वैदिक धर्माची मांडणी होऊन कांहीं काळ, पुन्हा पूर्वीप्रमाणें दोन निरनिराळे प्रवाह वाहूं लागतील. प्रत्येकानें आपल्या मगदुरा-

प्रमाणें कोणत्या तरी एका प्रवाहांत स्वतःस टाकावें, आणि इमानें इतबारें परिश्रमपूर्वक स्वतःची वाढ करून घ्यावी, म्हणजे बाकीचे प्रश्न काळाच्या ओघानुसार पाहिजे तसे अनायासें सुटतील, असें आम्हांस वाटतें. आतां उरलेली एक शंका जी सारींच शरीरें निरूपयोगी झालीं असतां हीं सर्व वाद्यें बसवावयाचीं तरी कोणत्या सुरांत? आणि कोणी? हिच्या संबंधानें कांहीं मोठासा विचार करावयास नको. याचें कारण असें कीं, कितीही अधःपात झाला असला तरी, त्या अधःपातांतही आपली जागा घट्ट धरून ठेवण्याचा ब्राह्मण समाजानें आतांपर्यंत पराकाष्ठेचा यत्न केला आहे, व त्यामुळें ब्राह्मणांचीं शरीरें अद्यापि संघटनेच्या इतर कोणत्याही जातीपेक्षां अधिक शुद्ध व पूर्वपरिस्थितीस धरून आहेत. तेव्हां, पुनरुज्जीवनाच्या या काळांत, वाटेल त्या तऱ्हेनें कल्पना बसवून चार वर्ण निर्माण करण्याची घाई न करतां ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर एवढाच भेद समजून ब्राह्मणांनीं वेदांच्या सहाय्यानें आणि ब्राह्मणेतरांनीं उपासना, योग व ब्राह्मणांच्या साह्यानें आयतें मिळविलेलें वेदांचें साह्य, यांच्या योगानें आपापलीं शरीरें शुद्ध करून घ्यावीं; म्हणजे दोन्हींही वर्गांत खऱ्या अधिकारी लोकांची वाढ जास्त झाल्यानें आपोंआपच एकमत होऊन त्यांतून **चातुर्वर्ण्य** संस्था निर्माण होईल.

याप्रमाणें गेल्या प्रकरणाच्या आरंभीं उपस्थित केलेल्या कांहीं प्रश्नांच्या विचारांची एक विशिष्ट दिशा दाखविली. तिला धरून, उत्पन्न होणारे सारे प्रश्न अमुक अमुक रीतीनें सोडवावे, हा बोध अर्थातच यापासून होणार नाहीं. आम्हीं सांगितलेंच आहे कीं, या दिशेनेंही त्यांतील प्रत्येक प्रश्न कसा सुटणें शक्य आहे, याचा विचार करावयाचा म्हटलें म्हणजे तरी प्रत्येकाकरितां एक वेगळा स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल. सर्वप्रेरक मंगलमूर्ति परमात्म्याची इच्छा असल्यास तसेंही घडून येईल. परंतु तोंपर्यंत, या स्वल्प सेवेवरच संतुष्ट राहिलें पाहिजे. हल्लींच्या मतमतांतराच्या गलबल्यांतून, आम्ही म्हणतो त्याप्रमाणें, अथवा दुसऱ्या कोणत्या रीतीनें कांहींतरी पुन्हा व्यवस्था होणें, हें कार्यही अर्थात् चुटकीसरसें होणारें नाहीं. त्यालाही पुष्कळच वेळ लागावयाचा आहे. आणि सर्व प्रकारच्या लोकांना अनेक प्रकारचा अपूर्व त्याग करावा लागणार आहे. तेव्हां साहजिकच असें मनांत येतें कीं, हें सर्व होईल तेव्हां होईल; परंतु तोंपर्यंत तरी, ज्यांना हें याच तऱ्हेनें व्हावें असें वाटतें, त्यांनीं काय करावें? सध्यां जास्त महत्वाचा हाच प्रश्न आहे. तेव्हां या प्रश्नाचा पुढील प्रकरणांत थोडक्यांत विचार करून, तात्पुरती तरी वाचकांची रजा घेऊं.



## प्रकरण ५ वें.

# व्यक्तिधर्म.

मागील प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें या प्रकरणांत, राष्ट्रीय अनवस्थेच्या वेळीं व्यक्तीनें काय केलें पाहिजे, या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. कोणत्याही गोष्टीसंबंधानें, ती करणें योग्य आहे किंवा नाहीं, असा प्रश्न उपस्थित झाल्यास त्याचा निकाल कसा लावावा, याचा विचार **भगवद्गीते**मध्यें आहे. स्वतः **भगवद्गीतेची** उत्पत्तीच एका मोठ्या महत्वाच्या प्रसंगीं, त्यांत सांपडलेल्या माणसांनीं काय करावें, हें सांगण्याकरितां झालेली आहे. त्यामुळें, अर्थातच, अशा प्रकारची अडचण व्यवहारांत केव्हांही कोणास उपस्थित झाल्यास, तिच्यांतून वाट कशी काढावी, असा प्रश्न भाषणाच्या ओघांत आला. त्याचें सामान्य उत्तर **भगवंतांनीं** देऊन ठेवलें. सोळाव्या अध्यायामध्यें **दैव** व **आसुर** या दोन गुणसंपत्तींचें वर्णन करून, **आसुरी** संपत्ती ही मनुष्याचा अधःपात करून त्याला उत्तरोत्तर तमोमय अशा अधिकाधिक अधोगतीला नेणारी अथवा नरकवास घडविणारी आहे, असें सांगितलें आहे. आणि या **आसुरी** संपत्तीचें सर्व सार ह्मणून—

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामःक्रोधस्तथा लोभस्तस्मात् एतत्त्रयं त्यजेत् ॥**

असा सिद्धांत सांगितला आहे. कारण, शास्त्रविधीला सोडून कामकारता करणाऱ्या लोकांस, ह्मणजे नानाप्रकारचा बुद्धिवाद करून मन मानेल तसा स्वैराचार करणाऱ्या मोहमूढांस सिद्धि, सुख, अथवा उत्तमगति यांतील कांहींही मिळणें शक्य नाहीं, असें सांगितलें आहे. सिद्धि ह्मणजे, या ठिकाणीं, मनुष्यानें सर्व प्रकारचे पराक्रम करून वैदिकधर्माप्रमाणें जें कांहीं आयुष्यांत साधावयाचें तें. ह्मणजे, आनृण्यपूर्वक मोक्ष. हा तर मिळत नाहींच, पण उलट सुखही मिळत नाहीं, ह्मणजे, खरोखर सुख काय आहे, हेंच ठाऊक नसल्यामुळें, सुखाचीं सर्व साधनें जरी त्यानें मिळविलीं असलीं, तरी त्याचा खरा परिणाम ह्मणजे सुख होणें, त्याचा त्याला कधींच अनुभव येत नाहीं. कारण ज्या ठिकाणीं सुख व्हावयाचें, तें त्याचें अंतःकरण, ' अनेकचित्तविभ्रांत ' असल्यामुळें, त्याला सुख लागणें शक्यच नसतें. परंतु,

' ईश्वरोऽहं अहंभोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी ।

आढ्योभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया । अशा प्रकारच्या मोह-जालांत ' मोदिष्ये ' असें अंतःकरणांत घोंकीत बसणें, एवढेंच त्याचें सारें सुख असतें. आणि ह्मणूनच एका प्रसिद्ध इंग्रजी कवीनें

Hope eternal springs in every breast
Man never is, but always to be blest

(मनुष्य खरोखर सुखी कधींच होत नाहीं. वासना पूर्ण होऊन आपणास सुख मिळेल अशी जी आशा त्याच्या हृदयांत अखंड स्फुरत असते त्या आशेच्या आनंदांतच तो नाचत असतो. )

असें **भगवद्गीते**प्रमाणेंच स्वानुभवावरून मनुष्याचें वर्णन केलें आहे. सिद्धि आणि सुख नाहीं, तर अंतीं उत्तम गति मिळेल असें ह्मणावें, तर तेंही नाहीं. क्षात्रधर्माची एक कल्पना उराशीं धरून अखंड अमर्षानें जळणाऱ्या **दुर्योधनास** निश्चिंतपणानें सुखाचा उपभोग कधीं घटकाभर तरी घेतां आला असेल कीं नाहीं कोण जाणे. सिद्धि ह्मणावी तर, सर्व प्रयत्नांचा विपर्यास होऊन कौरव कुळाचा समूळ नाश झालेला, डोळ्यानें पाहून धुळींत तडफडत त्यानें प्राण टाकला. परंतु असें असूनही, त्याला गति मात्र उत्तम मिळाली. पौराणिकांच्या भाषेंत ह्मणावयाचें ह्मणजे स्वर्गाच्य सिंहासनावर तो **धर्माच्याही** आधींच जाऊन बसला. याचें कारण असें कीं, तो कसाही वागला असला तरी त्याच्या अंतःकरणाची एक धारणा फार जबरदस्त होती. ती हीच कीं, आपण हें सर्व व्यक्तीकरतां करीत नसून, क्षात्रधर्माचें यथाशास्त्र कमालीचें आचरण करण्याकरितां करीत आहों. ह्मणजे त्यानें सुख आणि सिद्धि गमावली परंतु उत्तम गति तरी मिळविली. याचें कारण शास्त्रविधीविषयीं त्याची कल्पना जरी चुकली असली, तरी त्यानें ' कामकारता ' मात्र केली नाहीं. 'यथानियुक्तोऽस्मि तथाचरामि' या प्रमाणें स्वतः व्यक्तिशः तो केवळ यंत्र बनून राहिला होता. परंतु जे लोक सोळाव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें **आसुर**भाव धरून, शास्त्रविधीही सोडतात, आणि व्यक्तिशः कामकारतेचीही पराकाष्ठा करतात, त्यांना सिद्धि सुख अथवा उत्तमगति, यांतील कांहींही न मिळतां, त्यांचा घोर अशा नरकांत निरंतर वास व्हावा, हें नियतच आहे. ह्मणजे सृष्टीधर्मास अनुसरूनच आहे. ह्मणूनच या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत " तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ " असा सिद्धांत सांगून, शास्त्रविधानोक्त कर्म तर केलेंच पाहिजे, पण तें ' ज्ञात्वा '

ह्मणजे शास्त्राचें तत्व जाणून, केलें पाहिजे, अशी सूचना देऊन ठेवली आहे. तत्व समन्वयाची कसोटी न धरतां केवळ ' वचनात्प्रवृत्तिर्वचनात् निवृत्तिः ' अथवा, केवळ ऐतिहासिक दृष्टि, या दोनही प्रकारांनीं उपयोगांत आणलेलें शास्त्रप्रामाण्य केवळ **आसुर**भावाप्रमाणें उत्तरोत्तर अधम गति देणार नाहीं, असें जरी असलें, तरी, सिद्धि, सुख आणि उत्तमगति या तिन्ही श्रेयांची प्राप्ति करून देणार नाहीं, त्यांत कांहीं ना कांहीं तरी हानिच करील. असाच याचा अर्थ आहे. आणि ह्मणूनच या सिद्धांतावर एक शंका साहजिकपणें निघाली. तीच **अर्जुनानें** पुढील अध्यायाच्या प्रारंभीं विचारली. वरील **दुर्योधना**च्या उदाहरणानें आह्मीं तिचा आधींच उल्लेख केला आहे. सत्राव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकांत ' श्रद्धा ' व ' निष्ठा ' हे शद्ब वेगवेगळ्या अर्थानें वापरले आहेत, हेंही लक्षांत ठेवण्याजोगें आहे. शास्त्रविधि तर सोडून देतात, परंतु कामकारतां मात्र करीत नाहींत, ह्मणजे स्वैरवर्तन करण्याकरतां कोणत्याही प्रकारच्या मनोदुर्बलतेनें शास्त्रविधी सोडीत नाहींत, परंतु अज्ञानासारख्या अथवा आपत्धर्मासारख्या अपरिहार्य कारणानें तो निरुपायानें सुटतो, परंतु जिवा-भावानें शास्त्रविधीप्रमाणें आचरण करण्याची इच्छा असते, इतकेंच नव्हे तर, आपण शास्त्राला धरूनच चाललों आहों, अशीच जेथें श्रद्धा असते, त्या लोकांची वाट काय, असा हा प्रश्न आहे. मनुष्याला सत्व, रज आणि तम या त्रिगुणांच्या अधिष्ठानाप्रमाणेंच कर्माचें फल मिळतें, असें चौदाव्या अध्यायांत सांगितलें आहे. त्याला अनुलक्षून, अशा लोकांच्या पदरांत काय पडणार, हें समजण्याकरतां ' तेषां निष्ठा तुका कृष्ण ' ह्मणजे हे भगवान् या लोकांच्या निष्ठेस ह्मणजे वर्तनास ( निष्ठा ह्मणजे अनुष्ठेय तात्पर्य ) काय ह्मणावें, असा प्रश्न केला आहे. त्याचें उत्तर **श्रीकृष्णांनीं** सरळपणानें असें दिलें आहे कीं कोणत्याही कारणानें कां होईना, एकदां शास्त्रदृष्टि सुटली ह्मणजे अर्थातच निवळ श्रद्धेवर काम येतें. आणि ती जर खरी असली, तर ती मनुष्याच्या स्वभावाला धरूनच असणार, हें उघड आहे. परंतु मनुष्याचा स्वभाव हाही, ज्या घटक परमाणूंचीं त्याचीं शरीरें बनलीं असतील (ह्मणजे स्थूल व सूक्ष्म ) त्या परमाणूंचा, अनेक पदार्थांनीं बनलेल्या पक्वान्नाच्या एका विशिष्ट स्वादाप्रमाणें एकत्रित परिणाम आहे. ह्मणून स्वभावज अशी श्रद्धा सत्वा-नुरूप असते, व मनुष्य हा श्रद्धामयच असल्यामुळें, सत्व आणि स्वभाव यांना धरून श्रद्धा व स्पटिकमणीन्यायानें पुरुषही त्रिगुणात्मक असतो. अर्थात् त्याचें फळही सृष्टीशास्त्रास धरून, चौदाव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें, तीन प्रकारचें

मिळतें. त्याचें ठळक उदाहरण ह्मणून **दुर्योधना**चा वर आपण उल्लेख केला. सारांश, कामकारता न करतां शास्त्राचें तत्व जाणून त्याच्या विधीप्रमाणें वर्तन करणारास सिद्धि, सुख, आणि उत्तम गति हीं प्राप्त होतात. ह्मणून कार्याकार्याचा विचार पडला असतां मनुष्यानें शास्त्र प्रमाण मानून पाऊल टाकावें असा मूळ सिद्धांत. परंतु, येथें अशी अडचण पडते की शास्त्र ह्मणजे तरी काय ? शास्त्र हें अनंत आहे, व गहन आहे. तेव्हां त्याचा विचार करण्याइतकी बुद्धि तरी प्रत्येकाजवळ कोठून असणार ? आणि त्याचा शांतपणें विचार करून एक निर्णय करण्याइतका अवसर तरी कार्या-कार्याच्या वेळीं असणार कोठून ? कारण कार्याकार्यांचे कित्येक प्रसंग तर असे असतात कीं, त्यांचा निकाल चुटकीसरसाच लावावा लागतो. पुराणांत अशी कथा आहे कीं एक विषयार्त स्त्री **रुक्मांगद** राजाकडे जाऊन त्याच्यापाशीं विषय-शांतीची याचना करूं लागली. राजास मोठा विचार पडला, कीं आतां या ठिकाणीं कार्य कोणतें आणि अकार्य कोणतें ? त्या स्त्रीची वासना पूर्ण करावी तर तपोभंग होऊन, वर पुन्हा पाप लागणार. बरें, तिला झिडकारून टाकावें तर तिच्या अंःतकर-णाच्या तळतळाटानें आपलें कांहीं तरी अकल्याण होणार. अशा स्थितींत काय पत्क-रावें ? त्यानें स्वतः शास्त्रास धरून तिचा तळतळाट पत्करला, आणि सृष्टीच्या नियमाप्रमाणें जरी त्याला तिचा तळतळाट थोडाबहुत बाधला तरी त्यांतून तो लौकरच मोकळा होऊन, त्या एकंदर प्रसंगापासून, त्याचें अधिक कल्याणच झालें, हा भाग वेगळा. परंतु, प्रस्तुत आपला मुद्दा एवढाच आहे कीं, असल्या नाजूक प्रसंगीं शास्त्र आणावयाचें कोठलें व कसें ? बरें शास्त्राकडे पहावें तरः—

**श्रुतिर्विभिन्ना श्रुतयोऽपि भिन्ना**
**नैको मुनिर्यस्य मतं प्रमाणम्** ॥

अशी त्यांची अत्यवस्था सुप्रसिद्धच आहे. अशा स्थितींत ‘ गुहानिहित ’ धर्म-तत्वाचा बोध होऊन कार्यव्यवस्थिति निश्चित व्हावी कशी ? असें असतां शास्त्र-प्रामाण्यानें कार्याकार्याचा निकाल ठरवावा, ही जवळजवळ स्वस्कंधारोहणासारखी गोष्ट **श्रीकृष्णांनीं** सांगितलीच कशी ?

वर दिसावयास हा आक्षेप अगदीं खरा आहे. परंतु थोडका बारकाईनें विचार केला तर, असें दिसून येतें कीं **श्रीकृष्णांनीं** कांहींही विलक्षण गोष्ट सांगितली नाहीं. जें योग्य व वैदिकधर्माच्या तत्वास धरून, तेंच त्यांनीं सांगितलें. तें कसें हें समजण्यास या विषयींच्या **आसुरभाव** आणि **शास्त्र** या दोनही

शब्दांचा विचार केला पाहिजे. यापैकीं **असुर** शब्दाची मूळ पीठिका वेदांमध्यें असून, तेथें त्याचा उपयोग **अदिति, असत्** वगैरे त्याच्या इतर भाईबंदांबरोबरच विशेष अर्थानें केलेला आहे. त्याचा इतिहास थोडासा मनोरंजक आहे. नयर्थी ' अंचें अलीकडील कोषांत पांच सात अर्थ सांपडतात. जसें अपुत्र म्ह० अप्रशस्त ( वेडगळ ) पुत्र; त्याचप्रमाणें या 'अ'काराचा **ऋग्वेदांत** थोड्या विशेष अर्थानें उपयोग केलेला आढळून येतो. 'अति' या उपसर्गाचा ज्याप्रमाणें एकाद्या गोष्टी पलीकडील म्ह० तिच्याहून श्रेष्ठ, तिच्या आटोक्यांत न येणारा, असा अर्थ आहे, त्याप्रमाणेंच त्याच अर्थानें 'अ' चा उपयोग केलेले कांहीं शब्द वेदांत आढळून येतात. केवळ एकाद्याचें आस्तिक्य अथवा नास्तिक्य दाखविण्यापलीकडे कांहीं गुणधर्मांच्या अपेक्षेनें तो तसा नाहीं, असें म्हणावयाचें, म्हणजे त्यांतून साहजिकच दोन अर्थ संभवतात. एक तर तो त्यांच्या फार खालीं आहे, किंवा त्यांपेक्षां अतीशय उच्च आहे. अतएव, त्याच्या कक्षेंत न सांपडण्याजोगा आहे, असा अर्थ होतो. या दुसऱ्या अर्थानें नञर्थी 'अ' चा उपयोग केल्याचीं उदाहरणें अर्वाचीन संस्कृतांत व खुद्द **ऋग्वेदांत**ही आढळतात. उदा० असह्य. म्हणजे सहन करण्यापलीकडचा. अग्राह्य शब्दाप्रमाणें सहन करण्यास अयोग्य असा नव्हे. अशाच प्रकारें वेदांत **असुर, अदिति**, असत्, नकंकत् वगैरे शब्दांचा उपयोग केला आहे. सर्पसूक्तांतील ' कंकतो नकंकतो ' याचें भाषांतर रा. **पटवर्धनांनीं** साधारण विषारी, अथवा महाविषारी, म्ह० साधारणापलीकडील असेंच केलें आहे. अशा प्रकारच्या मूळ अर्थानें हे शब्द उपयोजिले असतां, पुढें 'अ'च्या नञर्थाचेंही त्यांत मिश्रण होऊन, पुढील काळांत, म्ह० खुद्द उपनिषदांत देखील या जोड्या वेगवेगळ्या अर्थानें उपयोगांत येऊं लागल्या. पैकीं सत् आणि असत् या शब्दांनीं तर फारच गोंधळ केला आहे. **सुर** या सहाव्या गणाच्या धातूपासून प्रथमतः **सुर** शब्द बनला. सुर् म्ह० नियंत्रण करणें, नियमन करणें, व्यवस्था लावणें. * ज्या लोकांच्या आयुष्यांना अशा प्रकारचें नियंत्रण आहे, ज्यांचें अस्तित्व नियमबद्ध आहे, ते **सुर**. म्हणून सर्व नियंत्रणापलीकडचा जो सर्वांचा नियंता जो कोणत्याही

---

* ' व्यवस्थापक समीति ' याचें द्योतक रोमन इतिहासांत आढळणारा Commitia Curia, या शब्दांतील Curia शब्द या ' सुर् ' पासूनच निघाला आहे.

नियमानें बद्ध होऊं शकत नाहीं, तो आदितत्व, परमेश्वर परमात्मा, देवाधिदेव ह्मणजे **असुर.** त्या महादेवाचें वर्णन करतांना नेहमीं **ऋग्वेदांत असुर** शब्द वापरला आहे. **असुर** शब्दाचा हा अर्थ जरी नव्हे, तरी त्याच्या उपयोगतील हा विशेष लक्षांत घेऊन, भाषांतरकारांनीं, त्या त्या ठिकाणीं, त्याचें **'ब्रह्म'** शब्दानें भाषांतर केलें आहे. हालचाल करूं लागणाऱ्या प्राणतत्वास वायु हें नांव प्राप्त होण्यापूर्वी मूलस्वरूपांतून व्यक्त झाल्याबरोबर त्याची जी विशेष अवस्था ती 'तनूनपात्' असें सांगतांना '**तनूनपात् उच्यते गर्भ आसुरः**' असेंच सांगून ' वातस्य सर्गो अभवत् सरीमणिः ' असें ह्मटलें आहे. हा **आसुर** शब्दाचा उपयोग पुढील काळांत नाहींसा झालेला दिसतो. **पार्श्यांच्या अवेस्तांत असुर** शब्द या मूळ अर्थानेंच वापरलेला आहे. त्यामुळें **असुर** शब्दाचे हे विशेष उपयोग, ही **पारशांची** व आमची फाटाफूट ज्या काळांत झाली, तो काळ दाखविणारी खूण होऊं शकेल. **तैत्तीरिय** संहितेंत **असुर** शब्दाचा उपयोग दैत्य या अर्थानें केला आहे. जसें ' हंतासुराणां अभवत शचीभिः '. खुद्द **ऋग्वेदामध्यें असुर** शब्दाचा अशाच अर्थानें निश्चित उपयोग केला आहे कीं काय, तें पाहिलें पाहिजे. याच प्रमाणें **दिति अदिति** व **देव अदेव** इत्यादि जोड्या आहेत. **दिति** ह्मणजे प्रकाश. मनुष्यांतील प्रकाशरूप तत्व जें बुद्धि तिचा पराकाष्ठेचा विकास ज्यांच्या ठिकाणीं झाला, व ज्यांच्या सामार्थ्याचें आणि वैभवाचें मूळ साधन, हा प्रकाश होय, ते **देव** * अथवा **दैत्य.** या मानवी बुद्धीच्या पलीकडे असलेली जी स्वयं प्रकाश अंतःस्फूर्ति तिचें नांव **अदिति.** § आणि या अंतःस्फूर्तीतून ज्याच्या सामर्थ्याचा उगम झाला आहे, ते **अदित्य.** अशा प्रकारचे आणखीही कित्येक

---

* ' देव ' शद्बाचा हा अर्थ ऋग्वेद काळींच लुप्त झाला होता. ' असुर ' शद्बही आपला मूळ अर्थ कोठें कोठें सोडीत असून त्याच्या अपेक्षेनें ' सुर ' शब्दास वेगळा अर्थ येऊं लागला होता. पार्श्यांत मात्र ' असुर ' व ' दइव ' हे दोनही शद्ब मूळ अर्थाचे आहेत. यावरून त्यांच्या आमच्या फाटाफूटीचा काळ किती पुरातन आहे तें लक्ष्यांत येईल.

§ सार्थ महाभारताच्या १ ल्या भागाच्या ' समालोचनें ' त भारताचार्य वैद्य यांनीं ' अदिती ही वैदिक देवता काय आहे हें गूढ अद्याप निश्चित उकललें. नाहीं ' असें म्हटलें आहे. त्याचें कारण उघडच आहे!

शद्ब सांपडतील, पण त्यांचा शोध केला पाहिजे. हल्लींच्या काळीं असलेला ' अ ' चा अप्रमाण ह्मणजे जें प्रमाण मानलें जात नाहीं तें अशा अर्थीही अचा उपयोग त्याकाळीं नव्हता असें नाहीं. परंतु मुद्दा एवढाच कीं **ऋग्वेदा**मध्यें दोनही अर्थांनीं ' अ 'चा उपयोग केलेला आढळतो, आणि त्यानंतरच्या वाङमयांत तो या अतीत्वाच्या अर्थानें केलेला फारसा आढळून येत नाहीं. **ऋग्वेदां**तील एका वाक्यांत अशा अर्थानें ' अ ' च उपयोग केलेला मोठा गमतीदार आढळून येतो. , **अनायुधासो असुरा अदेवा श्चक्रेण तां अपवपऋजीषिन्** ' ( मं. ८ सू. ८५ऋ९ ) या ठिकाणीं रा. **पटवर्धनांनीं** ' अनायुधासो ' याचें ज्यांच्याजवळ हत्यार राहिलें नाहीं असे, ' **असुरा** ' ह्म० **असुरदेशीय** व ' अदेवा ' म्ह० देवाला न मानणारे असें भाषांतर केलेलें आहे. तें बरोबर नसावेंसें वाटतें. **ऋग्वेद** कालीन तेजस्वी लोकांना, ज्यांच्या जवळ हत्यार उरलें नाहीं, असल्या लोकांना छाटून टाकण्याकरतां देवाच्या साह्याची काय गरज होती ? तो तर त्यांच्या हातचा मळ होता. असें असतां, देवास साह्यास हांक मारतांना ' हे शत्रु अनायुध आहेत ' असें मुद्दाम ह्मटलें आहे, त्या अर्थी त्या अनायुध शद्बाचा जोर वेगळा आहे, हें उघड आहे. तशीच गोष्ट असुर शद्बाचीही आहे. प्रादेशिक अर्थानें **असुर** शद्बाचा उपयोग केलेला **ऋग्वेदांत** इतरत्र कोठेंही आढळून येत नाहीं. अदेव याचा अर्थ रा. **पटवर्धन** यांनीं ह्मटल्याप्रमाणें ' देवास न मानणारे ' हा योग्य दिसतो. परंतु तो देखील स्वतःस देवापेक्षांही अधिक समजणारें ' असा असूं शकेल. आमच्या समजुतीप्रमाणें या ऋचेचा सरळ अर्थ असा आहे कीं ' हे **इंद्र**, हे आमचे प्रतिस्पर्धी कसल्याही शस्त्रास्त्रांना न जुमानणारे, ह्मणजे अर्थात् अशीशय प्रबल, त्याचप्रमाणें, **असुर** ह्मणजे ज्यांच्या वागण्यास कांहीं ताळतंत्र नाहीं, ह्मणजे सर्व प्रकारच्या नियमधर्मांना धाब्यावर बसविणारे, आणि अदेव ह्मणजे स्वतःला देवापेक्षांही अधिक समजणारे म्ह० पराकाष्ठेचे उन्मत्त असे आहेत. ह्मणून आमच्या साह्यास येऊन तूं त्यांचें निर्मूलन करून टाक, ' असा असावा **मुसलमान** किंवा **हूण** लोकांच्या चढत्या काळांत देखील पादाक्रांत लोकांनीं यापेक्षां दुसरें काय ह्मटलें असतें ? असो. सारांश, हा **असुर** शद्ब या मूळ अर्थानें वापरण्यांत येईनासा झाला, व पुढें कोणत्या तरी संस्कृतीनें ज्यांना नियंत्रित केलें आहे ते **सुर**, ज्यांना असलें कोणतेंच नियंत्रण नाहीं ते **असुर**, अशा अर्थानें त्यांचा उपयोग होऊं लागला, व तोच वेदाच्या अलीकडील सर्व वाङ्मयांत रुढ झाला. अशा

' अनेकचित्तविभ्रांत ' ' मोहजालसमावृत ' अशा लोकांचें शास्त्र केवळ कामकारता, हेंच असावयाचें. याच्या उलट थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे कामकारतेस सोडून जें जें असेल, तें सुरभावास धरून अथवा दैवी होय. ही जशी असुर शब्दांतली खुबी, त्या असुरभावाचें वर्णन अघळपघळ करून भगवंतांनीं व्यक्त केली आहे, तशी 'शास्त्र' शब्दांतली केलेली नाहीं. परंतु त्याचेंही मूळ पाहूं जातां दोनही शब्दांचें तत्व एकच आहे, असें आढळून येतें. शास्त्र या शब्दांत 'शास्' म्ह० नियमन करणें, व ' त्रै ' म्ह० रक्षण करणें, असे दोन धातु आहेत. त्रै शब्दांतील ' र ' कार हा मंत्रशास्त्राप्रमाणें तेजतत्वात्मक असून, सबंध शब्दाचा अर्थ तेज टिकविणारी शक्ति, म्हणजे अर्थात् रक्षकशक्ति, असा आहे. इंग्रेजीमध्यें ' शास्त्र 'शब्दाची ( Systematised knowledge ) सुव्यवस्थित ज्ञान अशी व्याख्या करतात. आमची व्याख्या ( Systematised energy ) सुव्यवस्थित तेज म्हणजे अर्थात् ( Power ) शक्ति अशी आहे. म्हणजे ज्या ज्ञानांत शक्तिसंचय होत नाहीं, ज्याच्यापासून कोणत्या ना कोणत्या तऱ्हेची प्रत्यक्ष शक्ति प्राप्त होत नाहीं, त्याला वैदिकपद्धतींत ' शास्त्र ' असें म्हणत नाहींत. शास्त्र म्हणजे सुव्यवस्थित केलेलें विशेष प्रकारचें तेज, अथवा शक्ति. **मनुष्याचें तेज रक्षण करितें, व कांहींतरी शक्तिसंचय करून देतें, तें ' शास्त्र. '** या मूळ व्याख्येस धरून पुढें अनेक पर्याय झाले. शास्त्रशब्दाचा हा अर्थ ध्यानांत घेतला म्हणजे, शास्त्राचें तत्व जाणून, त्याच्या प्रामाण्यानें कार्याकार्य-व्यवस्थिति करावी, या भगवंताच्या म्हणण्याचा भाव लक्षांत येतो. जेणें करून आपलें रक्षण होईल, व तेजसंवर्धन होईल, असा मार्ग प्रत्येक अडचणीच्या वेळीं माणसानें पत्करावा, असा याचा अर्थ आहे. वैदिक शास्त्राप्रमाणें जीव हा अनेक क्षुद्र कोटींतून उत्क्रांत होतां होतां मनुष्यत्वास पोहोंचला आहे. तेव्हां सर्व मानवी शास्त्रांचें धोरण वैदिकधर्माप्रमाणें असें असलें पाहिजे कीं, या त्याच्या मनुष्यत्वाचें रक्षण प्रथमतः झालें पाहिजे. या मनुष्यत्वांतून तो पुन्हा क्षुद्र कोटींत जाणार नाहीं, ही शास्त्राची पहिली काळजी. म्हणजे कोणत्याही प्रसंगांतून शास्त्र असा मार्ग दाखवितें कीं मनुष्याला स्वतःच्या मनुष्यपणाची लाज न वाटली पाहिजे. हें धोरण सांभाळून मग तो पंथ स्वीकारल्यानें जें कांहीं विशेष फळ पदरांत पडावयाचें, त्याचा विचार. कोणत्याही शास्त्राचा, कोणत्याही विशेष प्रसंगीं या फलदृष्टीनें काय अभिप्राय आहे, हें समजून घेणें व त्याप्रमाणें वागणें, हें जरी वर सांगितल्याप्रमाणें घोंटाळ्याचें असल्यामुळें सामान्य

माणसाच्या आवाक्याबाहेर असलें, तरी, स्वतःची तेजस्विता प्रत्येक प्रसंगीं कायम राखणें व आपल्या मनुष्यपणास धक्का लागणार नाहीं अशा रीतीनें पाऊल टाकणें हें मात्र, प्रत्येक मनुष्य म्हणविणाऱ्यास शक्य आहे.

आहारनिद्राभयमैथुनं च
सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम् ।
ज्ञानं हि तेषां अधिको विशेषः
ज्ञानेन हीनः पशुभिःसमानः ॥

या अगदीं सर्वांच्या तोंडांत खेळणाऱ्या व किरकोळ दिसणाऱ्या सुभाषिताचा अभिप्राय खरोखर अतीशय गंभीर आहे. पशु आणि मनुष्य यांच्यांत इतर सर्व गोष्टी सामान्य आहेत, परंतु एक ज्ञानच काय तें विशेष आहे. मनुष्याच्या ठिकाणीं असलेलें हें ज्ञान ह्मणजे कोणतें ? श्रीदुर्गासप्तशतींत ह्मटल्याप्रमाणें

ज्ञानिनो मनुजाः सत्यं किं नु ते नहि केवलम् ।
यतोहि ज्ञानिनः सर्वे पशुपक्षिमृगादयः ॥
ज्ञानं च तन्मनुष्याणां यत्तेषां मृगपक्षिणाम् ।
मनुष्याणां च यत्तेषां तुल्यमन्यत्तथोभयोः ॥

अशी सर्वत्र वस्तुस्थिति दिसून येते.

Sir Henry Holland या शास्त्रज्ञानें Mental Physiology या पुस्तकांत या विषयीं चर्चा करून ‘ तुल्यमन्यत्तथोभयोः ’ असाच सिद्धांत केला आहे. § सूक्ष्मपणानें पाहत असतां, आहारनिद्राभय मैथुनात्मक सर्व संसाराच्य

---

§ Are intelligence and instinct, thus differing in their relatve proportions in man, as compared with all other animals, yet the same in kind and manner of operation in both? To this question, we must give at once an affirmative answer- - - - we can in no manner define reason so as to exclude acts, which are at every moment present to our observation, and which we find in many instances, to contravene the natural instincts of the species. The demeanour and acts of the dog, in reference to his master, or the various uses to which he is put by man, are as strictly logi-

दृष्टीनें, मनुष्य व इतर क्षुद्र कोटि, यांच्यांत कमीजास्त प्रमाणापलीकडे कांहीं फरक आढळत नाहीं. जो कांहीं फरक असेल तो प्रमाणाचा व कांहीं साधनांच्या कमीजास्त अनुकूलतेचा. तेव्हां, असें कोणतें विशेष ज्ञान आहे, कीं ज्याच्यामुळें मनुष्याची खाण इतर कोटींहून वेगळी ठरते? **श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्राच्या उपसंहारांत ह्मटल्याप्रमाणें आपल्या सर्व कांहीं क्रियांचा मिळून कांहीं संकलित भिन्न परिणाम मनुष्यास करतां येतो, व त्या भिन्न परिणामास धरून, विशेष प्रकारानें या क्रिया त्याला करतां येतात. असें इतर क्षुद्र कोटींतील प्राण्यांस करतां येत नाहीं. त्यांच्या सर्व क्रिया जरी हुबेहुब मनुष्याप्रमाणें व मनुष्याच्या पद्धतीनेंच घडतात, ह्मणजे अर्थातच त्या घडण्यास लागणाऱ्या सर्व शक्ति त्यांच्यांत असतात तरी, त्या शक्ति व त्या क्रिया तुटक्या माळेंतील घरंगळलेल्या मण्यांप्रमाणें, विस्कळीत असतात. त्यांचा परस्परांशीं कोणत्याहीं प्रकारचा कार्यकारणरूप संबंध नसतो, अथवा कोणत्याही एका सूत्रांत त्या अनुस्यूत झाल्या नसतात. इतकेंच नव्हे, तर त्यांना एकमेकांपासून नुसती प्रेरणाही मिळाली नसल्याकारणानें, त्या आपापल्या ठिकाणीं अत्यंत स्वतंत्र व परस्पर निरपेक्ष असतात. ह्मणून आहार, निद्रा, भय, मैथुन इत्यादि गोष्टी इतर प्राणी, त्या गोष्टींत जी गोडी आहे, तिच्याच करतां केवळ करतात. ते त्याच गोष्टींकरतां जगतात, व जगतात ह्मणून त्या गोष्टी करतात. तशी गोष्ट मनुष्याची नाहीं. या गोष्टी त्यांच्यांत जी गोडी आहे, तिच्या करतां न करतां, जगावयाचें साधन ह्मणून करावयाच्या, व दुसऱ्या कांहीं तरी हेतूकरतां जगावयाचें, असें त्यानें मनांत आणल्यास त्यास करतां येतें. म्हणजे या सर्व गोष्टींच्या साह्यानें त्याला कांहीं नवीन गोष्ट निर्माण करतां येते. अशा प्रकारें जगण्याची जबाबदारी अर्थातच त्याच्यावर आहे. असें तो न करील तर, त्याच्यांत आणि इतर क्षुद्र कोटींत वस्तुतः कांहींच भेद राहणार नाहीं. उत्पन्न झालेल्या जीवास कर्म व भोग हे तर लागलेलेच आहेत. कारण कर्म व भोग म्हणजेच जीवन. तेव्हां मनुष्याचें मनुष्यपण केवळ इंद्रिय प्रवृत्तीकरतां कर्म व भोग हे न करितां, कांहीं विशिष्ट रीतीनें कर्म करण्यांत, आणि विशेष रीतीनें भोग

---

cal as those we witness, in the ordinary transactions of life. An animal, *even an insect, thinks, remembers, reasons, and wills.*

भोगण्यांतच आहे. ह्मणून मनुष्य प्राण्याच्या ठिकाणीं इतरांच्यापेक्षां हें जें विशेष प्रकारचें ज्ञान, ह्मणजे जास्त प्रकर्षानें असणारी **प्रज्ञा,** त्या **प्रज्ञेचें** लक्षण **भगवद्‌गीतेंत ' वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता '** असें सांगितलें आहे. **भगवद्‌गीतेंत** सांगितल्याप्रमाणें अथवा वैदिकधर्माप्रमाणें मानवी शहाणपणाचें लक्षण ' वशे हि यस्येंद्रियाणि ' अशी स्थिति असणें, हें होय. या स्थितीच्या कमी ज़ास्त प्रमाणानें मनुष्य पूर्णप्रज्ञ, अप्रतिष्ठितप्रज्ञ अथवा केवळ अप्रज्ञ असा ठरला जातो. विशेष रीतीनें कर्म करणें अथवा विशेष रीतीनें भोग भोगणें, याचाही अर्थ अर्थात् इंद्रियांच्या स्वाधीन न होतां, इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेवून तसें करणें, हाच आहे. अशा रीतीनें मनुष्याचें मनुष्यपण जर कायम राहिलें तरच त्याच्या ठिकाणीं निसर्गतः असलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या तेजांचें म्हणजे शक्तींचें निरनिराळ्या प्रकारानें संवर्धन करून, त्याला आपली अधिक उन्नति करून घेतां येईल. ह्मणून कोणत्याही वैदिक शास्त्राचें, मनुष्याचें हें मनुष्यपण अबाधित राहील, असें पहिलें धोरण असतें. टेकडीवर चढविल्या जाणाऱ्या वजनदार दगडास ज्या प्रमाणें खालून सारखा टेका देऊन वर उचलून घ्यावें लागतें, त्याप्रमाणें शास्त्र हें मनुष्य जीवासंबंधानें अशा दोनही क्रिया करतें. ह्मणून, जाणून अथवा न जाणूनही या दोन परिणामांस धरून जी क्रिया होते, अथवा निदान त्यांतील एकाची तरी ह्मणजे, अधिक खालीं न घसरण्याची तरी, काळजी घेऊन जी केली जाते, ती अगदीं शास्त्रविधीस धरून नसली तरी निदान, शास्त्राच्या तत्वास धरून तरी खास असते. शास्त्रासंबंधानें देखील कोणत्याही गोष्टीचा वाद पडला असतां, त्याचा निकाल लावण्यास, याच तत्वाचा अवलंब केला पाहिजे. व्यक्तिकल्पनेचा नाश हें सर्व साधनमार्गांचें ध्येय आहे. सर्वांकरितां सर्व, आणि सर्वांमिळती व्यक्ति हें वैदिकधर्माचें मूळ तत्व आहे. तेंव्हां **' वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता, '** हें शहाणपणाचें लक्षण, व जेथें केवळ व्यक्तीचा संबंध असेल, तेथें कमालीची निरभिमानता, आत्मत्याग, आणि प्रेमपूर्वक सेवा, व ज्याठिकाणीं समुदायाचा प्रश्न येईल, तेथें सामुदायिक जीवनास आवश्यक अशा प्रकारचे सर्व तऱ्हेचे अभिमान, पराक्रम व सुखसंपत्ति वाढविणारा उद्योग अशीं दोन तत्वें लक्षांत ठेवून, आलेल्या प्रसंगांत आचरण केलें असतां, तेंच सर्वथैव शास्त्रास धरून होणार. हीं तत्वें लक्षांत ठेवून विचार करणाऱ्या एका मनुष्यानेंही दिलेला सल्ला देखील या तत्वांस बाजूस सारून दिलेल्या अनेक पिंडपोषक पंडितांच्या सल्ल्यापेक्षां अधिक

श्रेयस्कर व धर्मास धरून आहे.

' एकोऽपि वेदविद् धर्मं यं व्यवसेत् द्विजोत्तमः
स विज्ञेयः परो धर्मो नाज्ञानां उदितोऽयुतैः ॥

असें अनाम्नात धर्माविषयीं ह्मणजे मुद्दाम उल्लेख न केलेल्या व भिन्नभिन्न परिस्थितींत वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या विधींविषयीं **मनूनें** ह्मटलें आहे, त्याचा भावार्थ हाच आहे. **अमेरिकेंतील** एका उच्च कोटींतील **ख्रिस्ती** साधकानें या विषयीं आपला अनुभव असाच सांगितला आहे. § कोणत्याही काळांतल्या कोणत्यातरी धर्मास, ह्मणजे त्या धर्माच्या ध्येयास, धरून असलेल्या शास्त्राचा एकंदर अभिप्राय हाच पडतो, ह्मणून, जगांतील कोणत्याही धर्मातील साधकांचेही उद्गार याविषयीं एकच येतात. यांत नवल नाहीं. यावरून प्रस्तुत काळचा मतामतांचा गलबला नाहींसा होऊन आह्मीं ह्मणतों त्याप्रमाणें दोन वेगवेगळ्या प्रकारांनीं अथवा जास्त सुदैव असल्यास केवळ एक मार्गानेंही धर्माची घडी पुन्हा नीट बसेपर्यंत, पदोपदीं जे संशयाचे प्रसंग प्रामाणिक माणसापुढें येतात, त्यावेळीं व्यक्तीनें स्वतःपुरता आपला धर्म कसा ठरवावा, ह्मणजे त्याचें आचरण निदान वैदिकधर्मास सोडून तरी होणार नाहीं, व तो धर्माच्याच कक्षेंत राहील त्याचें मुख्य तत्व हें आहे. व्यक्तिस्वातंत्र्याच्या हल्लींच्या काळीं व्यक्तिस्वातंत्र्याचा उपयोग ' वशे हि यस्येंद्रियाणि ' या धोरणानें केला असतां, त्या व्यक्तिस्वातंत्र्यामुळें, सर्व गोष्टी पाहिजे तशा जमून येतील.

---

§ If the way is not clear, I choose the most difficult path, the path that would least appeal to my natural inclinations. For then, I know, that I do not act to please myself. Our desires are so treacherous; they sometimes deceive us. So by taking the path, least pleasing to myself, I feel that even if I should mistake, the Lord will not be offended with me. We must kill the old creature in us, and never feed it by pleasing it. When the old man isgone, the Lord Comes in.

**A visit to Lord's farm. Prabhuddha Bharata.**

हल्लीच्या विचारी ह्मणविणाऱ्या वर्गाकडून लोकांपुढें निरनिराळ्या रीतीनें जें ध्येय ठेवण्यांत येतें, तें जवळ जवळ याच्या अगदीं उलट असतें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. एकादी गोष्ट योग्य वाटली असतां, कोणाचीही पर्वा न करतां छातीठोकपणानें ती करून तिच्याकरतां वाटेल त्या आपत्ति सोसण्यास तयार होणें, यांतही कांहीं कमी धैर्य व त्याग आहे, असें नाहीं. परंतु त्यांत केवळ स्वतःच्या अथवा दुसऱ्या एखाद्या व्यक्तीच्याच सुखदु.खांचा विचार केला असतो. ह्मणून ती गोष्ट गीताशास्त्राप्रमाणें आसुरभावास धरून होय. हें जग इतक्या परस्पर विरोधांनीं भरलें आहे कीं, त्याग आणि धैर्य यांच्याशिवाय कोणालाही एक पाऊल देखील टाकणें शक्य नाहीं. ह्मणून त्या त्यागास आणि धैर्यास उचलून धरून एखादा मनुष्य बढाई मिरवूं लागेल, तर तें रास्त होणार नाहीं. **पंचदशींत** ह्मटल्याप्रमाणें

**अपथ्यसेविनश्चोरा राजदाररता अपि**
**जानंत एव स्वानर्थमिच्छंत्यारब्धकर्मणः।**

या वर्गांतील लोकांचें धैर्य, आपत्ति सोसण्याची तयारी, व त्याग काय कमी असतो? वरील सांगितलेलीं वैदिक तत्वें लक्षांत न ठेवतां, मनुष्याच्या जीवनास कांहीं आगापिच्छा नाहीं असें मानून, वाटेस आलेला चालू क्षण कोणीकडून तरी पदरांत पाडून घेण्यास ह्मापापल्याप्रमाणें करणाऱ्या लोकांस तात्पुरतें कोणी कितीही उचलून धरलें, तरी त्यांचा हीनपणा मानवी अंतःकरणास पटल्याखेरीज राहत नाहीं. उदाहरण ह्मणून आम्ही **गडकऱ्यांच्या वसुंधरेचा** मागें विचार केलाच आहे. चिरजीवनावर विश्वास ठेवणाऱ्या, सतीची आणि पतीची ताटातूट प्रत्यक्ष मृत्युही करूं शकत नाहीं, अशी दृढ श्रद्धा बाळगणाऱ्या आणि 'मरणाची काय भीति आहे,' 'घेतलेल्या व्रतांत तिळमात्रही कमीपणा येण्यापेक्षां तुम्ही वीराप्रमाणें मरून जा, मी तुमच्या मागाहून तेथें ठेवलेलीच आहे' असें **मल्हारराव होळकरांस** ठांसून सांगणाऱ्या खरोखरीच्या **गौतमाबाईपुढें**, नाटकी **वसुंधरा** कितीतरी खुळी आणि बुळी दिसते! अशीच गोष्ट **प्रेमसंन्यासां**तील **जयंता**चीही आहे.

**लीला** आणि **जयंत** यांचें एकमेकांवर उत्कट प्रेम होतें. त्या प्रेमाच्या आड कोण येणारें होतें? 'प्रेम ह्मणजे मानसिक जीवनाचा संयोग,' ही गोष्ट जर खरी, तर त्या प्रेमाच्या आड शरीरसुख काय ह्मणून यावें? **जयंताचा** विवाह झाला होता, व त्यामुळें त्याला **लीलेशीं** पुनर्विवाह करतां येत नव्हतां, म्हणून तडफड करून हे दोनही प्राणी अखेरीस मृत्युमुखांत पडले, असें त्यांचें अलीकडच्या प्रेमकल्पनेस

धरून वर्णन आहे, व तेवढ्याकरतां जग, रूढी, धर्म इत्यादिकांच्या नांवानें वाटेल तशीं बोटें मोडलेलीं आहेत. परंतु थोडा विचार केला असतां असें आढळून येईल कीं, **जयंत** हा किंवा **लीला** ही कोणत्याही रीतीनें त्यांना कृत्रिम वाटलेल्या जगास न दुखवितां, किंवा निरर्थक वाटणाऱ्या रूढीचाही अवमान न करतां खरो-खरच एकमेकांवर प्रेम करूनही आपला मार्ग जास्त शौर्यानें काढूं शकले असते. परंतु दोघांच्या मानसिक जीवनांचा एक संयोग आहे अथवा दोघांचें एकमेकांवर खरें प्रेम आहे, एवढी भावना त्यांस पुरत नव्हती. तर त्याला धरून पुढें जें सहवास वगैरे इंद्रियजन्य सुख, त्याच्याकरतां त्यांचे जीव तळमळत होते. आंत एकमेकाचें प्रेम आहे, एतढ्या भावनेचा आनंद ठेवून बाहेर जर वरील वैदिकध्येयाप्रमाणें इंद्रियजन्य सुखाचा त्याग करावयास ते शिकलेले असते, तर तें त्यांचें धैर्य आणि त्याग हीं दैवी संपत्ति होऊन त्यापासून त्यांना स्वतःलाही, दिव्य समाधान मिळालें असतें, व भोंवतालच्या जगालाही आनंदित करतां आलें असतें. असें न केल्यामुळें त्यांच्या वासनेस प्रेम हें नांव निरर्थक होऊन त्यांचा संन्यासही ‘ अपथ्य सेविनश्चोरा ’ या लोकांतील वर्गास धरून, आसुरी संपत्तीचा झाला आहे; आणि म्हणूनच त्याचा परिणामही दुःखदायक झाला आहे. पाश्चात्य समाजाचें वर्णन करतांना ‘ वरून दिसावयाला तेथें हास्यमुद्रा ( peal of laughter ) असते ’ परंतु तळाशीं पाहिलें तर केवळ शोकसंभार ( wail ) असतो, ’ असें **निवेदिताबाईनें** वर्णन केलें आहे. तिकडील सर्व वाङ्मयांतील अगदीं हृदयास चटका लावून सोडणाऱ्या प्रेमकथांचें पर्यवसान त्यांच्या खरोखरीच्या अनुभवास धरून बहुतकरून अतिशय हृदयद्रावक असतें. कोकिळाप्रमाणें कल्पनातंरगांत रममाण होणारा **शेले** मोठ्या खिन्न अंतःकरणानें ‘ our sweetest thoughts are the saddest ones ’ ( म्हणजे ‘ जें अतीय हृदयदारक असतें तेंच आम्हांस अतीशय हृद्य वाटतें ’) असे उद्गार काढतो. या सर्वांचें मूळ वरील गोष्टींत आहे.

मनुष्याचा खरा पुरुषार्थ स्वतःच्या पराक्रमानें पाहिजे तशी परिस्थिति उत्पन्न करून घेण्यांत आणि खरा आनंद असा पराक्रम अंगीं असण्यांत अथवा तशी परिस्थिति सहज असण्याचें भाग्य असण्यांतच आहे. परंतु पुढें त्या परि-स्थितीच्या उपभोगांत तो लोलुप झाला कीं, वाटेल तितका मोठा असूनही तितका-च दुर्बळ आणि दीन बनतो. म्हणून, परिस्थिति असल्यास अथवा प्राप्त झाल्यास अलोलुपतेनें तिचा उपभोग घेण्यांत व त्या सुखपरिस्थितीची हवी तशी अनुकूलता

नसल्यास अथवा, तें आपलें प्रत्यक्ष सुख इतरांच्या सुखाच्या आड येत असल्यास, किंवा, त्या सुखाचा त्याग केला असतां, पराक्रम, कर्तव्य, जीवितसाफल्य इत्यादि दृष्टींनीं अधिक कमाई करतां येत असली, तर तो त्याग मोठ्या आनंदानें करावयास तयार होणें यांतच त्याचें मनुष्यपण आहे. आणि ह्मणूनच ' वार्षोष्णसह जटिलधर ' अशा **धर्मराजा**प्रमाणें, *किंबहुना त्याच्यापेक्षां जास्त ऐटीनें* **दुर्योधन** हा स्वर्गाच्या सिंहासनावर जाऊन बसला; व **भीष्म, श्रीकृष्ण** या दोन विभूति टाकल्या तर इतर कोणत्याही भारती विभूतीपेक्षां त्याचें चित्र जास्त चटका लावतें. ज्याच्याकरतां त्यानें एवढा रणयज्ञ करून एवढा संहार केला, व ज्यांतील सुईच्या अग्रावर राहण्याइतकी भूमिदेखील तो **पांडवांस** देण्यास तयार नव्हता, तेंच **भारतवर्षाचें** प्रचंड साम्राज्य दान ह्मणून **पांडवांच्या** हातावर टाकून त्यांच्याच प्रमाणें तो जंगलातल्या झोंपडींत जाऊन रहावयास केव्हांही एका पायावर तयार होता. **श्रीरामांनीं**ही ' रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ' अशा प्रकारचें निरुपम युद्ध करून **सीतादेवीस** परत आणल्यावर ' आतां पाहिजे असल्यास तूं हवी त्या ठिकाणीं जा, माझें काम संपलें आहे ' असें तिला रोख ठोक बजाविलें, व त्याचप्रमाणें पुढें त्या कालाला अनुसरून लोकाराधनेकरितां तिचा त्यागही केला, यांतच त्यांचें ' राम ' पण आहे.

आतां, असें करतांना मनुष्याला दुःख होणार नाहीं, व

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ।**

अशा त्रिगुणातीततेनेंच तो व्यवहार करतो, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. ती स्थिति ह्मणजे अंतिम परिणति आहे. तिच्या पूर्वीच्या व्यवहारांत, असें करतांना चटका हा बसणारच, कमीजास्त प्रमाणानें दुःख हें होणारच. कदाचित् एकाद्या प्रसंगीं मनुष्याचें सबंध जीवितही मृतप्राय आणि क्लेशकारक होईल, परंतु तें सर्व आनंदानें सोसण्यास तयार होणें, यांतच त्याचें थोरपण आहे, असें वैदिकधर्म व त्याला अनुसरून असलेलीं शास्त्रें सोपपत्तिकपणानें शिकवितात, व इतर लोकांस ती उपपत्ति न कळूनही केवळ अंतःस्फूर्तीनें तसें वाटतें. मनुष्याच्या हृदयास वळण देणारें, त्याच्या भावना जागृत करून उदार करणारें असें जें कांहीं काव्य, नाटक, कला, कादंबरी इत्यादि रूपाचें वाङ्मय दिसून येतें, त्यांत, या नाहीं त्या रीतीनें हीच गोष्ट शिकविलेली असते. प्रेमवस्तूचा प्रत्यक्ष उपभोग घेण्यापेक्षां गरज

लागल्यास तिचा त्याग करण्याची तयारी असण्यांत जें अलोलुपत्व आहे, तेंच प्रेमाचें अत्युच्च स्वरूप ह्मणून दाखविण्यांत येतें. सारांश, 'वशे हि यस्येंद्रियाणि' हें शहाणपण, आणि त्याला धरूनच, वर सांगितल्याप्रमाणें येणारें अलोलुपत्व, ह्याच अंतःकरणांत पडलेल्या कार्याकार्य विचारांतून व्यक्तीनें स्वतःपुरता मार्ग काढावयाचा, वैदिकधर्म होय. हेंच सारें त्याचें शास्त्रप्रामाण्य. इतर शास्त्रांची सोय असल्यास, त्यांचा विचार करूं नये, असें अर्थातच नाहीं, व तसें होणेंही शक्य नाहीं; कारण वरीलप्रमाणें वागणाऱ्या मनुष्यास प्रचलित शास्त्रांना मुद्दाम सोडून देण्याची बुद्धीच सहसा होणार नाहीं. यदाकदाचित् व्यक्तिविषयक नसलेल्या अवांतर कारणांनीं त्यास तसें करणें भाग पडलें, तर त्याचा परिणाम परिस्थितीप्रमाणें जो काय इष्टानिष्ट व्हावयाचा, तो जरी झाला, तरी त्याच्या स्वतःपुरतें, शास्त्रफल, **दुर्योधना**प्रमाणें त्याच्या पदरांत पडल्याखेरीज राहणार नाहीं.

या सर्व विवेचनावर अशी एक साहजिक शंका येईल कीं, मंत्रशास्त्र योगशास्त्र, चातुर्वर्ण्य असल्या मोठमोठाल्या गंभीर विषयांत, हा स्त्रीपुरुषांच्या, प्रेमाचा संबंध येण्याचें कारण काय व त्याचा एवढा विस्तार तरी काय ह्मणून? या सर्वांचा इतका विस्तार करण्याचें आणि खरोखरच आमच्या विषयाच्या मानानें गौण असलेल्या अप्रौढ विषयांतील **लीला, जयंत, वसुंधरा**—वगैरे पात्रांचें परीक्षण करण्याचें कारण इतकेंच कीं, केवळ शास्त्रीय अडचणीकरतांच शास्त्रास सोडून वागण्याची, अथवा खरोखरच नाइलाज ह्मणून, इतर कोणत्याही गोष्टीचा विचार न जुमानतां आपल्यास वाटेल त्याच तऱ्हेनें तरवार फिरवून मार्ग काढण्याची वेळ मनुष्यावर फारच क्वचित् येते. अशा तऱ्हेचे जे सारे प्रसंग असतात, व त्या प्रसंगाचा जो मोठा बाऊ करून कार्याकार्याच्या विचारानें मनुष्य गोंधळल्यासारखा होतो, त्यांतले शेंकडा ९५ तरी प्रसंग, स्वतःचें अंतःकरण कुठें तरी लोलुप झालेलें असतें, आणि ह्मणून बुद्धि अंध होऊन, मोहानें त्या प्रसंगाचें स्वरूप जास्त कठीण व अगम्य असें भासवीत असते ह्मणून आलेले असतात. आह्मीं वर सांगितल्याप्रमाणें, वैदिकशास्त्रप्रमाण मार्ग अंतःकरणाला धडधडीत दिसत असतां, त्याच्या उलट वागण्याची कांहीं कारणानें आवश्यकताच आहे, अशा तऱ्हेचें त्या प्रसंगास स्वरूप देणारा युक्तिवाद ह्मणजेच मोह. मनुष्याचें अंतःकरण लोलुप करणाऱ्या, व जेथें तें केवळ तन्मयतेनें अतीशय चिकटून जातें, अशा सर्व प्रसंगांत स्त्रीपुरुषप्रेम हें अतिशय नाजूक आणि ह्मणूनच अतीशय बलवान् व दुर्निवार आहे. ह्मणून,

प्रथमतःच हें 'श्रेष्ठमल्लनिबर्हण' केलें. ज्याला असल्या प्रसंगांतून मार्ग काढतां येईल, तो आवडीच्या इतर कठीण प्रसंगींही बिनधोकपणानें मार्ग काढील यांत शंका नाहीं.

या सर्व त्रोटक विवेचनावरून या मतमतांच्या गलबल्याचा निश्चित निकाल लागेपर्यंत व्यक्तीनें काय करावें याचा चांगला बोध होईल; व याला धरूनच, बाजारचें सोडावॉटर पिण्यापासून तों आनंदानें फासांत मान अडकविण्यापर्यंत प्रत्येक प्रसंगीं ज्याला त्याला आपला मार्ग काढतां येईल. असल्या अनेक प्रसंगांचीं निरनिराळ्या प्रकारचीं उदाहरणें घेऊन या छोट्याशा निबंधाचा विस्तार करणें योग्य होणार नाहीं. म्हणून ' वशेहि यस्येंद्रियाणि ' अशा प्रकारची प्रज्ञा संपादन करणें, व तिच्या योगानें, कोणत्याही प्रसंगीं मोहमय युक्तिवादानें ग्रहण केलेल्या ' असद्ग्राहां'ना बाजूला सारून, जेथें केवळ व्यक्तीपेक्षां अथवा कांहीं व्यक्तींपेक्षां जास्त व्यापक प्रश्न असतो तेथें आपण विश्वाचे अभिन्न घटक आहों हें न विसरतां, काम पडल्यास वाटेल तेवढा आत्मत्याग करण्याइतकें अलोलुपत्व अंगीं आणणें, हाच व्यक्तीचा पहिला धर्म आहे, असें पुन्हा स्पष्ट शब्दांत सांगून, व्यक्तीनें हा धर्म पाळण्यासंबंधीं अवश्य असलेली एक सूचना करून, हें प्रकरण पुरें करूं.

**श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्रांत अर्वाचीन देशभक्तांचा विचार करतांना एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, 'कोणतीही शक्ति केवळ नुसत्या कल्पनांनीं उत्पन्न होत नसते. कारण नवी अशी शक्ति, शरिरांत कोणतीच उत्पन्न होत नसते. शरीरांत अनेक प्रवाहांनीं अखंड वाहणाऱ्या पूर्वीच्या शक्तीलाच निरुद्ध करून इष्ट स्वरूप द्यावें लागतें. म्हणून राष्ट्रीयत्व हें नुसत्या कल्पनेंत न राहतां त्याची एक शरीरस्थ शक्ति बनवावयाची असेल, तर शरीरांतून वाहणाऱ्या शक्तीच्या धारेस इष्ट त्या तऱ्हेनें आळा घालून तिचेंच रूपांतर केलें पाहिजे. घरीं, दारीं, रात्रीं, दिवसा, शरीरस्थ शक्तीचा प्रवाह वाटेल त्या दिशेनें वाहूं देऊन, काम पडलें कीं नुसत्या कल्पनेबरोबर राष्ट्रीयत्व स्फूर्तीसारखें शरीरांत प्रकट होईल असें समजून वागणाऱ्या देशभक्तांनीं हा गैर समज टाकून दिला पाहिजे, आणि इष्ट त्या दिशेनें स्वतःच्या कायिक, वाचिक, मानसिक वर्तनास आळा घालून शक्ती संवर्धन केलें पाहिजे.' तसेंच याविषयीं ते नेहमीं म्हणत असत कीं ' नुसतें मनांत असून कांहीं उपयोग नाहीं बाबा. शरीरास त्याचें वळण असावें लागतें, तरच तें ऐन वेळेस कामास येतें. असलेली गोष्ट देखील ऐनवेळीं बाहेर काढीन, असें नुसतें म्हणून भागत नाहीं. यत्नपूर्वक ती टिकवावी लागते. ' हीच ती महत्वाची सूचना होय.

कित्येक मनुष्यांच्या अंगांत, एक प्रकारची, कशाही प्रसंगास तोंड देण्याची धमक असते, त्याचप्रमाणें झटक्यासरसे दुसऱ्यानें तोंडांत बोट घालण्यासारखी गोष्टही करून टाकण्याचें त्याच्यांत साहस असतें. त्यामुळें प्रसंगोपात्त असें करतां आलें म्हणजे झालें, एरवीं सर्व आयुष्यभर जखडून राहण्याचें काय कारण, वाटेल तसें कां वागूं नये, असें त्यांना स्वतःला, व त्यांचें उदाहरण पाहून इतर लोकांनाहीं वाटतें. त्यासंबंधानें मागें आम्हीं **सिडनेकार्टन** याचें उदाहरण देऊन थोडेसें सांगितलेंच आहे. येथें जास्त सांगावयाचें म्हणजे इतकेंच कीं, तशा सर्व प्रकारच्या गोष्टी कांहीं झालें तरी केवळ तात्पुरत्या असतात, व गंगोदकानें ज्याप्रमाणें एखादी वस्तु शुद्ध करून घ्यावी तसें त्यामुळें त्यांचें सारें आयुष्य जरी पावन झालें, तरी अनेक प्रकारांनीं स्वतः शक्तिसंचय करणें, व त्याचा प्रसार आपोंआपच इतरांत करणें, हें जें मानवी शरीराचें विशिष्ट कार्य, तें साधलें असें होत नाहीं. म्हणून ज्या कोणास आयुष्याचें सार्थक करावयाचें आहे, त्यानें तेवढ्यावरच तृप्त न राहतां आयुष्य हें, **श्रीतुकाराम** महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें—

‘ रात्रंदीस आम्हां युद्धाचा प्रसंग ’ अशी महापर्वणी समजून मारवाडी पैशाला पैसा लावून ज्याप्रमाणें दौलत उभी करतो, त्याप्रमाणें घडीनें घडी कमाई केली पाहिजे. ख्रिस्ती लोकांप्रमाणें ‘ सात दिवस पाप आणि एक दिवस माफ ’ अशा मापानें आयुष्य न वेचतां, क्षुल्लक अथवा महत्वाचा असा भेद प्रसंगांत न करतां सदैव जागृत राहून धर्मसंचय केला पाहिजे. मतामतांचा गलबला आहे, भोंवतालची परिस्थिति अनिष्ट आहे, शास्त्रविधींचें रहस्य कळत नाहीं, असल्या अनेक अडचणींनीं उदास बनून डोळ्यांवर कातडें ओढण्याची वेळ आतां राहिली नाहीं. कोणी कोणत्याही मताचा असो, व वैदिक धर्म आणि वैदिक संस्कृति यांच्याविषयीं त्याच्या कल्पना कांहींही असोत, समाजाचें खरें जीवन, संस्कृति, संस्कार, आणि शास्त्रविधि यांच्या विशिष्टपणांतच आहे, एवढें जरी त्यास पटत असलें, तरी, त्याला जसें वाटेल तशा विशिष्टपणानें कां होईना, प्रथमतः आपलें सर्व आयुष्य तन्मय होईल अशा कांहीं शिस्तींत स्वतःस घालून घेऊन, शक्तिसंचय करण्याची व नंतर ती शक्ति लोकांत वाटण्याची त्याचेवर जबाबदारी आहे. ज्यांचा धर्मावर विश्वास आहे, त्यांनीं वर सांगितलेल्या दृष्टीनें शास्त्राचें रहस्य जाणून, सर्व प्रकारच्या विधिनिषेधांनीं स्वतःच्या शरीरास अशा प्रकारचें एक शक्तीचें यंत्र बनविलेंच पाहिजे. नाहींतर, तो धर्मावरील त्यांचा विश्वास खोटा ठरून दांभिकपणाच्या दोषास ते

पात्र होतील. धर्मावर ज्यांचा विश्वास नसेल, परंतु, केवळ स्वतःच्या व्यक्तीच्या सुख-दुःखापलीकडे इतर व्यक्तींच्या सुखदुःखाकरितां जगण्यांत त्यांना आयुष्याचें सार्थक वाटत असेल, तरी देखील आपलें काम योग्य रीतीनें होण्यास हाच मार्ग त्यांनीं पत्करला पाहिजे. वर सांगितलेली वैदिकशास्त्राचीं रहस्यें लक्षांत ठेवून स्वतःच्या मताप्रमाणें वागणुकीचे कांहीं विधिनिषेध उत्पन्न करून त्या मुशींत स्वतःला आट-विल्याखेरीज पुढारीपणानें आपलें कार्य करण्यास ते कधींच समर्थ होणार नाहींत.

शक्तिसंचयाची ही किल्ली आमच्या अर्वाचीन अशा प्रसिद्ध मंडळींत फक्त **महात्मा गांधी** यांनीं ओळखिली, व तिचा योग्य उपयोगही त्यांनीं केला. त्याचा परिणाम काय झाला तें साऱ्या जगास दिसत आहेच. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशीं आहे कीं, अजून ही गोष्ट, खुद्द **महात्माजीं**च्या अनुयायांसच पटावी तशी पटलेली दिसत नाहीं. इतरांस तर ती मुळींच पटली नाहीं कीं काय, असें भासतें. असो. ज्या लोकांस अशा प्रकारचें कांहीं मोठें कार्य जगांत करून दाखवावयाचें असतें, त्यांस अतिशय बारीक सारीक गोष्टींपासून तों अतिशय महत्वाच्या गोष्टीपर्यंत सर्व प्रका-रांनीं स्वतःचें जीवन अशा प्रकारच्या एका सूत्रांत कसें ओंवावें लागतें, हें आजपर्यंत जगांत ज्या कांहीं खरोखर कार्यकारी संस्था झाल्या त्यांच्या कार्य करण्याच्या खऱ्या काळांतील इतिहासावरून दिसून येईल. मग त्या संस्थांचीं ध्येयें व समजुती कशाही असोत. पाश्चात्य देशांतील अगदीं जडवादी अशा क्रांतिकारकांचे इतिहास पाहिले, तरी देखील त्यांच्या सर्व प्रयत्नांचें सार स्वतःकरितां व अनुयायांकरितां अशा प्रका-रची कांहीं विशिष्ट शिस्त निर्माण करण्यांत, व तिच्याशीं एकजीव होऊन, इमानी पणानें ती पाळण्यांत आहे, असें दिसून येतें. धार्मिक संस्थांस तर याची कितीतरी पटीनें अधिक आवश्यकता आहे.

यहुदी लोकांवर आपत्ति येऊन ते सवप्रकारें गांजले गेले, देशोधडीस लागले, व अनेक प्रकारान हालअपेष्टा त्यांच्या झाल्या, हें सर्व कसें घडलें त्याची मीमांसा करतांना एका ज्यू लेखिकेनें ह्मटलें आहे,

What is the explanation of the strange persistance of a tiny nation, deprived of its home land, spurned, repressed, persecuted? It can only be some wonderful spiritual power within it, nnconquerable, indomitable, unquenchable, which has enabled it to keep alive, though all the nations of the world conspired against it.

( परागंदा झालेल्या, तुडविले गेलेल्या, छळिले गेलेल्या, तिरस्कृत केले गेलेल्या या चिमुकल्या राष्ट्रांत ही येवढी विलक्षण चिकाटी आली तरी कोठून ? सर्व जगानें त्याच्या विरुद्ध विडा उचलिला असतां तें जें ताठ मान करून सतत उभे राहिलें आहे त्याचें कारण केवळ त्याचे आत्मबल हेंच असलें पाहिजे.)
ही शक्ति संपादण्याकरितां त्यांनीं काय युक्ति केली, तें तिनें पुढें लिहिलें आहे.

The people who were to prove to the world the holiness of the one God, had to be particularly careful not to imperil the truth by any act of theirs. So, their lives were regulated from the smallest detail to the highest, indeed nothing was too small, nothing too insignificant; every thing was for the glory of God. All acts of life were given a religious significance. Eating, drinking, marrying. enjoying all the good things of life, were religious acts; every detail of life was consecrated to the service of God.

( ज्या लोकांकडे एकमात्र ईश्वराची पुण्यात्मकता जगास पटवून देण्याचें कार्य होतें त्यांना अर्थातच स्वतःच्या कोणत्याही कृतीनें त्या कार्यास यत्किंचितही धक्का पोहोचणार नाहीं अशी खबरदारी घेणें भाग होतें. त्यामुळें त्यांनीं आपला सव जीवनक्रमच, अगदी यःकश्चित गोष्टीपासून तों अत्यंत महत्वाच्या अशा प्रसंगापर्यंत, रेखीव केला होता. कारण त्यांच्या दृष्टीनें कोणतीही गोष्ट लहान नव्हती–कोणतीही गोष्ट क्षुल्लक नव्हती.–सर्वकांहीं ईश्वराचें होतें–ईश्वराच्या महिम्याकरितां होतें. केवळ सर्व जीवनच नव्हें तर शरीरधर्म देखील ईश्वराराधनच होते. खाणें, पिणें उपभोग घेणें, सर्व कांहीं धर्मरूपच बनलें होतें. ' यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो-तवाराधनम् '। अशीच त्यांची स्थिती होती. )

असें करतांना अर्थातच त्यांना ऐहिक सुखसंपत्तीचा मोठा त्याग करावा लागला. पुढें हें त्यांचें धोरण नाहींसें होऊन तें केवळ बनिये बनले, हा भाग वेगळा. परंतु ईश्वरानें अब्राहामच्या द्वारें जें हें तत्व त्यांस शिकविलें, त्याचा कित्ता गिरवून त्यांनीं कांहीं काळ तरी मोठें काम केलें यांत शंका नाहीं. याविषयीं सदर लेखिका मोठ्या अभिमानानें ह्मणते कीं

He ( God) bequeathed this great monarch and spiritual urge to his descendants, who like him have ever been

ready to give up material advantages for higher considerations.

( त्यानें ह्मणजे परमेश्वरानें ज्यू लोकांस अब्राहामसारखा अधिपति आणि आध्यात्माची कळकळ या दोन देणग्या दिल्या. त्यामुळें तेव्हांपासून आतांपर्यंत उदात्त कार्याकरितां ऐहिक सुखाचा त्याग करावयास ते केव्हांही तयार होतात.)

इतिहासांतील इतर प्रकारचीं उदाहरणें टाकून, मुद्दाम ज्यू लोकांचेंच उदाहरण घेण्याचें कारण काय आहे, तें वेगळें सांगण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. अतिशयोक्ति न करतां असें ह्मणतां येईल कीं ब्राह्मण ह्मणविणाऱ्यांवरही आज हुबेहुब तसाच प्रसंग येऊन पडला आहे. कोणी कांहींही ह्मणत असले, तरी एक गोष्ट दिसून येते कीं इतर सर्व मनुष्यजातींहून ब्राह्मणांचें ब्राम्हणपण; कांहीं झालें तरी वेगळेपणानें उमटून पडल्याखेरीज रहात नाहीं. कारणें कोणतींही असोत, हा त्यांचा वेगळेपणा इतरांस आतां अगदीं दुःसह झाल्यासारखा झाला आहे व त्यामुळें त्यांचा सर्वांकडून द्वेष केला जातो. यांतच त्यांचें श्रेष्ठत्व आहे, असें आम्हांस वाटतें. कारण द्वेष करणाऱ्याच्या अंतःकरणांत, ज्याचा द्वेष केला जातो त्याच्या श्रेष्ठत्वाची जाणीव निर्विवादपणें पटलेली असते, हें उघड आहे. तें कसेंही असलें तरी, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं कीं जवळजवळ सर्व जगानेंच ब्राम्हणांविरुद्ध विडा उचलला आहे. अशा स्थितींत या सर्व परिस्थितींतून तोंड काढून, ब्रम्हणांनीं वैदिकधर्माच्या, **चातुर्वर्ण्याच्या**, म्हणजे पर्यायानें सर्व जगाच्याच कल्याणाकरितां पराकाष्ठेचा आत्मत्याग करून, व वाटेल त्या हालअपेष्टा सोसून स्वतःचें विशिष्टत्व कायम राखण्याचा प्रयत्न जर केला नाहीं, तर ' उत्सीदेयुरिमे लोकाः ' अशी स्थिति होऊन ' उपहन्यामिमाः प्रजाः ' या दोषास ते पात्र होतील. सारें जग त्यांच्या विरुद्ध उलटलें असतां आम्ही ब्राम्हणांनाच, म्हणजे वैदिकधर्मावर, त्यांतील अनेक प्रणालिकांवर, व ब्राम्हण्यावर ज्यांचा खरोखरच विश्वास आहे, व त्यामुळें साऱ्या जगाच्या रोषास पात्र होऊन कुत्रा हाल खाणार नाहीं अशी ज्यांची स्थिति उद्यां होणार कीं काय, अशी भीति वाटत आहे, त्यांनाच हा दोष काय म्हणून लावतों, असें कोणी म्हणतील, तर तें बरोबर होणार नाहीं. कारण किती झालें तरी, आज ते पिढ्यान्पिढ्याचे समाजाचे व धर्माचे शिक्षक आणि रक्षक आहेत. सर्व तऱ्हेनें वडीलपणाचा मान त्यांच्याकडे आहे. संसारांत दिवसगति फिरली म्हणजे कुटुंबांतील कर्त्या मनुष्याला ज्याप्रमाणें

स्वतः केवळ उकिरडा बनून कमालीच्या तितिक्षेनें कुटुंबाचा गाडा सुरळीतपणें पार पाडून न्यावा लागतो, त्याच प्रमाणेंच, राष्ट्रसंसारांतील वडीलपणाचें कर्तव्य ब्राम्हणांकडे आहे. आजपर्यंत कैक वेळां त्यांनीं तें मोठ्या आनंदानें पार पाडलें आहे, आणि या बाणीच्या प्रसंगींही, कोणीही हाडाचा ब्राम्हण तसें पुन्हा करावयास कचरणार नाहीं, अशी आमची खात्री आहे. अशा लोकांकरतांच मुख्य अतिशय जिव्हाळ्यानें हा छोटासा प्रबंध लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. ब्राम्हण म्हणवीत असूनही असें करण्यास ज्यांचें मन कांकूं करील, त्या येरागबाळांकरितां आमचें कांहींच म्हणणें नाहीं.

साधारणतः या सबंध प्रकरणामध्यें ब्राम्हण म्हणविणारा असो, अथवा नसो, कोणत्याही मताचा असो, हिंदुस्थान पुन्हा स्वतंत्र व वैभवसंपन्न व्हावें, असें ज्यास वाटत असेल त्यानें स्वतः काय करावें, कोणत्याही प्रसंगांत त्याचें धोरण कसें असावें, याच दृष्टीनें आम्हीं विचार केला आहे. आतां मूलसंकेताप्रमाणें, जे ब्राम्हण म्हणविणारे आहेत, ज्यांचा वैदिकधर्मावर, म्हणजे इहलोक, परलोक, पुनर्जन्म, कर्मचक्र, योग, मंत्र आदिकरून शास्त्रें, ईश्वराचें अस्तित्व, त्याचें जगन्नियामकत्व—इत्यादि तत्वांवर विश्वास आहे, वर्णाश्रमधर्माविषयीं ज्यांना आदर आहे, वेदविद्येची आणि वर्णाश्रम धर्माची दीन दशा पाहून ज्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटतें, व त्यांचें पुन्हा ऊर्जित कसें होईल, असें ज्यांना मनःपूर्वक वाटतें, अशा हाडाच्या ब्राम्हणांनीं या प्रसंगांत काय केलें पाहिजे, याचें पुढील प्रकरणांत थोडक्यांत दिग्दर्शन करून, एकंदर विषयाचा उपसंहार करूं.



## प्रकरण ६ वें.

# ब्राह्मणांचें कर्तव्य.



मागील सर्व प्रकरणांत चातुर्वर्ण्यासंबधीं विशिष्ट दृष्टीनें अनेक प्रकारांनीं विचार करून असें सार काढलें कीं, "ब्राह्मणाचीं शरीरें अद्यापि संघटनेच्या इतर कोणत्याही जातीपेक्षां अधिक शुद्ध व पूर्वपरिस्थितीस धरून आहेत. तेव्हां पुनरुज्जीवनाच्या या काळांत वाटेल त्या तऱ्हेनें कल्पना बसवून चार वर्ण निर्माण करण्याची घाई न करतां ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर एवढाच भेद समजून ब्राह्मणांनीं वेदाच्या साह्यानें आणि ब्राह्मणेतरांनीं उपासना, योग व ब्राह्मणांच्या साह्यानें आयतें मिळविलेलें वेदाचें साह्य, यांच्या योगानें आपापलीं शरीरें शुद्ध करून घ्यावीं. ह्मणजे दोन्हीही वर्गांत खऱ्या अधिकारी लोकांची वाढ जास्त झाल्यानें आपोआपच एकमत होऊन, त्यांतून चातुर्वर्ण्य संस्था निर्माण होईल." हें कसें करावें, असें अगदीं निश्चितपणानें व साकल्यानें सांगणें शक्य नाहीं. त्यायोगें ग्रंथविस्तारही अतिशय होईल. ह्मणून त्यांत जास्त न शिरतां, 'परमात्माच्या कृपेनें पुन्हा प्रसंग आल्यास पाहूं,' असें ह्मटलें होतें. तरी देखील हल्लींच्या या आभाळ फाटलेल्या स्थितींतही, ब्राह्मणांनीं आपल्या कार्यास कशी सुरवात करावी, याविषयीं कांहीं कल्पना केल्याखेरीज या ग्रंथाची पूर्तताच होणार नाहीं; ह्मणून मागच्या प्रकरणांत, मनुष्य या नात्यानें सर्वसाधारण व्यक्तिधर्म काय असावा, हें जसें थोडक्यांत सांगितलें, तसें या प्रकरणांत, ब्राह्मण ह्मणविणाऱ्याच्या कार्याची कशी दिशा असावी, या विषयीं कांहीं कल्पना सुचवूं.

द्वेषाच्या पोटांत श्रेष्ठत्वाची जाणीव असते, यांत कांहींच शंका नाहीं. जेथें कोठें श्रेष्ठत्व दिसेल, तेथें खरें पाहिलें असतां मनुष्याचें अंतःकरण स्वभावतःच नम्र होतें. आणि विशेषतः बुद्धिमत्ता आणि ज्ञान यांचें श्रेष्ठत्व दिसून आल्यावर तर, तें तेथें लीन होतेंच होतें. ज्याला धड घोड्यावर देखील बसतां येत नव्हतें, शरीर पाहिलें तर काडीमोडीचें, अशा जनानी थाटाचा **नेपोलियन**सारखा पोरसौदा सेनापति, त्याच्यापेक्षां वयानें पराक्रमानें व शरीरसंपत्तीनें कितीतरी अधिक असलेल्या व युद्धव्यवसायांत काळयाचे पांढरें झालेल्या फ्रेंच सैनिकांच्या नाकाचा बाल

होऊन बसला, तो यामुळेंच. लो० टिळकांची येवढीशीशीं शामसुंदर मूर्ति सर्व हिंदुस्थानच्या अंतःकरणांत निवास करून राहिली ती यामुळेंच. असें असतां, ब्राह्मणाच्या श्रेष्ठत्वाची अंतःकरणांत सर्व प्रकारें जाणीवं असून इतर वर्णांनीं त्याचा द्वेष काय ह्मणून करावा, असें वाटतें. मनुष्यस्वभावाचा दुसरा असा एक धर्म आहे कीं, क्वचित् एखादा विशेष प्रकृतीचाच मनुष्य सोडला तर, इतराच्या ठिकाणीं केवढेंही श्रेष्ठत्व असलें तरी तें त्याला सहसा बोंचत नाहीं. परंतु त्या श्रेष्ठत्वाची जाणीव तो दुसरा मनुष्य स्वतः त्याला कोणत्याही रीतीनें देऊं लागला, ह्मणजे मात्र तें त्याला यत्किंचितही सहन होत नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो त्याचा द्वेष करूं लागतो. आह्मीं मागील एका प्रकरणांत सांगितलेंच आहे कीं, जसजसे ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्या एकमेकांच्या संस्कृतींत फरक पडून त्यांच्यांत अंतर पडूं लागलें, व अनेक कारणांनीं, जाणून अथवा न जाणूनही, ब्राह्मण आपल्या श्रेष्ठत्वाची जाणीव त्यांना देऊं लागले, तसतसें, हें द्वेषाचें बीं पेरलें गेलें; व पुढें इतरवर्णांचीं मोठेपणाचीं विशिष्ट क्षेत्रें नाहींशीं झाल्यामुळें, आणि इंग्रेजी विद्या आणि इंग्रेजी राहणी यांचा ब्राम्हणांनीं स्वीकार केल्यामुळें, इतर वर्णांस आपलें हीनत्व जास्त भडक रीतीनें पदोपदीं जाणवूं लागलें. त्यांतच कुटिल राजनीतीनें आपल्या कारवाईचें तेल ओतल्यामुळें, हल्लींच्या भयंकर द्वेषाचें स्वरूप त्याला आलें. अशा स्थितींत, ब्राम्हणांनीं जर कोणती गोष्ट पहिल्यानें कर्तव्य असेल, तर ती हीच कीं आपल्या आचारणानें, ज्यांना ते अतिशूद्र समजतात, त्यांच्या पासून तों थेट ब्राम्हणांपर्यंत सर्व वर्णांस असें दाखवून देणें कीं हें श्रेष्ठत्व नसून ज्येष्ठत्व आहे. व आचारांत पाळले जाणारे विधिनिषेध अंतःकरणपूर्वक नसून नैमित्तिक आहेत.

स्वतःचे सर्व गुण दिसत असून, सर्वप्रकारचा तर-तम-भाव असून, व त्याप्रमाणें व्यवहारपद्धति असूनही त्याचा अभिमान अंगीं न लागूं देण्याची. व त्यामुळें अहंकार उत्पन्न न होतां, साऱ्या क्रिया प्रेममूलकच होण्याची, अध्यात्मशास्त्रांतील ही किल्ली आहे. पुनर्जन्म व कर्मतत्व मानणाऱ्यांना ती साध्य होणें मुळींच दुर्घट नाहीं. सर्व तऱ्हेचे असे तरतमभाव व उच्चनीचपणा हे त्या दोन जीवांत व्यक्ति दृष्ट्या कांहीं अंतर आहे ह्मणून उत्पन्न होतात असें नव्हें, तर जीवदृष्ट्या त्यांच्या वयांतच अंतर पडतें, ह्मणून होतात. ह्मणूनच वडीलपणाचा मान जरी कांहीं जीवांकडे आला तरी, त्याचा अभिमान न वाटतां, उलट वात्सल्यानें त्यांनीं आपलें वडीलपणाचें काम केलें पाहिजे. आपला लहान भाऊ हा कितीतरी

सृष्टींनीं आपल्यापेक्षां लहान असतो. त्याला सर्वतोपरी आपणच वागवून घेतों कित्येक कामांत आपल्यापासून त्याला दूर ठेवावें लागतें; कित्येक वेळां तो नको नको ह्मणत असतांही ' थांब, तूं काय चालशील? ' असें ह्मणून आपण त्याला कडेवर उचलून घेतों. त्याला सर्वतोपरी साह्य करून, त्याची जोपासना करून, त्याची प्रत्येक क्रिया योग्य वळणावरच जाईल, व तिचा त्याच्यावर इष्ट असाच परिणाम होईल, याची आपण खबरदारी घेतों; परंतु असें सर्व करीत असतां, तो लहान ह्मणून, दुर्बळ ह्मणून, अज्ञान ह्मणून, आपल्या मनांत त्याच्याविषयीं कधीं तुच्छता वाटते काय? अथवा, त्याच्याशीं वागत असतांना, त्याचीं कामें करीत असतांना, व त्याला शिकवित असतांना, तो एक हीन जीव आहे, व आपण कोणी मोठे आहों, असें कधीं आपल्या मनास शिवतें काय? कधींच नाहीं. आपल्या मनास जें काय ठाऊक असतें तें इतकेंच, कीं तो लहान आहे, त्याला अजून मोठें व्हावयाचें आहे, तो कोंवळा आहे, त्याला पक्के व्हावयाचें आहे, त्याच्याजवळ कांहीं नाहीं, तें त्याला मिळवावयाचें आहे, इतकेंच. एरवीं त्याच्यांत व आपल्यांत काडीइतका फरक नाहीं. उद्यां तो लहानाचा मोठा झाला कोंवळ्याचा पक्का झाला, जें त्याजवळ नाहीं तें त्यास मिळालें, ह्मणजे तो आपल्या सारखाच होईल. ह्मणून त्याबद्दल आपणास कधीं विषाद वाटत नाहीं, उलट त्याच्याविषयीं अतिशय लोभ वाटतो, जें त्यास जगांत मिळवावयाचें आहे, तें आपणच त्यास द्यावें, अशी इच्छा होऊन तीच आवड मनास लागते, सर्वप्रकारें त्याचें किती करूं न करूं, असें होऊन जातें. येथें सर्वतऱ्हेचा भेद उघड उघड असतां, तो नाहींसा होऊन अतिशय निर्मळ आणि सत्य असा निरपेक्ष कळवळा मात्र उरतो. जगांत सर्व तऱ्हेचे भेद उघड उघड नांदत असतां व त्याप्रमाणें वागत असतां, अध्यात्मविद्येचा साधक या ज्ञानानें पूर्ण निरहंकार स्थिति प्राप्त करून घेतो. तीच खरी निरहंकार स्थिति. एरवीं स्वतःस क्षुद्र समजून ' माझ्याजवळ कांहीं नाहीं, मी कसला? ' अशी आत्मनिंदा करून वाटेल त्या जीवाची जरी पायधूळ त्यानें मस्तकावर घेतली, अथवा समतेचा नुसता आव आणून, एकमेकांच्या तोंडातला घास जरी एकमेकांच्या तोंडांत घातला, तरी तें खरें निरभिमानित्व नव्हे, व ती खरी समता नव्हे. सारे जीव वस्तुतः सारखेच आहेत, परंतु त्यांच्या जीवदशेचा प्रारंभ जसा आगेमागें झाला असेल, अथवा अनुभवांच्या घावांनीं त्यांच्यावरील मोहाचीं, व व्यक्तित्वाचीं पटलें अशीं कमी जास्त फुटलीं असतील, तसा त्यांच्या बाह्यस्थितींत

फरक पडून उच्चनीचपणा भासतो, इतकेंच. ही आध्यात्मिक दृष्टि ब्राह्मणांनीं पूर्वीप्रमाणें पुन्हा आपल्या कृतींत आणली पाहिजे, ह्मणजे इतर वर्णांशीं सर्वप्रकारचे आचारभेद पाळीत असतां, असा कळवळा त्यांनीं खरोखरच वागविला पाहिजे. ह्मणजे या रोटीबेटीच्या बंदपणाचें कोणासही दुःख होणार नाहीं. एवढ्याकरितां, आपली राहणी, कपड्यालत्यासारख्या बारीक गोष्टींपासून जितकी Plain living व High thinking या तत्वास धरून होईल, तितकी ती केली पाहिजे.

ब्राह्मणाची स्त्री वैद्यकासारखी एखादी विशेष विद्या संपादून, अथवा इतर कोणतेंही शिक्षण घेऊन, त्या ज्ञानाचा फायदा जर इतरांस देऊं लागली, तर त्याच्याबद्दल असंतोष कोणास होईल? परंतु त्या शिक्षणाबरोबरच तिची राहणीही साधीसुधी व नम्रतेची नसेल, तिच्याकडे पाहिल्याबरोबर 'ही एक वात्सल्याची व श्रेष्ठ तेजाची मूर्ति आहे,' असा भास न होतां, तिच्या पोषाखाच्या ऐटीनें, तोऱ्याच्या वागण्यानें व सर्वप्रकारानें 'आपण कोणी विशेष जीव असून मोठा स्वार्थत्याग करून दुसऱ्यावर उपकार करीत आहों' अशा प्रकारची जाणीव पावलोंपावलीं दुसऱ्यास देण्याच्या पद्धतीनें, अन्य कोणतीही भावना तिच्याविषयीं उत्पन्न होऊं लागली, तर त्याच्यायोगानें इतरवर्णांच्या बायकांस, लागलींच आपलें हीनत्व भासून, द्वेषाची ठिणगी कां पडूं नये? तेव्हां जेणेंकरून ज्ञानापलीकडे इतर कोणतेंही तारतम्य दुसऱ्यास भासणार नाहीं, अशी साधी व प्रेमळपणाची राहणी, यांचा पुन्हा ब्राह्मणांनीं स्वीकार केला पाहिजे. आपल्या घरांतील वडील माणूस दिसलें ह्मणजे, ज्याप्रमाणे त्याविषयीं केवळ आदर व आपलेपणाच उत्पन्न होतो, त्याच्यारूपाकडे अथवा गुणदोषांकडे लक्षही जात नाहीं, त्याप्रमाणें ब्राह्मण आणि विशेषतः ब्राह्मणस्त्रिया, या दिसल्या असतां, इतर कोणासही, 'ही एक उपभोगाची वस्तु आहे,' असें न वाटतां, हें एक वडील माणूस आपल्या साह्यास आलें आहे, असें वाटलें पाहिजे. हें आमचें लिहिणें ह्मणजे केवळ एक गोड कल्पना आहे, असें वाटण्याचें कारण नाहीं. पूर्वी एका काळीं, ब्राह्मणवर्गाची अशी प्रत्यक्ष स्थिति होती. आणि ह्मणूनच इतरवर्णांकडून त्यांना मान मिळत आला आहे. 'मान द्या' ह्मणून कोणी कधींही देत नसतो, तो हक्कानें घ्यावयाचा असतो, मात्र इतकेंच कीं, वतनदारीच्या हक्कानें नव्हे. तर खरोखरीच्या थोरपणाच्या हक्कानें. सारांश इतकाच कीं मागील प्रकरणांत मीमांसा केल्याप्रमाणें, ज्याच्या त्याच्या भिन्न क्षेत्रांत त्याला मोठेपणा देऊन, केवळ धार्मिक बाब सोडली तर इतर वर्णांतलें आणि आपलें अंतर

त्यांना न जाणवितां अनुकरणीय होईल, अशा तऱ्हेनें आपली राहणी ठेवून, प्रेम विश्वास, थोरपणा, माणुसकी, याच गोष्टींची खरी किंमत असून, ते सारे केवळ अंतःकरणाचे विषय आहेत, रोटीबेटी सारखे प्रश्न केवळ खाजगी असून, त्या उदात्तमनोवृत्तीच्या मानानें क्षुद्र आहेत, असें त्यांचें त्यांनाच पटवून देऊन ब्राह्मणांनीं त्यांच्या हृदयांतील आपलें स्थान, केवळ वतनदारीचा हक्क न सांगतां कर्तृत्वानें मिळविलें पाहिजे. असें करीत असतां त्यांना मागील प्रकरणांतील उताऱ्यांतील ज्यू लोकांप्रमाणेंच पुष्कळशा ऐहिक सुखाला मुकावें लागेल व राणा **प्रतापसिंहा**प्रमाणें रानावनांत दिवस काढून, वेळीं तृणबीजांवरही निर्वाह करावा लागेल. परंतु त्याला उपाय नाहीं तें त्याच पद्धतीनें झालें पाहिजे.

नाहींतरी आतां असा प्रसंगच आला आहे कीं वाघ म्हटला तरी खातो आणि वाघोबा म्हटला तरी खातो; मग शौर्यानें पुढें सरून वाघरूं म्हणून दोन हात तरी कां करूं नयेत ? एक तर, खरोखर ब्राह्मणपणाला फांटा देऊन नुसत्या नांवाचे ब्राम्हण होऊन, लांड्याकोल्ह्याप्रमाणें आपला सांप्रदाय वाढविण्याकरितां, कांहींतरी युक्तिवादानें आपल्या कृतीवर पांघरूण, घालून अथवा तिचें समर्थन करून कांहीं सुखसंपत्तीची जोड झाली तर पहावें, नाहींतर, सर्व प्रकारच्या आपत्ति सोसण्यास तयार व्हावें, अशी स्थिति दिवसेंदिवस सहजच होत आहे तिची जाणीव ब्राम्हण म्हणविणाऱ्या प्रत्येकास निखालस पटलेली आहे. आज सुस्थितीमध्यें दिसणाऱ्या ब्राम्हण कुटुंबांत देखील पुढें आपल्या पोराबाळांच्या पोटापाण्याची काय व्यवस्था होईल, याविषयीं मोठाच प्रश्न पडलेला आहे. शिक्षणानें काम भागेनासें झालें, तेव्हां औद्योगिक चळवळी, व्यापारटापार इत्यादि सर्व उपाय हळूहळू अवलंबण्यांत येत आहेत, परंतु कोणीकडेही पहा, केवळ आपलें ब्राह्मण्यच आपलें वर डोकें काढण्याच्या आड येतें, अशी त्यांची आतां पावलोंपावलीं खात्री होऊं लागली आहे. कारकुनीपेशा उलटून सेवावृत्तीनें गेल्या सर्व शतकभर, कसेही कां होईना, कांहीं बरे दिवस ब्राह्मणांनीं अनुभवले. परंतु श्वानवृत्तीच्या सेवावृत्तीला दिवसेंदिवस ब्राह्मण्याचा किती विटाळ होऊं लागला आहे, तें कांहीं सिद्ध करून दाखविण्याची गरज नाहीं. होतां होईल तों ब्राह्मणांस नौकरी मिळूं नये, अगर मिळाल्यास फार मोठ्या अजिजीनें अथवा नाइलाजास्तव मिळावी, अशी खाजगी व सरकारी अशा सर्व खात्यांत सहजच व्यवस्था होत आहे. थोड्याबहुत प्रमाणानें अर्थप्राप्तीच्या सर्व क्षेत्रांमध्यें हाच भेद वाढत आहे. पुढें तर तो जास्त तीव्र होईल असें मानण्यास

जागा आहे. अशा स्थितींत, इकडे नावांस ब्राह्मण ह्मणवावें, तिकडे प्रसंगोपात ' पानी, तेरा रंग कैसा ' असें वर्तन करून, पुन्हा आपल्या मताच्या उदारपणाची प्रौढी मिरवावी, असें ज्यांना साधतें, तेच कांहीं सुस्थितींत आहेत. शेती व सावकारी या धंद्यांवर कांहीं ब्राह्मण घराणीं कुठें जरा बऱ्या स्थितींत आढळतात; परंतु महाराष्ट्राबाहेरील अथवा महाराष्ट्रांतीलही इतर जातीच्या त्याच धंद्यांतील लोकांशीं तुलना केली असतां, त्यांना अगदीं नाहीं तरीं, जवळजवळ दरिद्रीच म्हणावें लागेल. अशा स्थितींत पैशाच्या साह्यानें ब्राम्हणवर्गास आपलें स्थान स्थिर करतां येईल, ही गोष्ट शक्य वाटत नाहीं. तेव्हां, ज्या कोणास त्या संस्कृतीची खरी आस्था असेल, त्यांनीं कांहीं काळ तरी धर्म आणि ऐहिक सुखसोय या दोघांची सांगड घालून स्वतःचें गाडें निभवितां येईल, ही कल्पना टाकून दिली पाहिजे. क्रांतिकारक ज्याप्रमाणें स्वतःच्या सर्वस्वाची होळी करून अत्याचारी मार्गानें स्वातंत्र्य मिळविण्याकरितां पुढें येऊं पाहत आहेत, अनत्याचारी लोक अत्याचाराचा अवलंब जरी न केला तरी सर्वस्वाची होळी केल्याशिवाय स्वराज्य मिळणार नाहीं, हें पक्कें ओळखून, तें कसें साधेल याची चिंता करीत आहेत, ब्राम्हण्य रक्षण्याकरतां ब्राम्हणांनीं आपण होऊन त्याप्रमाणें करण्यास तयार झालें पाहिजे.

असें सुचविण्याचें कारण एवढेंच कीं, आपत्तींत गांजलेल्या लोकांच्या चित्तास व्यामोह होऊन, देवाधर्मावर विश्वास ठेवणारे लोक कष्ट भोगतात, आणि वाटेल तसें वागणारे लोक चैनींत राहतात, तेव्हां कशांतच कांहीं नाहीं, असा वैताग मधुन मधुन उत्पन्न होत असतो; व त्यामुळें त्यांच्या नाड्या शिथिल होऊन त्याच्या हातून व्हावा तसा प्रयत्न होत नाहीं. अंतःकरणांत तर, आम्हीं मागें उल्लेखल्याप्रमाणें वेदिक धर्माविषयीं व ब्राम्हण्याविषयीं सर्वप्रकारें विश्वास असतो. त्याचें ऊर्जित व्हावें अशीही चाड असते; त्यामुळें, उरल्यासुरल्या ब्राम्हण्याला फांटा देऊन नांवाचे ब्राम्हण त्यांना होऊन राहतां येत नाहीं; आणि वर सांगितल्याप्रमाणें व्यामोहांत पडल्यामुळें दुर्बलपणा येऊन, विहिताचारही ज्याप्रमाणें कर्मठपणानें व तेजस्वितेनें व्हावयास पाहिजे तसाही होत नाहीं. यामुळें त्यांची स्थिती खरोखरच चमत्कारिक होऊन, उत्तरोत्तर जास्त निस्तेज व आत्मघातकी होत आहे. हाच प्रकार मोठ्या प्रामाणावर चोहींकडे दिसून येतो. म्हणून या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख केला. आपत्ती तर पुढें वाढून ठेवलेली दिसतच आहे. स्वतःचें सत्व राखून, कोणत्या तरी उपायानें ती टळेल, हें केवळ अशक्य आहे. अशा स्थितींत गांगरून न जातां,

एका हातानें आपलें स्वत्व सांभाळून धरण्याकरतां, दुसऱ्या हातानें आपण होऊन शूरपणानें आपत्तीला आणि मृत्यूला कवटाळण्यांत भूषण नाहीं काय ?

याला जोडून तिसरी गोष्ट अशी करावी लागेल कीं, स्वभावाचा गोडपणा, संभावितपणा, उदारमतपणा, व्यवहारज्ञता अथवा पांडित्य इत्यादि ढोंगांखालतीं अबाधितपणानें चालणारा सर्वप्रकारचा मिथ्याचार बंद केला पाहिजे. एका प्रकारानें या प्रचंड राष्ट्रांतील सर्व निरनिराळे अवयवरूप समाज आपापल्या ठिकाणीं जागे होऊन सुसंघटित व समर्थ करण्याची खटपट करूं लागले आहेत. पुनर्घटनावादी आपली मोहीम जोरानें चालवीत आहेत. अशावेळीं वैदिकधर्माच्या खऱ्या पुरस्कर्त्यांनीं ' हार मानली झगडा तुटला, ' अशा तऱ्हेनें डोळेझांक करण्याची वेळ राहिली नाहीं. कोणत्याही समाजाचा घटक परमाणु जितका जास्त कसदार, व किंमतवान असतो, तितक्या मानानें त्या समाजाची घटना जास्त सुदृढ व जिवट असते, हें उघड आहे. व्यक्तीनें तशा रीतीनें आपला मगदूर वाढविल्याखेरीज, नुसत्या सभा करून, अथवा रसभरित भाषणें करून, किंवा ठराव करून कधींच कांहीं हातांत पडत नाहीं, ही गोष्ट श्रीअण्णासाहेब पटवर्धन यांच्या चरित्राच्या उपसंहारांत स्पष्ट रीतीनें मांडली आहे. एकीकडून, धर्मावर विश्वास आहे ह्मणावयाचें व दुसरीकडून कांहीं ना कांहीं पळवाट काढीत असावयाची, असें केल्यानें फार झालें तर दोष लागणार नाहीं, परंतु धर्माचें मुख्य फळ पदारांत पडून तेजही वाढणार नाहीं. आणि सध्यां गरज तर तेजसंपन्नतेची आहे. ह्मणून हा मिथ्याचार टाकून देऊन, कोणत्याही कारणानें धर्माचरण यथाविधि घडणें शक्य नसल्यास, त्यांतून कांहीं तरी पळवाट काढून आपण धर्माचरण केलें, अशी मनाची कशीबशी समजूत घालण्यापेक्षां, तें यथाविधि हातून घडत नसल्याचा उद्वेग पदरांत घेणें जास्त चांगलें. त्याच्या योगानें भलभलत्या परंपरा तरी उत्पन्न होत नाहींत, व असलेल्यांचें स्वरूप अविकृत राहतें. पळवाट काढण्याची एकदां संवय लागली, ह्मणजे साऱ्या गोष्टींची कशी थट्टा होऊन जाते, त्याचा अनुभव नेहमीं येतो.

संकष्ट चतुर्थीस चंद्रोदय लौकर असला व भूक सोसण्याची ताकद असली, तरी ' आमचा प्रघातच असा आहे, ' असें ह्मणून ताह्मनांत चंद्र काढूनच पारणें करणारे कित्येक लोक आढळतात. अशा तऱ्हेचीं अनेक उदाहरणें आहेत. हा सर्व प्रकार टाकून दिला पाहिजे, व इतर कांहींही असलें तरी, त्यांत दुर्बळपणा आहे, ह्मणूनच निंद्य समजला गेला पाहिजे. श्रावणीची आणि यज्ञोपवीत धारणाची जवळ

जवळ अशीच थट्टा झाल्याचें पाहण्यांत येते. नौकरीमुळें वेळ मिळत नाहीं म्हणून, सकाळीं ८ वाजतां श्राद्ध उरकून संतुष्ट होणारे कांहीं थोडे लोक सांपडत नाहींत. श्राद्ध हा, आजकाल समजण्यांत येतें त्याप्रमाणें, केवळ स्मृतिदिन आहे, व त्या दिवशीं त्याच्या स्मरणार्थ आपल्या ऐपतीप्रमाणें कांहींतरी विशेष गोष्ट केली म्हणजे झालें, ही समजूत चुकीची आहे. श्राद्धाच्या मूळ संकल्पाप्रमाणें त्यांत पितृदेवतांचें आवाहन असून, मध्यस्थाच्या द्वारें पितृलोकाशीं संबंध जोडावयाचा असतो, आणि म्हणून त्याला अपराण्ह काळच योग्य आहे. अशा स्थितींत तसें घडणें शक्य नसल्यास इतर कांहीं पुण्यकर्म करूं नये, असें नाहीं. परंतु श्राद्धसंस्कारांतील ही जी आवाहनाची कल्पना ती डोळ्यापुढून केव्हांही जाणार नाहीं, अशा रीतीनें तें केलें पाहिजे. शास्त्रांत पिंडदान, ब्राह्मणभोजनापासून, तों गाईला चारा घालणें, आणि तेंही शक्य नसल्यास वेशीवर जाऊन बोंब मारणें येथपर्यंत सर्व श्राद्धपर्याय आहेत. परंतु त्या सर्वांत हें धोरण कायम ठेवलेलें आहे. अशा स्थितींत श्राद्ध करावयाचें म्हटलें, तर तें यथाशास्त्र यथाकालींच झालें पाहिजे, तें वाटेल त्या वेळेस, वाटेल त्या रीतीनें उरकून घेण्यापेक्षां, ' आपणास तें करतां येत नाहीं ' अशी तळमळ पत्करलेली चांगली. कारण तिच्यामुळें ईश्वराच्या कृपेनें यथाशास्त्र श्राद्ध करण्याची अनुकूल संधी एक दिवस तरी खास मिळेल, व तें जें कर्म घडेल, तें अधिक श्रेयस्कर होईल, असें आम्हांस वाटतें. अशीच गोष्ट इतर सर्व विधिनियमांची आहे. श्राद्धाचें हें एक सहज फार प्रचारांतलें म्हणून उदाहरण घेतलें. पळवाट काढूनही कोणीकडून तरी विधीचें स्वरूप व अस्तित्व टिकविण्यांत देखील कांहीं चांगलें नाहीं, असें नाहीं. त्याच्या योगानें परंपरा जीव धरून राहते. परंतु केवळ परंपरा जगविण्यावरच आतां किती दिवस समाधान मानणार ? त्याचप्रमाणें दुसरें असें कीं परंपरा जगवितानाही, तिचें मूळ स्वरूप विकृत न होतां अखंड राहील, मूळ स्वरूपासून ती होतां होईल तों दूर जाणार नाहीं, अशीही काळजी घेतली पाहिजे. असो.

वेदाचें धर्ममूलत्व आणि चातुर्वर्ण्य मानणाऱ्या ब्राह्मणांनींही इतर अनेक समाजांप्रमाणें स्वतःस पुनः सुसंघटित, व समर्थ केलें पाहिजे, असें आम्हीं म्हटलें आहे. परंतु ही गोष्ट देखील आजकालच्या स्थितींत आकाशास ठिगळ देण्याजोगी झाली आहे. तरीपण तिला खरी सुरुवात करावयाची असेल तर, काय केलें पाहिजे याचा थोडक्यांत विचार केला पाहिजे. यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान

आणि इतक्या सर्व अमोलिक गुणांस, रूपाची शोभा वाढविणाऱ्या गालबोटाप्रमाणें भूषण म्हणून प्रतिग्रह, हें आपलें षट्कोन कर्म सोडून, ब्राम्हण ज्या वेळेला इतर धंदे उचलूं लागले, त्यावेळेस, अर्थातच, अध्ययन आणि अध्यापन हें त्यांना अशक्य झालें. ब्राम्हण हे सर्व वर्णांचे गुरु असल्यामुळें, सर्व वर्णांच्या विद्या येण्याची एक तऱ्हेनें त्यांचेवर जबाबदारीच आहे. परंतु, त्या केवळ त्या त्या वर्णांना शिकविण्यापुरतीच, ती जबाबदारी आहे. स्वतःच्या चरितार्थाचें साधन ह्मणून त्यांचा अवलंब ब्राह्मण करूं लागले, कीं अर्थातच त्यांचा अधःपात हा ठेवलेला. असें असतां, ब्राह्मणांनीं ज्या वेळेला सर्वस्वीं त्या वृत्तींचा अवलंब केला, तेव्हां त्यांच्यांत गृहस्थ व भिक्षुक असे दोन भेद साहजिकच पडले; आणि वेदसत्व आणि ब्राह्मण्य सांभाळण्याची व या गृहस्थब्राह्मणांना ब्राह्मण्यांतून अजिबाद न जाऊं देण्याची अशी दुहेरी जबाबदारी भिक्षुकवर्गावर पडली. पुष्कळ काळ पर्यंत ती त्यांनीं नीट पार पाडली. जोंपर्यंत ' यदृच्छालाभतुष्टस्य तेजो विप्रस्य वर्धते '–हें वामनानें बलीला सांगितलेलें महातत्व ध्यानांत ठेवून, पूर्ण अलोलुपतेनें ते आपलें काम करीत होते, तोंपर्यंत सर्व कांहीं गाडें सुरळीत होतें. परंतु पुढें प्रतिग्रहाचें भूषण झेंपेनासें होऊन, ते वृत्तींत अडकून पडूं लागले, व त्यामुळें त्यांचें तेज कमी होऊन आजच्या स्थितीला तर कांहीं दृष्टींनीं गृहस्थापेक्षांही त्यांची अधिक अवनति झालेली आहे.

ब्राह्मणेतर लोक भिक्षुक व कुळकर्णी वगैरे वर्गाची जी टवाळी करतात, ती कितीही नींद्य व चीड आणणारी असली तरी तींत सत्याचा अंश देखील नाहीं, असें म्हणतां यावयाचें नाहीं, हें आम्हीं मागील विवेचनांत निर्भीडपणें लिहिलेंच आहे. दारिद्र्यांत गुणसंपत्तीचा विकास होतो, असें पुष्कळ वेळां ऐकण्यांत येतें. परंतु दारिद्र्य हें विषासारखें आहे. घरंदाजपणाच्या जिवंत जाणिवेनें तें जर मारलें गेलें असलें तर, त्याचा पुष्टिकारक परिणाम होतो हें खरें आहे. जगांतले बहुतेक सर्व महापुरुष दारिद्र्यांतच आपल्या गुणसंपत्तीचा विकास करून पुढें आलेलें दिसतात, ह्मणून असा भ्रम उत्पन्न होतो. कोणत्याही कुटुंबाचा अथवा व्यक्तीचा घरंदाजपणाचा व पूर्वशीलाचा पीळ ढिला पडलेला नसेल, तरच दारिद्र्य हें रसायनाप्रमाणें पोषक होतें. एरवीं ' दारिद्र्यदोषो गुणराशिनाशी ' * हाच सिद्धांत खरा. अशा या विषमय

---

* एकोहि दोषो गुणसंनिपाते ।
निमज्जतीन्दो रिति यो बभाषे ॥

दारिद्र्यामुळें व कांहीं अंशीं लोभामुळेंही भिक्षुकवर्गाची स्थिति कींव करण्याजोगी झाली असली, तर कांहीं नवल नाहीं. त्यांच्या लोलंगतेचें, स्वार्थपरायणतेचें, मनोदुर्बळतेचें जास्त वर्णन करण्याचें कारण नाहीं. जें केलें आहे, तें देखील त्यांचा अपमान करण्याकरितां नाहीं. 'आतां तरी ब्राम्हणीं आपणाला । शहाणे करावे॥' एवढ्याचकरितां केलें आहे. क्षेत्रस्थ ब्राम्हणांच्या व इतरही प्रकारच्या वृत्तिवान् ब्राम्हणांच्या अनेक लीलांचें जें वर्णन आजकाल एकमुखानें चोहींकडे ऐकण्यांत येतें व ज्याचा अनुभव थोड्याबहुत प्रमाणानें सर्वानांच नेहमीं येत असून, 'झांकली मूठ सवा लाखाची-' ठेवण्यांत येते, त्या अजीबात खोट्या आहेत, असें तेही म्हणूं शकणार नाहींत. या आमच्या लिहिण्याचा, प्रमाण म्हणून ब्रह्मद्वेष्टे इतर लोक कदाचित् उपयोगही करतील, परंतु त्याला भिऊन आत्मपरीक्षणार्थ स्वतःच्या गुणदोषांचें निरीक्षण करणें कसें सोडावें? त्याचप्रमाणें, सर्वब्राम्हणजातीनें आणि त्यांतून गृहस्थांनीं तर अगदींच ताळ सोडला असतां, कांहीं थोडी वेदविद्या जी अ ज दिसते आहे, ती भिक्षुकांनींच राखून ठेवली असतां, त्यांच्यावरच आम्ही तोंड काय म्हणून सोडतों, असें तेही आम्हांला विचारतील. पहिल्या लोकांस आमचें असें सांगणें आहे कीं, विषयाच्या ओघानें जरी आम्हांस कांहीं गोष्टी कडक शद्बांत लिहिणें भाग पडलें, तरी तें 'भावी अशिव परिहारार्थच' आहे. एरवीं, अधःपाताच्या सरसहा वरवंट्याखालीं ब्राम्हणांचीं शरीरेंच अजून त्यांतल्या त्यांत, वेदविद्येच्या जास्त लायक राहिलीं आहेत, असें आमचें मत आम्हीं स्पष्टपणें नमूद करून ठेवलें आहे ज्याप्रमाणें ब्राम्हणांमध्यें प्रमाणाबाहेर अधःपतित शरीरें आढळतात, त्याप्रमाणें इतर जातींत देखील, त्यांच्या मानानें, चांगलीं शुद्ध कुटुंबें व शरीरें पुष्कळ आढळतात; नाहीं असें नाहीं. आणि त्यांना सुसाध्य अशा योग, भक्ति, इ० मार्गाचें अवलंब करून ब्राम्हणांच्या बरोबरीनेंच आपली आध्यात्मिक उन्नति करून घेतां येईल. त्याविषयीं आमचा वाद नाहीं. तेव्हां त्यांनीं ब्राम्हणांच्या नांवानें फुकट खडे फोडून स्वतःचा तमाशा न करतां, आपलींही शरीरें शुद्ध करावीं, व ब्राम्हणांनाही विहिताचार करावयास भाग पाडावें. एरवीं लेखनकलेचा

---

नूनं न दृष्टं कविनापि तेन ।
दारिद्र्यदोषो गुणराशिनाशी ॥

अच्युतशास्त्री मोडक.

उपयोग करून, एकमेकांविषयीं वाटेल तसे तमाशे वाटेल त्यांस लिहितां येतील. दुसऱ्या वर्गांतील लोकांना आमचें असें म्हणणें आहे कीं, गृहस्थांनीं ताळ टाकला यांत कांहींच शंका नाहीं, परंतु त्यांत कांहीं नवलही नाहीं. ज्यादिवशीं ते आपली वृत्ति सोडून पुरे दुसऱ्या वृत्तींत पडले, त्या दिवशींच एकप्रकारें वेदाच्या प्रत्यक्ष रक्षणाची जबाबदारी त्यांनीं आपल्यावरची झुगारून दिली. तेव्हां आतां त्यांनीं आपलें काम टाकून दिलें, असल्या नुसत्या समाधानानें कसें भागणार? त्याचप्रमाणें, त्यांनीं आपलें काम टाकले म्हणून आम्हीं आमचें सोडावें कीं काय? 'जें गेलें तें गेलें, ज्यांना जावयाचें असेल त्यांनींही अजून खुशाल जावें,' ज्यांना उभें राहून लढावयाचें असेल, त्यांच्याकरतां आमचें हें लिहिणें आहे.

भिक्षुकवर्गाचा शीलदृष्ट्या झालेला अधःपात, आणि गृहस्थवर्गाचा मिथ्याचार, यांमुळें वेदविद्या तर दूरच राहिली, परंतु नुसत्या वेदध्वनीचाही दिवसें-दिवस केवढा लोप होत आहे, त्याचा प्रत्येकास अनुभव आहेच. पुण्यासारखीं कांहीं गांवें सोडलीं तर, इतर ठिकाणीं नुसतें षोडशकर्मोइतकें याज्ञिक यथासांग करणारे ब्राम्हणही मिळेनासे झाले आहेत. नशीबाची गोष्ट एवढीच आहे कीं, पोथी-वरून पवमानाचा अभिषेक करणारे तरी ब्राम्हण अजून पुष्कळ ठिकाणीं मिळतात. अशा स्थितीमध्यें, भिक्षुक वर्गाची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न उत्तम प्रकारच्या द्रव्यबलाखेरीज साध्य होणार नाहीं; व भिक्षुक वर्ग हाच मुख्य वैदिक लोकांचा पृष्ठवंश असल्यामुळें, तो सुदृढ झाल्याखेरीज शरीर निकोप होणार नाहीं. जीं काय थोडीं वेदाक्षरें राहिलीं आहेत, तीं देखील, आचारधर्माच्या संकरामुळें निस्तेज झालीं आहेत. अशा स्थितींतून वर डोकें करावयास भिक्षुक व गृहस्थ या दोनही वर्गांतून 'अक्रोधनैः शौच्यपरैः सततं ब्रम्हचारिभिः' अशा निवडक व्यक्तींकडून नवा भिक्षुकवर्ग निर्माण होणें, हाच एक मार्ग आहे. भिक्षुकवर्गाला समाजामध्यें जें एक प्रकारचें हीन आणि अवमानाचें स्थान दिलें जातें, तेथून त्यास काढून त्यास पुन्हा शिरोधार्य केल्याखेरीज, या कठीण प्रसंगांतून निभाव लागणार नाहीं. आणि भिक्षुकवर्ग पुन्हा शिरोधार्य व्हावयाचा म्हणजे त्याचा, आम्ही म्हणतों तसा एक नवीनच अवतार निर्माण झाला पाहिजे. सुस्थितींतील गृहस्थ वर्गांतील घरंदाजपणा व शील आणि भिक्षुक वर्गाचें दारिद्र्य व वेदाध्ययन यांची सांगड घालून, उपा-ध्यायांचा एक नवाच वर्ग उत्पन्न झाला पाहिजे. ज्याप्रमाणें राष्ट्रकार्याच्या इतर अंगांत उच्च शिक्षण घेतलेले नीतिमान् असे अनेक तरुण, वाटेल तसा स्वार्थत्याग

करावयास पुढें सरसावत आहेत, त्याप्रमाणें हें काम करण्यासही वेदविद्येची आस्था असणाऱ्या सुशिक्षित घरंदाज तरुणांनींच पुढें आलें पाहिजे.

बी. ए. आणि एम्. ए. झालेल्या शीलसंपन्न तरुणांतूनच वेदाध्ययन करून कांहीं लोक निरपेक्षतेनें यथाशास्त्र उपाध्येपण करूं लागले, तर अर्थातच त्यांच्या निरपेक्षतेमुळें गृहस्थवर्गास मिथ्याचार करणें अशक्य होऊन आपल्या सर्व वर्तनास आळा घालणें भाग पडेल. आजच्या परिस्थितींत, हातचें कुळ जाऊं नये या विचारानें मारलेला उपाध्याय यजमानाला वाटेल ती पळवाट काढून देतो, व त्याच्या आचाराकडे आणि शीलाकडे दुर्लक्ष करतो. तसें या नवीन उपाध्यायवर्गाकडून होणार नाहीं. कारण, त्याचा हेतुच निरपेक्ष असल्यामुळें त्याला कोणासही दबून राहण्याचें कारण नाहीं, अथवा कोणचीही दाबादाब करण्याचेंही कारण नाहीं. असा उपाध्याय-वर्ग निर्माण झाला, तर त्याच्या कडकपणामुळें तो गृहस्थ लोकांच्या पचनीं पडणार नाहीं, असें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण एक तर, द्रव्यदृष्टीनें तो सोइस्कर होईल, व दुसरें असें कीं, आज देखील गृहस्थ व उपाध्ये यांच्यामध्यें कर्माचरणा-संबंधानें कशीही व्यवस्था होत असली, तरी आपलें कर्म होतां होईल तों अगदीं शास्त्रशुद्ध व यथासांग व्हावें, अशी यजमानाच्या पोटांत इच्छा असतेच. तेव्हां एका पैचीही खरी अपेक्षा न करतां यथाशास्त्र कर्म करणारा, सदाचारसंपन्न असा ब्राह्मण मिळाला, तर त्यालाच आपलें उपाध्येपण देण्यास कोणीही तयार होईल, व त्या उपाध्यायाच्या सदाचारामुळें, तपश्चर्येमुळें, निःस्पृहतेमुळें आणि सर्व प्रकारच्या श्रेष्ठ ज्ञानामुळें तो आपोआपच पुन्हा पूज्य स्थानीं बसेल. सारांश **नेपोलियनला** ज्याप्रमाणें **नॅशनलगार्ड** अथवा **पेशव्यांना** ज्याप्रमाणें **हुजूर-पागा**, त्याप्रमाणेंच वैदिकधर्माला भिक्षुकवर्ग. वरील पलटणींत ज्याप्रमाणें अतीशय कसोशीनें निवडून पारखून माणसें घेत, आणि त्या पलटणींचा दर्जाही अतिशय श्रेष्ठ समजला जाऊन तसाच त्यांचा **मान** ठेवण्यांत येई, त्याचप्रमाणें वैदिक-धर्माच्या या हुजूरपागेची काळजी घेतली गेली पाहिजे. सध्यांच्या काळीं ही भरती अर्थातच स्वयंप्रेरणेनें झाली पाहिजे. राष्ट्रीय शिक्षणाकरितां गेल्या दहा वर्षांत अनेक शिकेलेले लोक पुढें आलेले आहेत, व **अकोला** येथील **श्रीकृष्णधाम व सरस्वतीमंदिर** या संस्थासारख्या संस्था अतिशय स्वार्थत्यागपूर्वक चालवून, त्यांनीं हल्लींच्या दरिद्रस्थितींत राष्ट्रीय शिक्षण जितकें यशस्वी करणें शक्य आहे, तितकें करून दाखविलें आहे. **श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्राच्या

उपसंहारांत ह्मटलें आहे कीं ' राष्ट्रीय शिक्षकाची जागा राष्ट्रीय कॉलेजांतील खुर्चीवर नाहीं. गृहस्वामिनीच्या कानांतील डुलांप्रमाणें गृहलक्ष्मीला भूषविणाऱ्या पाळण्याजवळच ती असली पाहिजे.' असें सांगून ' राष्ट्रीय' शिक्षकांनीं आपल्या शाळा कॉलेजच्या इमारतींत आणि व्याख्यानमंदिरांत न चालवितां घरोघरीं घातल्या पाहिजेत. हें कसें करावयाचें, हा स्वतंत्र प्रश्न आहे,' असा प्रश्न उपस्थित केला आहे. वर सांगितल्याप्रमाणें सुशील व सुविद्य लोकांनीं स्वतःच्या स्वार्थत्यागानें उपाध्यायांचा नवीन वर्ग निर्माण करणें, आणि त्यायोगानें, कुटुंबांच्या अगदीं अंतरंगांत ठाणें देऊन, कुटुंबाशीं जिव्हाळ्याचा संबंध जोडणें, हा एक त्याचा मार्गच आहे. त्याप्रमाणें हल्लीं असलेल्या राष्ट्रीय शिक्षकांत, ज्यास वर्णाश्रमाची खरी चाड असेल, त्यांना असें करण्याची बुद्धि व्हावी, व त्यांच्याप्रमाणेंच वर्णाश्रमाची चाड असणाऱ्या इतर तरुणांनाहीं, तशीच प्रेरणा व्हावी, अशी परमेश्वराची प्रार्थना करून या एकंदर पुस्तकाचा अगदीं थोडक्यांत उपसंहार करूं.



प्रकरण ७ वें.

# उपसंहार.



हल्लींच्या काळीं वैदिकधर्मी ह्मणविणाऱ्यांमध्यें त्या धर्माच्या उपलब्ध असलेल्या स्वरूपावरच पूर्ण विश्वास असणारे, वैदिकधर्माविषयीं साभिमान असणारे परंतु हल्लींच्या पारतंत्र्यांत स्वातंत्र्यप्राप्तीचे नांवाखालीं जी केवळ आर्थिक चळवळ करण्यांत येते, त्या चळवळीच्या आड वैदिकधर्म येतो, असें खरोखरच वाटत असल्यामुळें, व धर्मापेक्षां, एक तर धर्महीन स्वातंत्र्याचें अथवा कोणत्या तरी धर्म-स्वरूपाच्या नांवाखालील स्वातंत्र्याचें महत्व त्यांना जास्त वाटत असल्यामुळें व्यामोह होऊन धर्माच्या वास्तविक स्वरूपाविषयीं अश्रद्ध झालेले, किंवा अर्वाचीन आधिभौतिक विद्यांच्यामुळें ग्रंथावलोकनाच्या आलेल्या नव्या दृष्टीमुळें अनेक-चित्त-विभ्रांत झालेले, आणि वस्तुतः जे नास्तिक आहेत, पूर्वी सांगितल्याप्रमाणें वैदिकधम आणि त्याचीं अंगप्रत्यंगें यांच्यावर ज्यांचा विश्वास नाहीं, परंतु, तो नाहीं असें स्पष्ट ह्मणवत नाहीं, किंवा कोणत्याही कारणानें तशी गरज वाटत नाहीं, उलट पुनर्घटनेच्या नांवाखालीं नानाप्रकारच्या युक्तिवादांनीं, लोकांस परिचित असलेल्या भाषेच्या साह्यानेंच आपल्या केवळ आर्थिक दृष्टीच्या सोईस पडेल अशी खटपट प्रामाणिकपणानें अथवा अप्रामाणिकपणानें करीत असलेले, व केवळ उदा-सीन—असे चार प्रकारचे वर्ग उत्पन्न होऊन एकप्रकारचा चौरंगी सामना सुरू आहे. यांतून पुढें काय निघणार, अथवा पुढें उपस्थित झालेल्या लोकक्षय करणाऱ्या कालाच्या दाढेंत, या सर्वांचेंच चर्वण होऊन त्यांचा निराळाच कोणता रंग बनणार, याची कल्पना करणें, मानवी बुद्धीच्या आटोक्याबाहेर आहे. परंतु तोंपर्यंत, जें स्वतःस वाटतें, तें प्रामाणिकपणानें करण्याची धडपड करणें, हें इतरांप्रमाणेंच वर्णा-श्रमांच्या कळ्या अभिमान्याचेंही कर्तव्य आहे. तशी धडपड केली असतां आपण लोकांच्या रोषास अथवा उपहासास पात्र होऊं, किंवा कालाच्या जबरदस्त ओघापुढें आपणास यश मिळणार नाहीं, अथवा आपण केवळ एकटे आहों, आपणांस कोणी अनुयायी नाहीं, अशा प्रकारच्या विचारांनीं दुर्बळ होऊन, तो जर आपलें कर्तव्य सोडून देईल, तर ' फारच बरी निरयगति ' अशा अधःपाताचा तो अधिकारी होईल.

परिस्थिति कशीही असली तरी, अनेक विचारांच्या या राष्ट्रसभेंत, केवढाही गलबला आणि अडथळा होत असला तरी, धैर्यानें उभें राहून, आपलें अस्तित्व लोकांस जाणविणें, ' मी येथें उभा आहे, माझें ह्मणणें तुह्मांस ऐकलेंच पाहिजे, ' असें ओरडून त्यांस ऐकविणें आणि ' I shall not leave unless bodily removed ' असें त्यांस खडकाविणें, यांतच त्यांचें वैदिकपण आहे. ही गोष्ट प्रयत्न दुर्बळ झालेल्या वर्णाश्रमांच्या अभिमान्यांस सांगून त्यांस जागें करावें, अशा पवित्र बुद्धीनें हा ग्रंथ लिहिण्याचें काम हातीं घ्यावें लागलें आहे.

या ग्रंथाच्या प्रारंभींच असें सांगितलें आहे कीं शंभर वर्षांच्या अनुभवानें सिद्धांत आता पक्का ठरलेला आहे. त्याविषयीं शंका घेण्यांत अर्थ नाहीं. तो सिद्धांत असा कीं, कांहींही झालें तरी जसें " जुनें मरून जाणें शक्य नाहीं, तसेंच नवेंही पण आतां कपाळाचें सुटत नाहीं. " वर्णाश्रमी लोकांच्या भाषेंत त्यांना उपयोगी पडेल असा हा सिद्धांत मांडावयाचा ह्मणजे असा कीं, कालाच्या नवीन परिस्थितींत तंतोतंत जुन्या स्वरूपांत वर्णाश्रमधर्म टिकणें शक्य नाहीं. त्यांत कांहीं तरी फरक केलाच पाहिजे. याविषयीं आतां दोघांचाही वाद नाहीं. असा फरक वेळोवेळीं पूर्वी करण्यांत आला आहे, ही गोष्ट ही वर्णाश्रमांच्या अगदीं कट्या अभिमान्यांसही मान्य करणें भाग आहे. असें जर आहे, तर मग प्रश्न कुठें पडला? व तो कां पडला? याचें उत्तर असें आहे कीं, याप्रश्नाकडे पाहण्याच्या वरील चार वर्गांच्या चार दृष्टि असोत, किंवा आणखीही किती असोत, यांत मुख्य पक्ष दोनच आहेत. एका पक्षाचें ह्मणणें असें आहे कीं, थोडा फरक तर केलाच पाहिजे, परंतु तो मूळ तत्वास धरूनच असला पाहिजे. तत्व सोडून केवळ सोईच्या दृष्टीनें करतां कामा नये; ह्मणजे त्यांच्या धर्मासुधारणेचें स्वरुप ' विशुद्धिश्यामिकापि वा ' असें आहे. आज्ञानानें व इतर अनेक कारणांनीं धर्माच्या मूलस्वरूपावर एक प्रकारचें किटण आलेलें आहे, तें जाळून टाकण्यापुरतीच त्यांच्या सुधारणेची दिशा आहे. दुसरा पक्ष व्यामोह होऊन धर्माच्या-वास्तविक स्वरूपाविषयीं अश्रद्ध झालेल्या आणि आजकालच्या पूर्णपरिणत अशा आधिभौतिक विद्यांमुळें ' अनेकचित्तविभ्रांत ' होऊन मंत्र, योग, वगैरे अतींद्रिय-शास्त्रं यांच्या अस्तित्वाविषयीं नुसती कल्पनाही करण्यास असमर्थ झालेल्या लोकांचा होय. यांच्याखेरीज जे अनेक पक्ष आहेत, ते एक तर, उघड उघड धर्मास झुगारून देणारें अथवा, वास्तविक नास्तिक, परंतु साधन ह्मणून धर्माचा आपल्या कार्यांत उपयोग करून घेणारे असल्यामुळें धर्माच्या पुनर्घटनेशीं त्यांचा खरा संबंध

येऊं शकत नाहीं. आमचा प्रस्तुतचा प्रयत्न जवळजवळ अशा लोकांकरितां नाहीं. वर सांगितलेले जे धर्माविषयीं खरी आस्था असणारे दोन पक्ष त्यांच्याच करितां हा प्रयत्न आहे. ही गोष्ट व तिच्या अनुषंगानें वैदिकधर्माचा विचार करण्याचा आणि त्याच्यांत फेरफार सुचविण्याचा अधिकार केवळ एकायानें आपणास वैदिक धर्मी ह्मणवून घेतलें, अथवा तो इतर कितीही रीतीनें शाहणा, मोठा किंवा जिव्हाळ्याचा झाला ह्मणून त्याला येत नाहीं, याचा विचार स्वतंत्र एका प्रकरणांत करून असें सांगितलें आहे कीं, धर्म ही एक केवळ भावना नसून, अथवा बुद्धिवाद नसून तो एक अनुभव आहे. एका अनुभवाच्या प्रत्यक्षतेचें प्रयत्नशास्त्र आहे. जरी धर्म हा आचारप्रभाव व नीतिप्राण असला, तरी तेवढेंच कांहीं त्याचें स्वरूप नव्हें. धर्म हें साधन असून, त्या पुलावरून एका विशिष्ट साध्याकडे जावयाचें असतें, कांहीं प्रत्यक्ष कमाई करावयाची असते. ह्मणून कोणताही धर्म ह्मटला ह्मणजे, त्यांतील तत्वज्ञान आणि नीतिशास्त्र यांच्याइतकेंच त्यांतील सर्व यत्नशास्त्राच्या मुळाशीं असलेल्या इहलोक, परलोक, यांचे परस्परसंबंध, मानवी जीवाचें चिरजीवन, मनुष्य मेल्यानंतर त्याचें अस्तित्व व गति, अनेक प्रकारच्या आधिदैविक व अध्यात्मिक शक्ति, व त्या शक्ति संपादून देणारीं, इहपरलोकाशीं दळणवळण घडवून आणणारीं आणि या पांचभौतिक जड देहांत असतांनाही मनुष्यास दिव्यता आणि अपार्थिवता प्राप्त करून देणारीं मंत्रविद्या, योगशास्त्र यांच्या सारखीं अतींद्रिय शास्त्रें, या सर्वांचें महत्व ज्यास पटलेलें आहे, व त्यांच्या अस्तित्वावर ज्याचा विश्वास आहे, तोच त्या धर्माचा खरा अनुयायी. त्यांच्याशिवाय केवळ आपल्याच बुद्धीनें त्याचे तुकडे पाडून ' ही धर्माची सामाजिक बाजू, ' ' ही काल्पनिक बाजू ' असें त्याचें वर्गीकरण करून, एक प्रकारानें Fools rush in, where angels fear to tread ' देवांना जेथें पाऊल टाकण्याचें जिवावर येते तेथें मूर्ख खुशाल धिंगाणा घालतो ' असा अतिप्रसंग करणारे लोक, हे वस्तुतः त्या धर्माच्या कक्षेंत नसतात. ह्मणून त्यांना त्या धर्मात फेरफार सुचवावयाचा कांहीं अखत्यार नाहीं. आजकालच्या अनियंत्रित मुद्रणाच्या कालांत काय वाटेल त्या प्रकारचें वाङ्मय उत्पन्न होत असतें. त्यानें आपली बुद्धि भ्रांत न होऊं देतां, अथवा तें वाङ्मय निर्माण करणाऱ्याच्या नांवापुढील पदव्यांनीं, त्यांच्या इतर गुणांनीं अथवा सामाजिक दर्जांनीं गडबडून न जातां, त्यांच्या प्रयत्नांनीं बुद्धिभेद न होऊं देतां, या दोनही पक्षांनीं धर्मसंशोधनाचें काम आपल्या स्वतःच्या अविकृत बुद्धीनें करावें, असा त्या प्रतिपा-

वनांतील भावार्थ आहे.

या संशोधनासबंधीं दुसरी महात्वाची गोष्ट अशी कीं, युरोपियन पंडितांनीं स्वतःच्या अनुभवावरून या संशोधनाचें जें एक शास्त्र बनविलें आहे,—त्याला पाहिजे तर आपण ऐतिहासिक दृष्टि ह्मणूं—त्याला वाजवीपेक्षां फाजील महत्व न देतां हें काम केलें पाहिजे. अनेक साक्षीदारांबरोबरीचाच तो एक प्रतिष्ठित साक्षीदार आहे, इतकेंच; ह्मणून तो कांहीं आमच्या घरचा पिढ्यान् पिढ्या घरांत वागलेला जुना पुराणा हितसंबंधी नव्हे. किती झालें तरी थोड्याशा काळचा तो वरवर पाहणारा. वैदिक संस्कृतीच्या अंतरंगाचें टीचभरही ज्ञान अजून ज्याला झालें नाहीं, त्या संस्कृतीविषयीं ज्याच्या अंतःकरणांत थोडा बहुत आदर असला तरी, यत्किंचितही प्रेम नाहीं, व ज्याच्या स्वतःच्या अनुभवाचा पल्ला मोठा धीर केला तरी ५।७ हजार वर्षांपलीकडे जाऊंच शकत नाहीं, तो या सापाप्रमाणें कात टाकून पुन्हा पुन्हा तरुण होणाऱ्या, परंतु प्रस्तुत काळीं वार्धक्यामुळें जर्जर होऊन दांतखिळी बसलेल्या जगज्जननीच्या अंतरंगांतील गोष्टी नेमक्या सांगूं शकतो, असें वाटणें, नुसतें खुळेपणाचेंच नव्हे तर बुळेपणाचेंही आहे. शिवाय या साक्षीदारांत एक मोठा दोष असा आहे कीं, अनुभवाच्या व्यापकतेच्या दृष्टीनें तो कच्चा आहे. वैदिक संस्कृति व अर्वाचीन पाश्चात्य संस्कृति यांच्यातील एक मोठा महत्वाचा भेद **श्रीअण्णासाहेब पटवर्धन** यांच्या चरित्रांत फार ठळकपणें सांगितला आहे. तो हा कीं तर्कशास्त्रदृष्ट्या या दोघांच्या अवस्थाच वेगवेगळ्या आहेत. स्वतःस जगांतील साऱ्या शहाणपणाचें आद्यतत्व समजणाऱ्या रगेल वृत्तीच्या पाश्चात्यांना संस्कृतीची निगतावस्था ( Deductive ) असूं शकते किंवा आहे, अशी नुसती कल्पना देखील सहन होत नाहीं. कारण तसें ह्मटलें ह्मणजे, जरी आज राजसिंहासनावर असले तरी, खालीं वांकून या वडील भावंडास मुजरा करणें त्यांना भाग आहे. आणि या ग्रंथाच्या अगदीं प्रारंभींच घेतलेल्या न्या० **वूड्रॉफच्या** वाक्याप्रमाणें तसें करणें तर त्यांच्या राजनीतीला अनिष्ट आहे. सारांश, अशा अनेक दोषांनीं या ऐतिहासिक दृष्टीला फाजील महत्व देणें योग्य होणार नाहीं, ह्मणून केवळ ऐतिहासिक दृष्टि, केवळ आर्थिक दृष्टि, केवळ '**वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः**' ही सर्व टाकून देऊन, तत्वसमन्वयाच्या कसोटीवर सर्व प्रश्न उलगडण्याचा प्रामाणिकपणें प्रयत्न करणें, हाच काय तो एक खरा मार्ग आहे.

याप्रमाणें या विषयासंबंधानें कांहीं पूर्व तयारी करून आह्मी प्रत्यक्ष

विषयाकडे वळलों आहों. आणि विशेषतः सर्व वादांचें मूळ ज्यांच्यामध्यें आहे, असे मुख्य पांच प्रश्न घेऊन त्यांच्यासंबंधीं विचार करण्याच्या निरनिराळ्या दृष्टि कशा एकांगी आहेत, हें दाखविलें आहे. मंत्रशास्त्र, योग इ० शास्त्रें या निवळ कल्पना नसून तीं प्रत्यक्ष शास्त्रें आहेत, व त्यांच्या त्यांच्या सिद्धांताचा खरेखोटेपणा प्रत्यक्ष प्रयोगानें ठरविल्याखेरीज त्यांच्या विरुद्ध बोलण्याचा कोणासही अधिकार नाहीं, **चातुर्वर्ण्य** हें वैदिकधर्माचें अव्यभिचारी अंग असून, वैदिकधर्माच्या वरील अंगप्रत्यंगांस धरून त्याची रचना झालेली आहे, व वर्णाश्रमतेमुळेंच स्पृश्यास्पृश्य, भक्ष्याभक्ष्य, जातिसंस्था, विवाहसंस्था व एकंदर स्त्रीजातीचा प्रश्न, हे सारे प्रश्न उत्पन्न होतात, म्हणून यांचा विचार वरील सर्व शास्त्रांच्या तत्वांस धरून केला पाहिजे, असें सांगण्याचा या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे. तसें करीत असतांना, वरील अनेक प्रकारचीं शास्त्रें, जातिसंस्था यांच्या संबंधाच्या कांहीं महत्वाच्या शंका, वैदिक धर्माच्या उत्कर्षापकर्षाच्या मीमांसेसंबंधीं चर्चा, सध्यांच्या अनवस्थेतून मार्ग काढण्याची शक्य ती दिशा, अशा प्रकारचा व्यवस्थित मार्ग सांपडेपर्यंत व्यक्तीनें स्वतः काय करावें, यासंबंधीं वैदिकशास्त्राचें धोरण, व सुविद्य आणि सुशील अशा उच्चवर्गीतील स्वयंसेवक तरुणांनीं उपाध्यायांचा एक नवीन वर्ग तयार करण्याची आवश्यकता इ० अनेक विषय अनुषंगानें आणून, वर्णाश्रमाच्या कट्या अभिमान्यांच्या भावी कार्याची रूपरेखा मांडून दाखविली आहे. तत्वनिष्ठा, आणि तत्वनिष्ठेकरितां जगण्यामरण्यांतच मनुष्याचें मनुष्यपण आहे, तेव्हां सर्व प्रकारचा मिथ्याचार टाकून देऊन, तत्वनिष्ठेच्या पायावर धैर्यानें उभे राहून, वाटेल तसा आत्मत्याग करण्यास प्रत्येकानें तयार झाल्याखेरीज, कशाचाही पुनरुद्धार खरोखर होणें शक्य नाहीं; तसें करीत असतां, कितीही मतें झालीं म्हणून भिण्याचें कारण नाहीं, कारण राष्ट्राची खरी उन्नति मतभिन्नता व आचारभिन्नता यांच्यामुळें कधींच अडत नाहीं. मतभिन्नता व आचारभिन्नता हा तर मनुष्याचा स्वाभाविक धर्मच आहे, व जोंपर्यंत मनुष्य–जाति आहे, तोंपर्यंत तो या नाहीं त्या स्वरूपांत राहणारच, राष्ट्राचें खरें गाडें अडतें तेजहीनतेमुळें, तेजस्विता ही मनुष्याच्या वाढीबरोबर स्वभावतः अथवा प्रयत्नतः उत्पन्न होणारी स्वतंत्र शक्ति आहे, तिच्या उत्पत्तीचा मतें आणि आचार यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं, म्हणूनच ती कोणत्याही राष्ट्रांत कोणत्याही काळीं आढळूं शकते, तेजहीन अशा केवळ एकमताच्या पुष्कळ लोकांपेक्षां भिन्नमताच्या अशाही थोड्याशा तेज-

संपन्न लोकांची एकी प्रसंगांत अतिशय चटकन्, खरी व बलवान् होते, आणि धर्माचें अस्तित्व त्याच्या अनुयायांच्या संख्येवर अवलंबून नसून, अनुयायांच्या तेजस्वितेवर व आत्मत्यागावर अवलंबून असतें, इत्यादि अनेक प्रकारचे कांहीं नवे, कांहीं जुने व कांहीं जुनेच परंतु नवीन प्रकाशांत मांडलेले विचार एका ठिकाणीं वाचावयास सांपडून, त्याच्या योगानें प्रामाणिक विचार करणारांना विचार करण्याच्या, व प्रयत्न करणारांना प्रयत्न करण्याच्या कांहीं नवीन बाजू दिसाव्या, व कांहीं न झालें तरी निदान, मिथ्याचाराची प्रवृत्ति कमी होऊन, कोणत्याही मताचा मनुष्य असो, त्याच्या इच्छेला व कर्तृत्वशक्तीला एक जोराची उसळी मिळावी. एवढीच ग्रंथकर्त्याची अतिशय कळकळीची इच्छा आहे.

हा सर्व विषय सुचण्याचें मूळ कारण जें नवीन स्मृतीच्या रचनेविषयीं अलिकडे चाललेली ओरड, त्यासंबंधानें एक दोन सूचना करून हा विषय आटोपूं, आमच्या स्मृति ह्मणजे कायद्याचीं पुस्तकें आहेत, असें समजण्यांत येतें, त्याप्रमाणेंच त्यांचें ‘ लॉ ’ या इंग्रजी शद्बानें भाषांतर करण्यांत येतें, व त्याला धरूनच ही नवीन स्मृतीची ओरड आहे. परंतु मनुष्यास कल्याणकारक शिक्षा लावून देणाऱ्या व अयोग्य आचाराबद्दल त्यास शिक्षा करणाऱ्या या आमच्या स्मृति, व अर्वाचीन कायद्याचीं पुस्तकें यांत एक मोठा फरक आहे. स्मृतींतील विधिनिषेध व प्रायश्चित्त हीं सर्व, वर सांगितलेलीं वैदिकधर्माचीं मूलतत्वें आणि विशेषतः पुनर्जन्मवाद, कर्मतत्व, ‘ प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः ’ व ‘ क्षीणाधिकारो भवति मुक्तियोग्यो न कर्मवान् ’ हे त्या संबंधाचे सिद्धांत, हीं सर्व गृहीत धरून मनुष्याच्या कर्माच्या दृष्टादृष्ट अशा दोन्ही परिपाकांचा विचार करून लिहिलेलीं असतात, व त्याप्रमाणें आचरण केलें असतां धर्माचें पूर्ण फल पदरांत पडून मनुष्यास आपली उन्नति अबाधितपणें करतां येईल, अशी जबाबदारी स्मृति रचणाऱ्या ऋषीच्या शिरावर असते. तसें त्याचें फल देण्यास तो बांधला गेला असून, तेवढ्याकरतां, निर्वाणगतीस न जातां, स्वतः अखंड तपश्चर्या करीत असतो, अशी त्यासंबंधीं दृढश्रद्धा आहे. त्यावरून वैदिकधर्मीयांच्या दृष्टीनें स्मृतिकाराचा अधिकार केवढा मोठा आहे, हें लक्षांत येईल. चालू परिस्थितींत कायद्याच्या, ह्मणजे, केवळ राजतंत्राच्या दृष्टीनें उत्पन्न होणाऱ्या स्मृतीच्या, प्रायश्चित्त, दायविभाग, इत्यादि भागांच्या मनुष्यकृत व्यवहारांसंबंधीं कांहींच ह्मणावयाचें नाहीं; कारण तो मार्ग मोकळा असल्यामुळें, त्याचा अवलंब आतां होऊं लागलाच आहे. तसेंच

केवळ एकांगी दृष्टीनेंच जर या नवीन स्मृतीची ओरड असली तर त्यासंबंधीं विशेष विचार करण्याचें कारण नाहीं. कारण जोंपर्यंत ' अन्यधर्मी भूपाळ आर्यभूचा। आर्यधर्मा अनुकूल नसायाचा ' तोंपर्यंत तसें चालावयाचेंच, व धर्मावरील अनेक संकटांप्रमाणें तेंही एक संकट कांहीं काळ मुकाट्यानें सोसलें पाहिजे. परंतु, स्मृतीच्या या वास्तविक स्वरूपाकडे लक्ष न देतां, ती केवळ एक सोईस पडेल तशी ठराव करण्याची बाब आहे, असें समजून लोकांच्या आचारधर्माचा प्रश्न जेव्हां नव्या स्मृतीच्या द्वारें सोडविण्याचा भाव त्यांतून निघतो, तेव्हां Hands off ! (दूर व्हा !) असें स्पष्ट ह्मणावें लागतें. हिंदु माणसाच्या आचाराला social side आणि religious side अशीं दोन अंगेंच नसतात. एथून तेथून त्याचें सारें जीवन ह्मणजे धर्मच आहे. एवढ्याकरतां, धर्माच्या वर सांगितलेल्या अंगप्रत्यंगांवर जर तुमचा विश्वास नसेल, नवी स्मृति निर्माण करण्यास तर कोणीच लायक नाहीं, पण प्रचलित निरनिराळ्या स्मृतींचा समन्वय करून नवीन स्मृति निर्माण करण्याच्या दृष्टीनें देखील जर वरील दृष्टींनीं उपयोगांत आणल्या जाणाऱ्या ग्रंथाची सप्रमाणता व ग्रंथ लावण्याची पद्धति आधीं ठरविलेली नसेल, व केवळ ऐतिहासिक, सामाजिक, आर्थिक अथवा ' वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः ' अशी वृत्ति धरून, वैदिकधर्माच्या मूलभूत तत्वांचा आधीं समन्वय न करितां व त्यावरून पुढें आचारधर्माची निष्पत्ति न करतां, आपल्या स्वतःच्या दर्पदूषित बुद्धीनें हा प्रश्न सोडवूं पहात असाल, तर तुह्मी व्यावहारिक दृष्टया कितीही मोठे असलां तरी, वस्तुतः वैदिकधर्मी नसल्यामुळें हें कार्य करण्यास केवळ नालायक आहां. मित्रत्वाच्या ढोंगाखालीं वैदिकधर्माचा पूर्ण विध्वंस करण्याचें श्रेय घेणारे, उघड शत्रूपेक्षांही अतिशय भयंकर असे गुप्त शत्रु आहां.

एवढ्याकरितां, शास्त्रसमन्वय होऊन नव्या स्मृतीची त्यांतल्या त्यांत सोय व्हावी, आणि ही ' तात्पर्यस्मृति ' सर्व लोकांच्या उपयोगी पडावी, अशी इच्छा असल्यास, संहत प्रयत्नाच्या दृष्टीनें एक सूचना करावीशी वाटते. अशा स्मृतीचा प्रश्न हातीं घेण्यापूर्वी, स्वतंत्र विचाराचे ह्मणून जे जे कांहीं धार्मिकपक्ष आहेत, ( अर्थात् वैदिक धर्माच्या कक्षेंतील ) त्या सर्वांच्या प्रतिनिधींची मिळून एक गोल परिषद भरवावी, व त्यांत यथाशास्त्र चर्चा करून, वैदिकधर्माच्या मूलतत्वांचा निर्णय करावा. असा निर्णय करण्यापूर्वी हा निर्णय कोणत्या पद्धतीनें करावयाचा, त्याच्याकरितां कोणतीं प्रमाणें, किती प्रमाणांत उपयोगांत आणावयाचीं व कशारीतीनें आणा-

वयाचीं व कशा रीतीनें आणावयाचीं, इत्यादि सर्व प्रश्नांचा आधीं निकाल ठरवून मगच, या मूलभूत तत्वांचा व प्राप्त परिस्थितींत त्या मूलभूत तत्वांस धरून कोणते आचारधर्म सरळपणानें निष्पन्न होतात, त्याचा निर्णय करावा. असें कार्य बौद्धधर्मास वारंवार करावें लागलें आहे, ख्रिस्त्यांची ' **निसा कौंसिला** ' सारखीं कौन्सिलें प्रसिद्ध आहेत, व आपणाकडेही असें झालें असावें, असें मानण्यास जागा आहे. * तेव्हां या राजमार्गाचा अवलंब करण्याचें टाकून केवळ वर्तमानपत्री वादविवादांनीं काय लाभ व्हावयाचा आहे ? वर्तमानपत्रांत लिहावयाचें, हा एकप्रकारचा धंदा आहे, तशीच ती एक प्रकारची कलाही आहे. मनुष्य शक्तिमान् असला म्हणजे, त्याला जसे कुस्तीचे डावपेच साधतातच असें नाहीं, त्याचप्रमाणें, मनुष्य केवळ सुविद्य असला म्हणजे त्याला ही कला साधतेच असें नाहीं. बरें, साधून अथवा न साधूनही एक शस्त्र म्हणून तिचा अवलंब करावयाचें म्हटलें तरी आवांतर कारणांनीं त्याला तसें करतां येतेंच असें नाहीं. कोणत्याही प्रकारचें लेखनचातुर्य अंगीं नसतां, केवळ आपलें 'आतुर बोलणें' कोणीकडून तरी लोकांच्या कानावर घालावें, या केवळ कर्तव्य बुद्धीनें हातीं घेतलेलें प्रस्तुत लेखनाचें काम केल्याचें समाधान देखील, समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें 'असा पुरुष पहावा;' असा हेवा लोकांच्या मनांत उत्पन्न करणाऱ्या लेखनकुशल अशा राजेश्री नरुभाऊंच्या निरपेक्ष साह्याशिवाय '**अप्रबुद्धा**'स केव्हांही लाभलें नसतें, हेंच त्याचें प्रत्यक्ष उदाहरण आहे. शिवाय त्याव्यापक आणि गुंतागुंतीच्या अनेक प्रश्नांवर लिहावें तरी किती ? प्रत्यक्ष बोलण्यांत, वेळेस जें काम चार शब्दांनीं होऊन जातें, तें चार पानें खर्चूनही तितक्या निःसंदेह-

---

* अगदी सोंवळ्या मानल्या गेलेल्या कुराणाचे बाबतींतही असें थोडें फार झालें आहे. महमदसाहेबानंतर ५-१० वर्षांतच 'कुराणा'च्या अस्सल स्वरूपाविषयीं व वादग्रस्त बाबतींत त्याचा अर्थ कसा लावावा याविषयीं वाद पडला. तेव्हां उस्मानचे कारकिर्दीत त्याचें संशोधन याच दृष्टीनें करण्यांत आलें. म्हणजे पैगंबराच्या सहवासांतील मंडळी व त्याच्या जवळील प्रती यांवरून महमदाच्या प्रत्येक बाबतींतील धोरणावरून कुराणाचें स्वरूप व पाठ निश्चत करण्यांत आला, व सर्व संशयित व्यवहार व आचार यांचे बाबतींत ज्या ' आबादी ' व ' सुन्नाह ' म्हणतात त्यांच्या धोरणानें रचना केली गेली. ' आबादी ' म्हणजे पैगंबराचीं वचनें, व ' सुन्नाह ' म्हणजे त्यांचीं कृत्यें.

पणें होत नाहीं. ह्मणून, वर्तमानपत्रांतील लेखांनीं केवळ एकमेकांस दूषण न देतां, व ' पोथीजात ' वगैरे निंदास्पद शब्दांनीं एकमेकांचीं अंतःकरणें न दुखवितां, केवळ सत्यसंशोधनाच्या दृष्टीनेंच,, अशा प्रकारच्या परिषदेचें कार्य हातीं घेतल्यास त्या पासून कांहींतरी इष्टापत्तीच होईल असें आह्मांस खास वाटतें. निदान सहकार्याची व विचारविनिमयाची अशा प्रकारची प्रेमळ संधी आल्यावर तिचा फायदा न घेतां, जे आपल्याच ऐटींत एकीकडे बसून राहतील, त्यांची या कार्यासंबंधानें अनास्था अथवा नालायखी उघड होऊन, इतर पक्षांच्या लोकांस तरी आपला मार्ग मोकळा होईल.

या ग्रंथाच्या लेखनाचें काम हातीं घेतल्यापासून असा एक सहज योग घडला कीं, त्यांतील कित्येक विषयांची चर्चा वर्तमानपत्रांत त्याच वेळां घडून आली. बॅ० सावरकरांचे केसरींतील जातिभेदावरील लेख, हें एक त्याचें उदाहरण आहे. या विषयावर लिहिण्याची कल्पना आह्मां दोघां अगदीं विरुद्ध पक्षीयांच्या डोक्यांत जवळजवळ अगदीं एकदमच आली, व त्यांना प्रारंभही जवळजवळ एकाच काळीं झाला, हा एक विचित्र योगायोग आहे. त्यांच्या लेखांतील सर्व मुद्यांचा आमच्या दृष्टीनें स्वतंत्र विचार करावयास पाहिजे होता, परंतु या ग्रंथाची रूपरेषा पूर्वीच ठरवून ठेविली असल्यामुळें तसें न करतां, केवळ आपाततः त्यांच्या महत्वाच्या अशा एकदोन मुद्यांचाच आह्मीं उल्लेख केला आहे; व आमच्या लिहिण्याच्या पद्धतीस अनुसरून सडेतोडपणानें जसें वाटलें तसें लिहिलें आहे, तें अर्थातच विषयप्रतिपादनार्थ आहे. एरवीं बॅ० साहेबांच्या कळकळीसंबंधीं आणि व्यक्तित्वासंबंधीं आमच्या मनांत कांहींच नाहीं. असो.

याप्रमाणें प्रस्तुत विषयावर कांहीं लिहिलें पाहिजे अशी गरज वाटून, लेखकाची सोय झाल्यामुळें वरील चार शब्द यथामति लिहिले गेले. कर्तृत्व तितकें सर्व परमात्म्याचेंच आहे. परंतु त्यांतल्या त्यांत पुनः पुन्हा अवतार घेऊन धर्मसंस्थापना करणें, परिस्थितीनें विस्कटलेली धर्माची घडी नीट बसवून देणें, ' पापाचा अचल फोडून' 'पुण्याची पहांट करणें,' व 'विश्वस्वसुखानें कोंदवून' 'सात्विकांचीं दोंदें वाढविणें' हें तर त्याच्या निरतिशय आवडीचे विषय आहेत. तशा प्रकारचा प्रसंग आला असतां, आर्तजनाच्या हांकेपुढेंही धांव घेणारा तो परमात्मा या वेळींही आपलें काम करण्यास कसा विसरेल? त्याचें कार्य तो स्वतः व त्याचे भक्त यांचेद्वारें योग्य वेळीं करीलच. अशा प्रकारचें कार्य करण्याचा मान त्यानें एकवेळ महा-

राष्ट्रास दिला आहे. श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें नारायणानें हृदयस्थ होऊन एकवेळ त्याला प्रेरणा केली आहे, तशीच कृपा यावेळीं देखील त्यानें महाराष्ट्रावर करावी म्हणून त्याची करुणा भाकून, व त्या मोठ्या कार्याचा आरंभ करण्याचें काम मजसारख्या यःकश्चित् माणसाकडून करवून घेण्याच्या कृपेबद्दल त्याचे धन्यवाद गाऊन, त्याच्या आशीर्वादानें पुन्हा बांधवांच्या सेवेस सादर होण्याचें अभिवचन देऊन तात्पुरती विश्रांति घेतों.



# परिशिष्ट. १

तिसऱ्या प्रकरणांत चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तिसंबंधानें विचार करीत असतां असें ह्मटलें आहे कीं—' अशा रीतीनें वेदाची मंत्रमयता व तिचा उपयोग करून घेण्याकरितां शरीराची विशेष पात्रता, या दोन गोष्टी पक्क्या लक्षांत ठेवून गीतेंतील ' गुणकर्मविभागशः ' याचा अर्थ लाविला पाहिजे, ह्मणजेच ' सृष्ट ' पदार्शी त्याचा समाधानकारक मेळ बसेल, ' गुण ' आणि ' कर्म ' या दोन वेगवेगळ्या संज्ञा मुद्दाम उपयोगांत आणण्याची सार्थकता त्या खेरीज होत नाहीं, आणि 'सृष्ट' या सार्थ पदार्शी त्याची सांगड नीट बसत नाहीं.' ( पान ६५. ) इतकें ह्मणूनया प्रश्नाच्या विचाराची एक नवीनच दिशा दाखवून, विस्तारभयास्तव हा प्रश्न तितकाच सोडून दिला आहे. परंतु त्या नवीन दिशेचें थोडें जास्त स्पष्टीकरण खेल्याकेरीज विषय तितकाच सोडून देणें योग्य होणार नाहीं, असें वाटल्यावरून त्याविषयीं थोडी माहिती, या परिशिष्टाच्या रूपानें पुस्तकास जोडण्याचें ठरविलें आहे.

**वर्ण** हा शब्द धात्वर्थानें पाहिलें असतां, सरळपणानें, कोणत्याही रीतीनें जाति या अर्थाचा बोध करूं शकत नाहीं. असें असतांना, त्याचा उपयोग जाति या अर्थानें करण्यांत येऊं लागला, त्याअर्थी त्याला कांहीं इतिहास आहे. जाति या अर्थानें **वर्ण** शब्दाचा उपयोग **ऋग्वेदांत** देखील केलेला आढळतो, हें आपण मागें पाहिलेंच आहे. केवळ निरनिराळ्या वर्णाचे लोक एका ठिकाणीं येऊन त्यांचा वर्णावरून निर्देश करीत असतां ' **वर्ण** ' शब्द जातिबोधक होऊन बसला असणें शक्य आहे. मराठी वाङ्मयांत तुर्क लोकांच्या रंगावरून त्यांना ' ताम्र ' अशीच संज्ञा देण्यांत येत असे. अशा तऱ्हेच्या संज्ञा जास्त उपयोगांत येऊन, ' **वर्ण** ' शब्दास ' जात ' असा अर्थ मिळणें, हें अस्वाभाविक नाहीं. त्यामुळें चातुर्वर्ण्या-संबंधीं एक ऐतिहासिक उत्पत्ति मानण्यांत येते, परंतु इतर दृष्टीनें विचार करतां, तिने मोठेसें समाधान होत नाहीं, हें आपण मागें पाहिलेंच आहे. उपलब्ध असलेला सात हजार वर्षांचा मानवजातीचा इतिहास पाहिला तर, अशा प्रकारच्या वर्णभेदाला रोटीबेटीबंदपणाचें स्वरूप आल्याचा दाखला मिळत नाहीं. किंवा, त्या वर्णभेदास धार्मिक महत्व आल्याचा देखील दाखला नाहीं. या व दुसऱ्या अशाच

तऱ्हेच्या कारणांमुळें, केवळ वंशभिन्नत्वामुळें जातित्व आलें असेल, असें वाटत नाहीं.

अर्वाचीन कल्पनेप्रमाणें पाहतां **ऋग्वेदाचा** रचनाकाळ, आणि या भिन्न भिन्न वंशीयांचा सहनिवास हे जवळजवळ एककालीन आहेत. **ऋग्वेदांत** चारी वर्णांचा स्पष्ट उल्लेख आढळतो, हेंही आपण पाहिलें आहे, व वर्ण शब्दाचा 'मनुष्यजात' या अर्थानें निश्चित उपयोग, निदान तीन ठिकाणीं केलेला आहे, हेंही लक्षांत घेतलें आहे. ' उभौ वर्णौ ऋषिरुग्रः पुपोष ' यांत तर **अगस्तीची** स्त्री **लोपामुद्रा** ही **विदर्भराजकन्या** होती, या ऐतिहासिक प्रवादाचें मूळ आहे कीं काय, अशीही शंका येते. **ऋग्वेदाच्या** रचनेच्या स्थलकालाकडे अर्वाचीन दृष्टीनें पाहिलें तर, तो ध्रुवबिंदूपासून तों थेट गंगासागरापर्यंत आणि अनंत कालापासून तों इ० सनापूर्वी सुमारें ४५०० वर्षांहून कमी नाहीं, एवढी त्यांची व्याप्ती दिसून येते. एवढ्या मोठ्या काळामध्यें लौकिक व्यवहाराच्या अनेक घडामोडी झाल्या असतील, व अनेक लोकांशीं गांठी पडल्या असतील. **ऋग्वेदामध्यें** ५-५० प्रकारच्या लोकांचा तरी निदान उल्लेख सांपडतो. असें असतांना **वर्ण** शब्दास 'कोणतीही जाति' असा सामान्य अर्थ न येतां, चातुर्वर्ण्यविशिष्टच जात असा संकुचित अर्थ कां यावा, आणि ते वर्ण देखील जर केवळ ऐतिहासिक दृष्टीनें झाले असतील, तर श्रमविभागाच्या तत्वावर उत्पन्न होणाऱ्या साहजिक समाजभेदाप्रमाणें, नेमके चारच कां असावे, असा मोठा प्रश्न पडतो.

बरें, श्रमविभागाच्या तत्वावर ही वाटणी झाली, असें ह्मणावें तर **'वर्ण'** शब्द ज्ञाति या अर्थानें उपयोगांत येण्याचें कारण काय हें समजत नाहीं. या सर्व गोष्टी विचारांत घेऊन चातुर्वर्ण्याची रचना व संज्ञा निर्माण करण्यांत आली, असें ह्मणावें तर, अशा पद्धतीनें कोणत्याही गोष्टीची उपपत्ति केव्हांही चट्कन् बसवितां येईल ! **वर्ण** शब्दास मूळचा जाति हा अर्थ नसतां, इतर कोणत्याही कारणांनीं निर्माण झालेल्या सामाजिक घटनेस तो तसा कां यावा, एवढाच प्रश्न आहे, व त्याला धरूनच **चातुर्वर्ण्याचें** कोडें उकलण्याचा आपण प्रयत्न करूं.

मागील विषय प्रतिपादनांत **भगवद्गीतेच्या** सोळाव्या अध्यायांतील आसुर व शास्त्र या शब्दांवरून गीतेंत कित्येक शब्द विशेष अर्थानें वापरले आहेत, हें आपण पाहिलें आहे. ' चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ' या श्लोकार्धांत **वर्ण, सृष्ट, गुण,** आणि **कर्म** हे शब्द अतिशय महत्वाचे असून त्यांचे विशेष अर्थ

निश्चित केल्याखेरीज श्लोकाचा खरा अर्थ लागत नाहीं, परंतु ते निश्चित केल्या-बरोबर, चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीचा सारा इतिहास त्यांत सांपडतो. आपण पूर्वी पाहिलेंच आहे कीं, या श्लोकांत अतिशय जोरदार पद जर कोणतें असेल, तर तें 'सृष्ट' हें आहे. सृजनकर्माचें देखील गौण अर्थ घेतां येणार नाहींत असें नाहीं. परंतु ज्या ठिकाणीं हा श्लोक आला आहे, व ज्या परिस्थितींत तो आला आहे, त्या ठिकाणीं व त्या परिस्थितींत, कोणताही गौण अर्थ येऊं शकत नाहीं. कारण या श्लोकाचा उद्गार करणारा श्रीकृष्ण सृष्टीचे उत्पत्ति, स्थिति लय करणाऱ्या राजराजेश्वरी भावनेवर आरूढ होऊन ' मया ततमिदं सर्वं ' त्याचप्रमाणें कल्पक्षयांत प्रकृतिलीन झालेलें हें विश्व ' कल्पादौ विसृजाम्यहम् ' असें म्हणत आहे. आणि ज्या विषयाच्या ओघांत हा श्लोक आला आहे, तो देखील असा आहे कीं, तेथें त्यांचें अनंतकोटी ब्रह्मांडनायकत्वच प्रकट झालें आहे. कारण त्या श्लोकांत 'मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ' असें परमश्रेष्ठ प्रभुत्व दाखविलें असून दशेंद्रियविशिष्ट अशा मनुष्य-लोकाची आणि इतर अतींद्रिय लोकांची तुलना करून मनुष्यलोकांविषयीं एक मोठा सिद्धांत सांगितला आहे.

त्याचप्रमाणें हें सर्व सांगत असतां जी कालकल्पन त्यांच्या डोळ्यापुढें आहे, तीही ' परं जन्म विवस्वतः' अशी अनंत आहे. म्हणजे या ठिकाणीं सृष्टींतील भूत भविष्य आणि वर्तमान अशा कोणत्याही काळास लागूं पडेल, अशा तऱ्हेचें अबाधित तत्व सांगितलेलें आहे; व सर्व करून अकर्ता असणारा जो मी त्या मज अव्ययानें ही व्यवस्था केली आहे, असें, आपलें अकर्तृत्व लक्षांत आणून देतां देतां, खुंटा हालवून बळकट केल्यासारखें मुद्दाम सांगितलें आहे. ' चातुर्वर्ण्य ' या श्लोकावर टीका लिहितांना प्रत्येक टीकाकारांचे असें सहज लक्षांत येतें कीं हा श्लोकार्थ म्हणजे एक अगदीं स्वतंत्र विषय आहे. हा या ठिकाणीं यावाच कां? म्हणजे मागच्या एकंदर विवेचनाच्या ओघाशीं याचा काय संबंध आहे, तो संदर्भ कळल्या-खेरीज याचा अर्थ नीट लागत नाही, असें प्रत्येकाच्या लक्षामध्यें येतें. हा मागचा संबंध जर व्यवस्थितपणें जुळला नाहीं, तर पुढचा अर्थ बरोबर लागणार नाहीं हें उघड आहे. परंतु चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीचें मूळ शास्त्र ठाऊक असल्याखेरीज़, हा संबंधही नीट जुळवून दाखवितां येत नाहीं. ही अडचण विशेषतः अर्वाचीन टीका-कारांसच भासते. कारण पूर्वीच्या काळीं चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीविषयीं कोणाच्या मनांत कांहीं शंकाच नव्हती, त्यामुळें त्या प्रश्नाचा विचार करण्याचें टीकाकारांना

महत्वच वाटलें नाहीं. एखाद्या नित्यव्यवहारांतील शब्दाची ज्याप्रमाणें टीकेमध्यें त्याच्या समानार्थक शब्द देऊन ' इति स्पष्टम् ' अशी वाट लावण्यांत येते, त्याचप्रमाणें जवळजवळ, या श्लोकावरील सर्व टीका आहेत. आचार्यांनीं मागील श्लोकावरून हा श्लोक तेथें येण्याचें कारण काय आहे, हें सांगून खुद्द या श्लोकावरील टीकेंत त्याविषयीं खरी महत्वाची शंका उपस्थित केली आहे.

'संभवामि युगेयुगे' असें म्हटल्यानंतर, अशा त्या नुसत्या दिव्यजन्मकर्मांचें रहस्य कळलें असतां, देखील मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटून सायुज्यपदाला जातो, असा त्याचा परिणाम ओघानेंच सांगितला गेला. कारण, परमात्म्याच्या दिव्यजन्मकर्मांचें पुरें ज्ञान झालें म्हणजे मोक्षप्राप्तीच्या कोणत्याही मार्गानें जें व्हावयाचें म्हणजे, राग, द्वेष, भय-इत्यादि विकार नाहिंसे होऊन ( त्या दिव्यत्वाचाच ध्यास लागल्यामुळें ) चित्तशुद्ध झाल्यामुळें, त्याचप्रमाणें परमात्म्याच्या विभूतिमत्वाच्या चिंतनामुळें, स्वतःच्या व्यक्तित्वाचा विसर पडून, अनन्य शरणागति झाल्यामुळें, आणि आपणही त्या परमात्म्याचे अवयव आहों, व वस्तुतः आपल्याद्वारें तोच क्रीडा करीत आहे, अशा यथार्थ बोधानें घडलेल्या निष्काम कर्मामुळें, संचित आणि क्रियमान हे जळून जाऊन प्रारब्ध हें पावन झाल्यामुळें तो सहजिकच परमात्मभावाला जातो. ही गोष्ट **लो० टिळकांनींही** आपल्या गीतेवरील टीकेंत मान्य केली आहे. याच्यापुढें, परमात्म्याला हें पुन्हा पुन्हा अवतार घेण्याचें व्यसन कसें लागलें, ती पोटांतली गोष्ट त्यानें सांगितली. **' ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् '** हा त्याच्या स्वभावांतला जणु काय दोष असल्यामुळें त्याला ही जन्मकर्मांची खटखट करावी लागते.

तत्वदृष्ट्या, निर्गुण परमात्मा हें जरी अंतिम ध्येय ठरलें, तरी मनुष्याचा स्वभावधर्मच असा आहे कीं त्याला, परमात्म्याला प्रत्यक्ष सगुण स्वरूपांत पाहण्याची, इतर विषयाप्रमाणें मनबुद्धींद्रियांच्या द्वारें, त्याचें प्रत्यक्ष सुख अनुभवण्याची, अखंड तळमळ लागलेली असते. जिज्ञासेमुळें म्हणा, त्रिविध तापानें पोळून गेल्यामुळें म्हणा, दशेंद्रियांच्या पिंजऱ्यांत त्याचा झालेला कोंडमारा आणि मनाचा होणारा तीव्र जाच, यांच्यामुळें म्हणा, अथवा कोणीतरी प्रेमळ माऊलीप्रमाणें आपणांस थापटून, अनेक प्रकारें आपलें कोडकौतुक करावें, अशा अर्थार्थितेनें म्हणा, मनुष्याच्या अंतःकरणाला अखंड, एका तऱ्हेनें ईश्वर स्वरूपाचाच ध्यास लागलेला असतो. आणि म्हणूनच **' मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः '** असें

ह्मटलें आहे, व त्याला धरूनच ‘ ये यथा मां प्रपद्यंते ’ हें महारहस्यही सांगितलें. याच्यावर अशी शंका येते कीं, अशी जर गोष्ट आहे, तर हा परमात्म्याच्या जन्मकर्मांचा प्रसंग कोटिपुण्य फलोदयासारखा सृष्टिचक्रांत कधींमधींच कां येतो ? नित्य कां नसतो ? त्याचप्रमाणें प्रत्यक्ष सगुण स्वरूपांत प्रत्येकास त्याचा अनुभव कां येऊं नये ? त्याचें कारण असें सांगतात कीं, आपण परमात्म्याचे अवयव असून, सारें कर्म त्याचें आहे, आपला फक्त ‘ कर्मण्येवाधिकार ’ आहे, त्याच्या फलाची एकंदर वाट, व त्यापासून मिळणारा सुखदुःख भोग याचा तो वाटेल तसा विनियोग करण्याचा अधिकारी आहे, हीं गोष्ट जीवास कळत नाहीं. आपण जें कर्म करतों त्याचें फळ ह्मणजे अर्थातच कर्मप्रेरक वासनेची पूर्तता, आपल्याच द्वारें झाली पाहिजे, व ती ‘ इस हात दे इस हात ले ’ अशी तावडतोब झाली पाहिजे, असा, त्याचा आग्रह असतो ह्मणून परमेश्वराच्या द्वारें, परमेश्वराच्या सोईनें, आपल्या वासना पुरवून घेण्याइतकें थांबण्याचें धैर्य त्याच्या अंगांत नसतें ह्मणून तो त्याच्या अंशभूत ज्या अनंतशक्ति विश्वामध्यें आहेत, त्यांचीच मनधरणी करण्यांत गुंतलेला असतो. त्यामुळें त्यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या परमात्म्याच्या मानानें किती झालें तरी क्षुद्र अशा कर्मफलामुळें, त्याच्या अंतःकरणाची भगभग खरी कधींच शांत होत नाहीं. अशा तऱ्हेनें वणवण करीत असल्यामुळें व सर्व जीवांची सामान्यतः हीच तऱ्हा असल्यामुळें कित्येक वेळां मनुष्यसमाजाची ही उन्नतिनौका खुंटून पडते, अथवा तिला पुढचा मार्ग कळेनासा होतो. वेळेस ती उलथून पडते कीं काय, असाही प्रसंग येतो. अशा वेळीं तिचें रक्षण करून तिला पुन्हा सुस्थितीवर आणण्याचें कार्य क्षुद्र देवतांच्यानें काय व्हावयाचें आहे ? ह्मणून तें करण्याकरतां, आणि कर्मभोगाच्या या व्यापारांत वणवण करीत असतां, जीव “ परमात्म्याच्या कृपेनें तरी ही भगभग एकदांची शांत होवो, ” अशी जी हृदयांतल्या हृदयांत अखंड प्रार्थना करीत असतो, तिच्यामुळें अखेरीस कळवळून जन्मकर्मांच्या या लचांडांत त्याला पडावें लागतें.

याच्याही पोटांत एक बारीक शंका निघते. ती अशी कीं, मनुष्याचें कर्म या सृष्टींत वस्तुतः किती परतंत्र आहे, त्याची फलप्राप्ति किती प्रकारांनीं बाधित आहे, याचा त्याला प्रत्यक्ष अनुभव असतां, तो असें कसें करतो ? त्या परमात्म्यास अनन्य शरण होऊन, त्याच्याद्वारें त्याच्या सोईनें आपली वासना पूर्ण करून घेण्याइतका थांबत कां नाहीं ? त्याचें कारण सांगत असतांनाच हा

चातुर्वर्ण्याचा प्रश्न उत्पन्न झाला. मनुष्याच्या गुणकर्मांचें रहस्य जाणून, कशा रीतीनें कर्म केलें असतां, त्याला आपल्या वासना अबाधितपणें पूर्ण करून घेतां येतील, अथवा इच्छा असल्यास त्या सहज पूर्ण होऊन, एकदम परमात्म्याची प्राप्ति करून घेतां येईल, याचें जें सृष्टिनियमांस अनुसरून असलेलें शास्त्र, तेंच याचें कारण होय.

वाक्शक्ति सर्वोच्याच ठिकाणीं स्वयंभू असल्यामुळें जाणून अथवा न जाणूनही कर्मसिद्धी झाल्याचा प्रत्यय येतो, परंतु त्या शास्त्राप्रमाणें प्रत्येक जीवाचा अनुभव एकच येणें शक्य नसल्यामुळें, जीवास तावडतोब वासना पुरवून घेण्याचा अनिवार मोह उत्पन्न होतो, आणि अनुभवभिन्नतेमुळें एक निश्चयपंथ त्याला लागला नाहीं, तरी तो अनंत काळ निराश होत नाहीं. अलिकडच्या विज्ञान-शास्त्राप्रमाणें सृष्टीच्या अनेक गूढ रहस्यांचा जरी उलगडा झाला असला, तरी वस्तुतः शास्त्रज्ञ नवें असें कांहींच करीत नसतो. जे धर्म सृष्टिबरोबरच उत्पन्न झालेले असतात, त्यांचें फक्त ज्ञान करून देतो. तसेंच हें शास्त्रही केवळ नैसर्गिक असल्यामुळें, सृष्टीबरोबरच तें उत्पन्न झालें आहे, व सृष्टीबरोबरच त्याचा अंत होणार म्हणूनच क्वचित् कांहीं जीव सोडले तर, इतर सर्व जीवांचें गाडें, सृष्टि आहे, तोंपर्यंत असेंच चालावयाचें; मनुष्यकृत व्यवस्था असती तर कालांतरानें ती व्यवस्था बदलून दुसरी होण्याचा जो रस्ता त्यामध्यें असतो, तसा यांत नसल्यामुळें, हें सर्व चक्र असेंच फिरत रहावयाचें, असा याच्या अखंडत्वाचा बोध 'सृष्ट' पदार्थानें करून एकंदर विषयाचा समारोप केला आहे. म्हणूनच 'इतकें जरी मी करतों तरी मीं अकर्ता व अव्यय आहे,' हें पुढील सांगणें तर्कशुद्ध झालें. नाहीं तर, मागें दुसरा विषय चालला असतांना 'वसंतसेनेला मारली' असें सांगून, 'पण मी नाहीं हो' असें म्हणणाऱ्या शकराप्रमाणें देवाला मध्येंच स्वतःच्या अकर्तेपणाची एवढी आवर्जून आठवण देण्याचें कारण काय तें समजत नाहीं. परंतु हा अकर्तेपणा तर्काच्या ओघानेंच आलेला आहे, हें पाहिलें म्हणजे पुढील या अकर्तेपणाची खुबी लक्षांत ठेवून मुमुक्षूनें कर्म करावें, या उपदेशाची साखळी बरोबर जुळते.

अशा सर्व क्रमानें हा विषय जर लावला नाहीं, तर हा श्लोक मध्येंच उपटसुंभच आल्यासारखा दिसतो, आणि त्याचा '**तस्य कर्तारमपि मां विध्यकर्तारमव्ययम्**' याच्याशीं अगदीं तर्कशुद्ध असा संबंधही जुळत नाहीं. कारण, परमेश्वर नाहीं कशाचा कर्ता? म्हणून तो फक्त चातुर्वर्ण्यापुरतेंच आपलें

करून अकर्तेपण एवढें विशेषेंकरून सांगतो? ज्या गुणकर्म विभागाला धरून चातुर्वर्ण्य त्यानें केलें, त्यांचाही कर्ता तोच आहे. तेव्हां चातुर्वर्ण्यापुरतीच ही ऐट मिरविण्याचें त्याला काय कारण? अशी शंका शिल्लक राहते. परंतु आम्हीं वर पाहिल्याप्रमाणें, चातुर्वर्ण्य ही अखंड अबाधित राहणारी सृष्ट व्यवस्था आहे, मनुष्याच्या कळवळ्यानें मी कांहीं एकादी मुद्दाम रचून दिली आहे असें नाहीं ह्मणून तिचें ज्ञान करून देणारा फक्त मी या दृष्टीनें मी तिचा कर्ता, एरवीं अकर्ता आहे, ह्मणून त्या व्यवस्थेत कधीं खंड न पडतां, इतर सृष्टिधर्मांप्रमाणें सृष्टीबरोबरच ती नित्य राहणार, ह्मणून मनुष्य स्वभाव आहे असाच राहून माझ्या स्वभावधर्माप्रमाणें, माझ्या दिव्य जन्मकर्माचें खटलें हें असेंच राहणार, तेव्हां कोण्याही भक्ताला ' हें फक्त पूर्वकालीन भक्तांचेंच भाग्य होतें कीं काय, ' अशा शंकेनें निराश होण्याचें कारण नाहीं, अशी या विषयाची तर्कदृष्ट्या एकंदर पूर्तता आहे.

यानंतरच या विषयांतील मुख्य उरलेली शंका येते. शंकराचार्यांनीं या पांच चार श्लोकांच्या परस्पर संबंधाचें महत्व लक्षांत घेऊन, त्यांची सांखळी जुळविण्याच्या दृष्टीनें तिचा उल्लेखही केला आहे, परंतु आजचें महत्व या विषयाला त्याकाळीं यत्किंचितही नसल्यामुळें, किंवा काय कारणानें असेल कोण जाणें, उपस्थित केलेल्या शंकांचा पुढें विचार न करतां त्यांनीं एकदम ' राईट अबौट टर्न ' करून ' तस्यकर्तारमपि माम् ' या वाक्याकडे भाष्याचा ओघ वळविला आहे. बाराव्या श्लोकांत ' मानुषे लोके वर्णाश्रमादिकर्माणि इति विशेषः । तेषां वर्णाश्रमाद्यधिकारिकर्मणां फलसिद्धिः क्षिप्रं भवति ' असें सांगून तेराव्यांत ' तच्चेदं चातुवर्ण्यं नान्येषु लोकेषु अतो मानुषे लोक इति विशेषम् ' याप्रमाणें, ही चातुर्वर्ण्यव्यवस्था मानुषाशिवाय इतर लोकांत नाहीं, मनुष्यलोकांत आहे, हेंच त्यांच्या क्षिप्रफल सिद्धीचें कारण आहे, असें पुन्हा स्पष्ट केलें आहे. त्याबरोबरच वर्णाश्रमप्रविभाग असलेले मनुष्य ' कस्मात् पुनःकारणात् नियमेन तवएव वर्त्मानुवर्तंते नान्यस्य ' आणि ' मानुष एव लोके वर्णाश्रमादिकर्माधिकारः नान्येषु इति नियमः किं निमित्तः ' अशा या विषयाला धरून असलेल्या आह्मीं वर सांगितल्याप्रमाणें शंका उपस्थित केल्या आहेत.

वैदिकधर्माच्या आणि त्याप्रमाणेंच चातुर्वर्ण्याच्या संबंधीं सर्व प्रकारच्या परंपरांचा उगम अतींद्रिय शास्त्रांमध्यें आहे, या विषयीं अज्ञान असल्यामुळें त्यांनीं असें केलें असेल, असें ह्मणणें त्यांच्या बाबतींत शक्य नाहीं. अर्वाचीन टीकाकारांची

मात्र या बाबतींत मोठीच त्रेधा झाली आहे. ह्या विषयाचा असा संबंध लक्षांत न आल्यामुळें ' चातुर्वर्ण्य ' हा श्लोक उपटपुंभासारखा मध्येंच कसा आला, अशी शंका कोणासही येणें अपरिहार्य आहे, असें लक्षांत येऊनही तिचें समाधान करण्याची दिशा न कळल्यामुळें लो० **टिळकांना** ' धर्मसंस्थापना करण्यास परमेश्वर अवतार घेतो, असें पूर्वी सांगितलें, आतां धर्मसंस्थापना करण्याला काय करावें लागतें, तें थोडक्यांत सांगतात. ' एवढ्या वाक्यावरूनच जिज्ञासूस पुढें न्यावें लागलें आहे. तें किती हास्यास्पद आहे, हें खऱ्या अभ्यासकाच्या निर्दुष्ट दृष्टीस तेव्हांच दिसून येईल. एक तर असें कीं आठव्या श्लोकांतच तो विषय संपून पुढील २-४ श्लोकांत निरनिराळे २-३ महत्वाचे विषय सांगून मध्येंच, गडकऱ्यांच्या नाटकांतील एकाद्या विसरभोळ्या पात्राप्रमाणें–' हं, पण तें तर सांगावयाचें राहिलेंच! ' असें चुकीची दुरुस्ती केल्याप्रमाणें एकादें तुटकें वाक्य बोलून आपल्या अकर्तेपणाचें वर्णन पुन्हा चालू ठेवणें, हें गीतेप्रमाणें अतिशय तर्कशुद्ध ग्रंथांत, किंवा भगवंताच्या तोंडांत कसेंसेंच दिसतें. तसें असतें तर हा श्लोकार्ध आठव्या श्लोकानंतरच पाहिजे होता, म्हणजे पुढील, करून अकर्तेपणा व ' न मां कर्माणि लिंपंति ' वगैरे वर्णन ' जन्मकर्म च मे दिव्यं ' या शद्बांना अधिक पोषक झालें असतें.

दुसरें असें कीं ' धर्मसंस्थापना करण्याकरितां अवतार घेतों ' असें म्हणून, त्या कल्पनेचा विस्तार करण्याकरतां जर बोलावयाचें असतें, तर तो विषयच इतका जिव्हाळ्याचा आहे कीं, इतक्या त्रोटक रीतीनें बोलणें शक्य नव्हतें. तिसरें असें कीं, ज्या प्रतिपादनाच्या ओघात हा चरण आला आहे, त्याच्या मागील ५-६ व पुढील श्लोकांत सार्वकालिक सिद्धांत द्योतित करणारा, मराठींतील रीतिवर्तमान काळीं क्रियापदांचा सर्वत्र उपयोग केला आहे. ' मीं अवतार घेतों ' ' सर्व लोक मलाच भजतात ' ' मनुष्य लोकांत क्षिप्रफलसिद्धि होते, ' ' मी अकर्ता अव्यय आहे, ' ' मला कर्माचा लेप नाहीं ' ' हें ज्यांनीं ओळखलें ते कर्माच्या जाळ्यांतून मोकळे होतात '–इत्यादि सारे सिद्धांत अबाधित सृष्टितत्वें म्हणून सांगितलेले आहेत. त्यांत मध्येंच ' सृष्टं ' या भूतकृदंताचा उपयोग, जर वरील सर्व सिद्धांताप्रमाणें रीतिवर्तमान काळाचा अर्थ असता तर, चुकीचा ठरत नाहीं काय? इतिहासाच्या अनुभवाकडे पाहिलें तर येथें रीतिवर्तमान द्योतक प्रयोगच चूक ठरला असतां. भूतार्थच बरोबर आहे. कारण रीतिवर्तमान म्हणावयाचा म्हणजे धर्मसंस्थापनेकरतां

अवतार घेणारा परमात्मा प्रत्येक वेळेला चातुर्वर्ण्य उत्पन्न करतो, असें ह्मणावें लागेल, आणि तसा तर अनुभव नाहीं. खुद्द ' चातुर्वर्ण्यं मया सृष्टं ' असें ह्मणणाऱ्या **श्रीकृष्णांनींच** चातुर्वर्ण्याची स्थापना केली, असें कोणतेंही पुराण सांगत नाहीं. **मर्यादा पुरुषोत्तम दशरथींनीं** चातुर्वर्ण्याचा उद्धार केला. असें रामायण ह्मणत नाहीं. अशीं शेंकडों उदाहरणें दाखवितां येतील.अशा स्थितींत ' चातुर्वर्ण्य ' या श्लोकाची लोकमान्यांनीं लावलेली संगति जमत तर नाहींच, पण तिनें उलट मागचे २।३ श्लोक विषयांतरासारखें आणि विस्कळीत वाटतात.

असें होण्याचें कारण हेंच कीं, केवळ जडदृष्टीमुळें वैदिक शास्त्रांचीं मूलतत्वें वैदिकधर्मातील अतींद्रियशास्त्रांच्या साह्याखेरीज उलगडणें शक्य नाहीं, हें **लोकमान्यांस** पटलें नव्हतें; अथवा टीकेच्या सहेतुकपणामुळें त्यांना तें मुद्दाम नजरेआड करावें लागलें. या गोष्टीच्या अज्ञानामुळेंच **म० गांधींनाहीं** " 'अग्निर्ज्योतिरहःशुक्ल ' आणि ' धूमोरात्रिस्तथा कृष्णः ' अशा प्रकारच्या जगताच्या शाश्वत अशा शुक्ल कृष्ण गति व ' तत्रचांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ' हें काय गौडबंगाल आहे, तें मला समजत नाहीं, " असें आपल्या गीतेच्या भाषांतरांत स्पष्ट ह्मणावें लागलें आहे. **शंकराचार्यांस** हें अर्थातच माहीत होतें. परंतु त्या काळीं चातुर्वर्ण्याच्या दैवी उत्पत्तीबद्दल वैदिकधर्मी ह्मणविणारा कोणीही साशंक नसल्यमुळेंच बहुधा त्यांनीं विस्तार न करतां आपल्या शंका तितक्यावरच सोडून दिल्या.

सारांश, या श्लोकांत इतर लोकांत न आढळणाऱ्या मनुष्यलोकांतील विशेष अशा संस्थेचें वर्णन केलें आहे. जर चातुर्वर्ण्य ही केवळ आनुवंशिक तत्वावर, किंवा, केवळ समाजशास्त्रास धरून, अथवा आज समजलें जातें त्याअर्थानें गुणकर्मास धरून उत्पन्न झालेली संस्था असती तर, त्यांत असें अलौकिक काय आहे, कीं त्यामुळें ती इतर अपार्थित लोकांत देखील आढळून येत नाहीं ? व अशा सामाजिक घटनेंत असें काय असणार, कीं ज्याच्यामुळें मनुष्यास मोक्षरूपी महाकर्मफलाची अथवा क्षुद्रकर्माच्या फलाची प्राप्ती इतर लोकांतील प्राण्यांपेक्षा क्षिप्र अगदीं होऊं शकते ? केवळ अनुवंशिकतेच्या तत्वावर तिचें मंडण या लोकांत देखील होऊं शकत नाहीं, हें **बॅ० सावरकरांनीं** नुकतेंच दाखविलें आहे. ज्ञान आणि सामर्थ्य यांनीं मनुष्यापेक्षां श्रेष्ठ असलेल्या इतर लोकांतील प्राण्यांना मनुष्यांनीं शोधून काढलेला हा अर्धबोबडा नियम केव्हांही कळणें शक्य नाहीं, असें

समजतां येईल काय ? समाजशास्त्रास धरून ही आहे म्हटलें, तर असें दिसून येतें कीं सुस्थितींत असलेल्या कोणत्याही समाजामध्यें चातुर्वर्ण्यांतील रोटीबेटीबंद-पणाचा प्रश्न टाकून दिल्यास अशा प्रकारचे चार वर्ग आपोआपच उत्पन्न होत असतात. रोटीबेटीबंद चातुर्वर्ण्य वैदिक लोकांत होतें किंवा नाहीं, हें जरी आज सांगतां येत नाहीं, तरी वेदांत चारीवर्णांचे स्पष्ट उल्लेख आढळतात, हें आपण ग्रंथांत पाहिलेंच आहे. तेव्हां ते चार वर्ग त्यावेळीं होते, असें म्हणतां येईल. रोमन लोकांत अशा प्रकारची व्यवस्था होती, व उपलब्ध असलेल्या इतिहासावरून असें दाखवितां येतें कीं, त्यांत उल्लेखिलेल्या सर्व राष्ट्रांत त्यांच्या त्यांच्या भरभराटीच्या काळीं समाजाचें वर्गीकरण अशा रीतीनें सहजच झालें होतें. जी गोष्ट मनुष्य-लोकांत सहज घडूं शकते, तीच मनुष्येतर दिव्य लोकांत मात्र, केव्हांही घडूं शकत नाहीं, असें मानणें युक्तिसिद्ध आहे काय ? बरें, हल्लीं समजण्यांत येतें त्या अर्थानें, केवळ गुणकर्मास धरूनच चातुर्वर्ण्याची रचना असती तरीही तें तसें इतर लोकांत कां आढळूं नये, हा प्रश्न सुटत नाहीं. एक तर ' कांयाला बिसमिल्ला ' म्हणतात त्याप्रमाणें मानवजातीस साहजिक असलेल्या अशा गोष्टी करण्याकरतां युगायुगाचा हिशेब आणि दिव्यजन्मकर्माचें अवडंबर यांचें काय कारण होतें ? एखाद्या सामान्य माणसाला प्रेरणा करूनही देवाला हें कार्य करतां येत नाहीं काय ? व दुसरें असें कीं ' पितासि लोकस्य चराचरस्य ' असें म्हणवून घेणारा श्रीकृष्ण एवढ्याशा क्षुल्लक गोष्टीवरून, ' अजोऽपि सन्नव्ययात्मा ' असा मी करुणेनें मुद्दाम उत्पन्न होतों, अशी ऐट मिरवितांना दिसला कीं त्याच्याविषयीं क्षुद्रभाव उत्पन्न होतो. खर्ड्याच्या एवढ्या विजयानेंही संतुष्ट न होणारा **सवाई माधवराव** असल्या फुकट फौज-दारांपेक्षां जास्त शाहणा समजला पाहिजे. गुणकर्माच्या व्यवस्थेप्रमाणें, चातुर्वर्ण्य व्यवस्था म्हणजे काय हेंच आधीं लक्षांत येत नाहीं. ज्याच्या त्याच्या सहजगुणां-प्रमाणें ज्याला त्याला कर्म करण्यास अवसर मिळावा, एवढाच याचा अर्थ असला तर, आम्हीं वर सांगितलेंच आहे कीं, सुस्थितींतल्या कोणत्याही समाजांत तसें सहज घडतच असतें. त्याला श्रीकृष्ण कशाला पाहिजे ? व मनुष्यलोकच कशाला पाहिजे ? ज्याचे गुण जसे आहेत, तसेंच; त्याचें आचरण आहे किंवा नाहीं, हें पाहून, त्याचा सामाजिक दर्जा ठरविण्यापुरतेंच त्याचें प्रयोजन आहे, असें म्हटलें तरी देखील, तें खुळ्यासारखेंच दिसतें. कारण, जोंपर्यंत अर्थ ही जगांत प्रबळ कर्म-शक्ति आहे, तोंपर्यंत आर्थिक भेद कोणी कांहीं केल्या मोडूं शकत नाहीं. परंतु

असें गृहीत धरलें कीं, हें सारें मोडून, मनुष्याचे गुण, आणि त्यांना धरून त्याचें कर्म, जसें असेल, त्याप्रमाणें त्याचा सामाजिक दर्जा ठरविला जावा, व त्या दर्जाला योग्य असा मानसन्मान व इतर लाभही त्याला मिळावा, अशी कांहीं व्यवस्था केली, तरी त्यामध्यें असें काय आहे, कीं ज्याकरितां त्याला एवढी थोरवी प्राप्त व्हावी ? सारांश, मागच्यापुढच्या संदर्भानें हा श्लोक लावूं गेलें असतां, चातुर्वर्ण्य-संस्था ही वर सांगितलेल्या अनेकप्रकारच्या, केवळ जडशास्त्रांना धरून उत्पन्न झालेली आहे, असेंही ह्मटल्यानें समाधान होत नाहीं. उलट मनुष्येतर दिव्य लोकांत देखील दुर्मिळ अशा कांहीं फार गूढ व मनुष्यकृतीच्या पलिकडे असलेल्या तत्वांना धरून ती झाली आहे, असेंच मनांत जास्त बिंबतें. आणि ह्मणून ‘ सृष्टं ’ या पदाचा जोरदारपणा जास्त उमटून पडून ‘ गुणकर्मविभागशः ’ यांत वाटतो त्यापेक्षां कांहीं जास्त अर्थ आहे, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.

खुद्द ‘ गुणकर्मविभागशः ’ या पदाचा विचार करूं लागलें, तरी देखील असेंच वाटतें. या ग्रंथांत आह्मीं थोडक्यांत सांगितलेंच आहे कीं, प्रचलित अर्थानें हे शद्ब पुनरुक्त आणि निरर्थक भासतात. चौदाव्या अध्यायाप्रमाणें पाहिलें तर, ‘ गुण ’ या प्रकृतिरूपशक्तीच्या काम करण्याच्या तीन तऱ्हा आहेत. अठराव्या अध्यायांत भगवतांनींच ह्मटलें आहे कीं, ‘ शक्तीच्या अस्तित्वाचे हे तीन प्रकार ज्याच्यांत नाहींत, असा जगांत एकही पदार्थ आढळणार नाहीं’:—

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः ॥

ह्मणजे निर्माण झालेल्या प्रत्येक जीवाकडून—मग तो कोणत्याही खाणीचा असो—जें कर्म घडतें, त्यास प्रेरणा या तीन गुणांकडून मिळतेः जसे गुण असतील, तशाच प्रकारचें कर्म घडावयाचें. ‘ नान्यं गुणेभ्यः कर्तारं ’ असें देवानेंच ह्मटलें आहे; ह्मणजे, गुण आणि कर्म यांचा एक प्रकारचा कार्यकारणसंबंध आहे. हा कार्यकारण संबंध बीजवृक्ष न्यायानें जरी नसला, तरी देखील तो इतका निकट आहे कीं, कारणाला सोडून भिन्नस्वभावाचें कार्य होऊंच शकत नाहीं, हा नियम त्याच्याबाबतींतही लागू पडतो. ह्मणजे, एकाद्या जीवांत ज्या गुणाचें प्रमाण अधिक असेल, त्या प्रकारचीच त्याच्या क्रियेची प्रेरकशक्ति असेल. अर्थात, तिचा क्रियारूप परिपाकही, त्या गुणाच्या जातीला धरूनच होईल, दुसरा होणें शक्य नाहीं. जड सृष्टींतील या गुणांच्या कार्याच्या वर्गीकरणावरून त्यांना सर्ग, स्थिति, आणि लय,

अशीं नांवें देतां येतील. अर्वाचीन शास्त्राच्या भाषेंत त्याला Anaboly, metaboly and cataboly असें ह्मणतात. **भगवंतांनीं** पुढें त्यांनाच प्रवृत्ति, प्रकाश आणि मोह, असें ह्मटलें आहे, व हे गुण शरीरांत कायकाय करतात, जीवास कसले कसले अनुभव देतात, व त्यामुळें जीवाची कशी गति होते, हें सविस्तर वर्णिले आहे. त्याचा विचार आपण पुढें करूं. तूर्त एवढेंच पहावयाचें आहे कीं, गुण आणि कर्म यांचा एकप्रकारें अभेद आहे. मनुष्याची प्रकृति तमोमय आहे, अशा वेळेला त्याला विरुद्ध प्रकारचें कर्म कसें करतां येईल? याच्या उलट केवळ सत्वप्रधान मनुष्याला प्रमाद करावा अशी बुद्धि कधींच होणार नाहीं. असा जर सर्व जगाचा सर्वसाधारण नियम असला, तर ती एक नैसर्गिक गोष्ट असल्यामुळें, गुणाप्रमाणें कर्म हातून घडविण्याकरतां प्रयत्न करावा लागत नसून, गुणाप्रमाणें कर्म घडूं नये, असें होण्यास मात्र प्रयत्न करणें भाग आहे. आतां या ठिकाणीं गुण ह्मणजे बरावाईट स्वभावविशेष, असा अर्थ घेतला, तर मोठीच अनवस्था होते· कारण, मग त्याच्या विभागाची जी व्यवस्था करावी लागेल, तिचें स्वरूप केवळ निषेधदर्शक असेल. कारण चांगल्या स्वभावाप्रमाणें कर्म करूं नको, असें कोणीच णार नाहीं. वाईट स्वभाव असेल तर, त्याच्या मात्र उलट क्रिया करण्याच यत्न करावा लागेल. परंतु चातुर्वर्ण्यात प्रत्येक वर्णाचें जें कर्म सागितलें आहे, तें अर्थातच असें केवळ निषेधात्मक नाहीं. बरें, गुण ह्मणजे त्रिगुणच घेतले, तर, त्यांत प्रेरकशक्ति असल्यामुळें त्यांचा विभाग तो काय पाडावयाचा? रज आणि तम गुणांच्या माणसांनीं केवळ सात्विक बनून उच्च स्थितीला जावें अशा प्रकारचें कर्म असाच त्या विभागाचा अर्थ घेतला, तर सर्व लोकांत त्रिगुणांचें अस्तित्व असल्यामुळें, तशा प्रकारची व्यवस्था सर्व लोकांतच असली पाहिजे. ह्मणजे, एका तऱ्हेनें गुण आणि कर्म हे शद्ब पुनरुक्त वाटतात, व त्यांचा विभाग, या शद्बाचा अर्थ कळत नाहीं. नुसतें ' गुणविभागाप्रमाणें मी चातुर्वर्ण्य केलें, अथवा कर्मविभागाप्रमाणें केलें आहे, ' असें ह्मटलें असतें, तरी तोच अर्थ आला असता. मग, ' गुण आणि कर्म यांच्या परस्पर विभागावरून ' असें ह्मणण्याचें कारण काय?

या ठिकाणीं अशी शंका घेण्याचें कांहींच कारण नाहीं कीं मनुष्याचें कर्म आणि गुण ह्मणजे अर्थात् स्वभाव यांची जर अशी सांखळी असेल, तर मनुष्याच्या स्वतंत्र कर्तृत्वाला वाव कोठें उरला ? स्वभाव किंवा गुण यांना सोडून कर्म होतच नाहीं ह्मटलें, ह्मणजे मनुष्याची उन्नतीच खुंटली, मग शास्त्र

तरी कशाला पाहिजे, आणि चातुर्वर्ण्याची तरी काय किंमत ? अशी शंका येऊं नये ह्मणूनच गुणकर्मांचा संबंध बीजवृक्षन्यायाचा नाहीं, असें आम्हीं म्हणून ठेवलें आहे. परंतु त्याच्या स्वतंत्र कर्तृत्वाचा प्रश्नच येथें संभवत नाहीं. कारण या गुणकर्मांच्या बाबतींत, त्या दृष्टीनें केवळ निषेधात्मक शास्त्रच असणें जास्त शक्य आहे, हें आपण वर पाहिलेंच. कारण गुणाप्रमाणें कर्म उत्पन्न होणारच, ' तसें कर ' म्हणून सांगण्याची गरजच नाहीं, फक्त, चांगले गुण असल्यास ते सोडूं नको, व वाईट असल्यास त्यांप्रमाणें करूं नको, असेंच जोरानें सांगण्याची गरज आहे. परंतु शास्त्रांत निषेधापेक्षांही विधीचेंच जास्त वर्णन आहे. तेव्हां त्या दृष्टीनें गुण आणि कर्म यांचा भेद होऊं शकेल, म्हणून त्याला उद्देशूनच ' गुण आणि कर्म विभाग ' असें मुद्दाम म्हटलें, असें म्हणतां येणार नाहीं. कारण एक तर चातुर्वर्ण्याच्या रचनेकडे पाहिलें म्हणजे, त्याच्या उत्पत्तीविषयीं कोणाचें कांहींही मत असो, तिच्यांत केवळ, असल्या नीतिशिक्षणाच्या सोईपलीकडे जास्त कांहीं अर्थ नाहीं, असें कोणासही वाटणें शक्य नाहीं.

याप्रमाणें पुढच्या श्लोकाच्या अनुपूर्वीनें विचार केला असतां, असें दिसतें कीं आजपर्यंतच्या सर्व जुन्या नव्या टीकाकारांनीं या अतीशय महत्वाच्या श्लोकाकडे अगदींच दुर्लक्ष केलें आहे. पूर्वी या श्लोकास एवढें महत्व येण्याचें कारणच नव्हतें, आणि हल्लीं केवळ जडदृष्टीमुळें त्याचें खरें महत्व लक्षांत येत नाहीं. एकूण काय, कीं कोणत्याही टीकाकारानें याचा इतका सांगोपांग विचार केला नाहीं. परंतु उपस्थित केलेल्या एक दोन शंकांवरून मागच्या श्लोकाशीं याचा केवढा संबंध आहे, एवढें दाखवून देऊन, **शंकराचार्यांनींच** त्याच्या जास्त विचाराची वाट मोकळी करून ठेविली आहे.

आपण वर पाहिलें आहे कीं कोणीकडूनही विचार केला तरी, असें वाटल्याखेरीज राहत नाहीं, कीं पूर्वी पाहिल्याप्रमाणें सामाजिक, आर्थिक, अनुवंशिक, ऐतिहासिक इत्यादि कोणत्याही लौकिक कारणांपलीकडे, या वर्णव्यवस्थेंत कांहींतरी जास्त मोठें तत्व आहे. त्याचप्रमाणें तें तत्व त्रिकालाबाधित असलें पाहिजे. म्हणूनच 'सृष्टं' या पदाला फिरकोळ समजतां येत नाहीं. अर्वाचीन संशोधक वरील सर्व शास्त्रांच्या साह्यानें चातुर्वर्ण्याचा उलगडा करावयास बसले असतां, त्याच्या नैसर्गिकतेविषयीं, त्यांची खरोखर प्रामाणिकपणानें खात्री होत नाहीं, यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं. त्याचप्रमाणें त्यांना उत्तर देण्याची व अनेक

युक्तिवादांनीं त्यांची समजूत घालण्याची जी खटपट वर्णाभिमानी करतो, तीं देखील समाधानकारक होत नाहीं, हेंही ठीकच आहे. कारण चातुर्वर्ण्याच्या रचने-मध्यें वरील कांहीं शास्त्रांचीं तत्वें जरी विचारांत घेतलेलीं आहेत, अथवा अनु-षंगानें तीं सहज तिच्यांत आलीं आहेत, तरी तेंच कांहीं तिचें मूळ नव्हे. या ग्रंथांत आम्हीं म्हटलें आहे की, होम केल्यानें हवा शुद्ध होत असेल, किंवा यज्ञ केल्यानें वसाहती वाढत असतील, तर तें त्याचें अनायासें झालेले, अथवा जास्त कल्पकतेनें त्यांच्यांत मुद्दाम समाविष्ट केलेले, आनुषंगिक परिणाम होत. तेवढ्या-करितांच त्या संस्था निर्माण झाल्या असें धरून बसणें, हा बुद्धीचा दुरभिमान नसला तरी निदान कोतेपणा आहे. या सर्व प्रकारांनीं या श्लोकाचा अर्थ नीट लागत नाहीं, याचें कारण हेंच आहे कीं, त्यांच्याहून अगदीं भिन्न अशा एका वेगळ्या शास्त्राच्या तत्वास धरून चातुर्वर्ण्याची उत्पत्ति झालेली आहे. तेव्हां तो हातचा जमेस धरल्याखेरीज हा हिशेब जुळेल कसा ? श्रीअण्णासाहेब यांच्या चरित्रांत चातुर्वर्ण्याचा उलगडा करण्याचे हे सारे प्रयत्न दोन पैशास चार आंबे, तर पांच पैशांस केळीं किती अशा लहान पोरांच्या हिशेबाप्रमाणें हास्यास्पद आहे, असें म्हटलें आहे, तें एवढ्याच करितां. हा हातचा जमेस धरल्याखेरीज हिशेब जुळत नाहीं, हें ठाम ठरल्यावर, आतां तो हातचा काय आहे, व तो जमेस धरला असतां, मागच्या पुढच्या श्लोकांशीं विसंगतता न येतां, अथवा श्लोक उपटसुंभ न वाटतां, त्याचा सरळ अर्थ लागून त्यामुळें चातुर्वर्ण्याविषयीं काय बोध होतो, त्यानें देखील चातुर्वर्ण्य हें उत्पत्तिसिद्धच असलें पाहिजे, हें निर्विवाद ठरतें किंवा नाहीं, त्याच्या रचनेंत मनुष्याचें कर्तृत्व किती आहे, आणि ईशसृष्टि किती आहे, याचा विचार करूं, म्हणजे या संस्थेस चातुर्वर्ण्य हें नांव कां मिळालें, त्या दृष्टीनें वर्ण चारच असणें कां अवश्य आहे, वर्ण शद्बाला ज्ञातिबोधकत्व कां आलें इत्यादि सारे प्रश्न चटचट सुटतील.

श्रीअण्णासाहेब यांच्या चरित्रांत व या ग्रंथांतही असें सांगितलें आहे कीं चातुर्वर्ण्याची उत्पत्ती ही अतींद्रिय शास्त्रास धरून झाली आहे. 'शद्ब' ही एक स्वतंत्र उत्पादक शक्ति आहे, व तिचा आणि मनुष्यशरीराचा ग्रामफोन-सारखा संबंध आहे. शद्बाच्या आघातानेंच प्लेट रेखांकित करून तिच्यांत विशेष प्रकारचें गाणें भरतां येतें; व त्या रेखांस आघात करून आकाशांत कंप उत्पन्न केले असतां तशा प्रकारचें गाणें पुन्हा उत्पन्न करतां येतें. शद्बाच्या या स्वतंत्र उत्पादक-

शक्तीचें शास्त्र, आणि मनुष्याचें, शरीररूपी, विशेष पदार्थांचें विशिष्ट तऱ्हेनें बनविलेलें यंत्र, यांचा मेळ घालून मूळ स्वयंभू अशा मंत्रशास्त्राची व त्यावरून पुढें वेदविद्येची उत्पत्ति झाली. हें कसें तें वरील दोन्ही ग्रंथांत सांगितलेंच आहे. त्यांत बजावून सांगितल्याप्रमाणें, इतर अतींद्रिय शाखांच्या पातंजल, अध्यात्म, भक्ति–इत्यादि ज्या शाखा आहेत, त्यांच्या द्वारें याची स्वतंत्र प्रतीती पाहिल्याखेरीज, या शास्त्रास मिथ्या म्हणणें, खऱ्या शास्त्रजिज्ञासेस धरून होणार नाहीं. अशा प्रकारें शोध करून ' चातुर्वर्ण्याच्या या उत्पत्तींत अर्थ नाहीं ' असें म्हणण्याची जबाबदारी ही या वर्णविरोधकांवरच आहे. हजारों वर्षें परंपरेनें जें शास्त्र दृढ झालें, ज्यांत **कपिल, याज्ञवल्क्य** यांच्यापासून तों नुकतें परवांपर्यंत **श्री तुकाराम महाराज, श्रीसमर्थ** असले प्रतापरुद्र उत्पन्न झाले, व वादांतला विषय म्हणून जरी आज प्रमाणांत घेतां येत नाहीं, तरी, आजही ती परंपरा तुटलेली नाहीं, त्या शास्त्राच्या पुराव्याची जबाबदारी त्याच्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांवर काय म्हणून पडावी ?

सारांश ध्वनि आणि यंत्र यांच्या शास्त्रांत वर्णव्यवस्थेचें मूळ आहे. आतां गीताश्लोकावरूनही हाच अर्थ निघतो कीं काय, तें आपण पाहूं. या परिशिष्टाच्या अगदीं प्रारंभींच आपण पाहिलें आहे कीं, यांत वर्ण, गुण–कर्म–विभाग आणि सृष्ट हीं पदें फार महत्वाचीं आहेत. त्यांतील गुणकर्मविभागासंबंधीं काय शंका येतात, तेंही आपण पाहिलें आहे. आतां त्या पदांचा अर्थ दुसऱ्या कशा रीतीनें लागणें शक्य आहे, तें पाहूं. गुणानुसार कर्म हें लक्षांत ठेवून जर मनुष्याच्या कर्माचें वर्गीकरण करूं लागलों, तर तें दोन प्रकारांनीं करतां येईल. एक तर त्या कर्माची जाति,–मग ती उत्पत्ति, परिणाम अथवा अवस्था कशावरही ठरविली असो– आणि दुसरें, त्या कर्माचें प्रमाण म्हणजे ज्याला इंग्रजीमध्यें ( Qualitative ) गुणतः व ( Quantitative ) परिमाणतः भेद म्हणतात तो. यांतील ( Qualitative ) गुणतः विभाग हा, तें कर्म ज्या गुणास धरून असेल त्यावरून, अथवा त्याचा परिणाम ज्या गुणास धरून होईल, अथवा त्याची स्वरूपस्थिति ज्या गुणास धरून असेल त्यांच्यावरून ठरतो. परंतु त्यांच्यावरून, तें कर्म केवढ्या प्रमाणाचें आहे, हें प्रमाण कांहीं ठरूं शकत नाहीं. प्रत्यक्षाच्या अनुभवावरून शास्त्र सिद्ध होतें; व शास्त्रप्रामाण्यानें पुन्हा अनुमान करतां येतें. त्याप्रमाणें प्रत्यक्षाच्या अनुभवांत कर्माचें प्रमाण हें दोन गोष्टींवरून लक्षांत येतें. एक तर,

ज्या यंत्राच्या द्वारें तें कर्म घडावयाचें तें, आणि त्या यंत्राच्या द्वारें त्या कर्माची सांगता करणारी कर्मशक्ति. यंत्र लहान असलें, किंवा मोठें असलें तरी त्या मानानें त्यांतून केवढ्या प्रमाणाचें कर्म निघेल तें ठरतें. परंतु केवळ तेवढ्यानेंच ठरत नाहीं. कर्त्याच्या क्रियाशक्तीचा मोठेधाकटेपणा हाही विचारांत घ्यावा लागतो. म्हणजे गुणाच्या योगानें ( Qualitative ) भेद, क्रियाशक्ति आणि कर्मसाधनाची शक्ति यांच्या संयुक्त विचारानें ( Quantity ) परिणामतो भेद, व ( Quantity ) गुण आणि ( Quality ) परिणाम यांच्या संयुक्त विचारानें व्यावहारिक परिणामाच्या दृष्टीनें त्या कर्माची–व्यवहारांत ज्याला आपण कर्म ह्मणून ह्मणतों, तो, खरोखर या तिहींचाही संघात असतो,–अनेक व्यवहार शास्त्रास धरून बरीवाईट जाति, व कार्याकार्यता अशी ही परंपरा आहे. व या दृष्टीनें मात्र गुणकर्माचा विशिष्ट कारण कार्यभाव अबाधित राहूनही त्यांचा विभागशः विचार करतां येतो. ह्मणून येथें कर्मशद्बाचा अर्थ ' कर्मसामर्थ्य ' असा केला पाहिजे. असें श्री. अण्णासाहेब यांच्या चरित्रांत नुसतें सूचित करून ठेवलें आहे. ( खं. २, २०४ ) ' कर्मसामर्थ्य ' आणि त्याचा पूर्ण विचार होण्यास आवश्यक अशा कर्मयंत्राची क्षमता व कर्मप्रेरक गुण, इतक्या सर्वगोष्टी लक्षांत घेऊन, त्यांच्या विभागाला अनुसरून ' गुणकर्मविभागशः ' असें ह्मटलें आहे. वह्मणूनच, त्या विभागाला ' वर्ण व्यवस्था ' ही संज्ञा मिळाली.

गुण हे एक प्रकारें केंद्रोत्सारिणी शक्तीसारखे आहेत. महत्तत्वाची ती विकासावस्था असल्यामुळें, ते विकास कार्य करतात, हें ठीकच आहे. उलट, मनुष्य जें कर्म करतो तें–' निस्त्रैगुण्यो भवार्जुन ' अशा ब्राह्मी स्थितीच्या अंतिम ध्येयास धरून असतें. तेल संपलेली ज्योति ज्याप्रमाणें विकास पावून त्या विकासांतच स्वतःचा ग्रास करून घेते, त्याप्रमाणें गुणांनीं विकसित केलेल्या कर्माची स्थिति आहे. ह्मणून व्यवहारांतील अगदीं क्षुल्लक गोष्टीपासून, तों या ब्राह्मीस्थितीच्या अंतिम ध्येयापर्यंत, मनुष्याच्या कर्माचें जर एखादें शास्त्र बनवावयाचें असेल, तर त्या व्यावहारिक कर्माचें नीट ज्ञान होण्याकरतां, त्याची गुणमयता, कर्त्याचें कर्मसामर्थ्य आणि ज्या यंत्राच्या द्वारें तें कर्म घडावयाचें तें यंत्ररूप साधन, या तिहींचा सर्व प्रकारें विचार करून त्याचें शास्त्र बनविलें पाहिजे. तसेंच तें वर्णव्यवस्थेसंबंधीं घडलेलें आहे. असें आह्मीं ह्मटलें आहे, ह्मणून असें वाटेल कीं असा ( Qualitative ) गुणतो भेद आणि ( Quantitative ) परिणामतो भेद

विभाग आहे, असें ह्मटलें ह्मणून काय झालें? त्यांत अतींद्रिय शास्त्राची गरज कोठें आली? मनुष्याचें कर्म कोणत्याही गुणाचें असलें तरी, कर्मसामर्थ्याप्रमाणें त्याच्या कर्माच्या प्रमाणामध्यें व उत्कृष्ट निकृष्टतेंत फरक पडतो, हें आह्मांसही कबूल आहे. तेवढ्याकरतां समाजांत माणसाची वर्गवार कांहीं व्यवस्था असावी, हें योग्य आहे, व तेवढ्याकरतां चातुर्वर्ण्यसंस्था निर्माण झाली असें आह्मी ह्मणतों, असें कोणीही ह्मणूं शकेल. तेव्हां या श्लोकांतील कर्म शद्ब, कोणत्या कर्मसामर्थ्याच्या अपेक्षेनें वापरला आहे, तें पाहिलें पाहिजे. कारण कर्मशद्बाची व्याप्ति फार मोठी आहे. एकद्रव्यमगुणं संयोगविभागेष्वनपेक्ष कारणं ' या वैशेषिकाच्या सशास्त्र व्याख्येपासून परापरप्रकृतीच्या घडामोडीपर्यंत सर्व कांहीं कर्मच आहे. तेव्हां या कर्म शद्बाचा अर्थ निश्चित केला पाहिजे. कांहींही झालें तरी आपण लौकिक कर्म ह्मणतों, त्या अर्थानें हा शद्ब वापरला आहे, हें बुद्धीस पटत नाहीं, हें आपण वर पाहिलेंच आहे. कारण मग, मानुषेतर लोकांतील कर्माहून त्याचें विशेषत्व कांहींच न राहिल्यामुळें, चातुर्वर्ण्य हा मनुष्यलोकाचा विशेष आहे, या ह्मणण्यांत अर्थ राहत नाहीं.

याच्यावर कोणी असें म्हणेल कीं, 'मग १८ व्या अध्यायांत चातुर्वर्ण्याचीं कर्में सांगितलीं आहेत, तीं कशाकरतां?' तर हें म्हणणें बरोबर नाहीं. तेथें जीं कर्में सांगितलीं आहेत, तीं ' स्वभावज ' कर्में होत. कारण—' कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैः गुणैः' । असा तेथें सामान्य नियमच सांगितला आहे. त्या म्हणण्यांत कांहीं विशेष अर्थ आहे. प्रकृतिज गुण म्हणजे सत्व, रज, तम यांच्या मिथुनीभावाप्रमाणें मनुष्याच्या स्वभावाची सामान्य जाति ठरली जाते, एवढेंच. तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं—' इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौव्यवस्थितौ. ' ही रागद्वेषाची व्यवस्थिति, आणि त्रिगुणांचा मिथुनीभाव, अथवा १३ व्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें ' इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः'—इत्यादि त्या रागद्वेषाचा प्रकार आणि त्रिगुणांचा मिथुनीभाव, म्हणजे स्वभाव. ब्राम्हण, क्षत्रिय वश्य इत्यादींचें त्यांच्या त्यांच्या स्वभावाला धरून सहज कर्म कसें असतें, हें या अध्यायांत सांगितलें आहे. त्यांत चातुर्वर्णाचें वैदिकधर्मविहितकर्म काय, हें सांगितलेलें नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगती आहे. जेवढें या श्लोकांत कर्म सांगितलें आहे, तेवढेंच त्यांचे वैदिकधर्मोक्तकर्म, आणि त्या करतांच चातुर्वर्ण्य, अशी जर वस्तुस्थिति असती, तर वेदांस, षोडश संस्कार, वेदाध्ययन, इत्यादि सांगण्याची कांहींच गरज नव्हती. परंतु ज्याअर्थीं, उपनयनासारखा संस्कार व इतर अनेक धार्मिक विधि हे

प्रत्येक वर्णास यथायोग्य असे आवश्यक म्हणून सांगितलें आहेत, त्याअर्थी, येथें सांगितलेल्या कर्मांनीं वैदिकधर्माची पूर्तता होत नाहीं, हें उघड आहे. कारण तसें नसून या गोष्टी म्हणजेच प्रत्येक वर्णाचा वेदोक्त विहिताचार, असें असतें तर, केवढी अनवस्था झाली असती, हें पहा.

स्वभावनियत कर्म हें सदोष असलें तरी टाकूं नयें, त्याचें आचरण ‘ परधर्मात् स्वनुष्ठितात् ’ देखील उत्तम आहे, असें सांगितलें आहे. आणि येथें तर ‘ आस्तिक्य ’ हें ब्रह्मकर्म सांगितलें आहे. मग काय बाकीच्या तीन वर्णांनीं नास्तिकच राहिलें पाहिजे, आस्तिक असणें ह्मणजे परधर्माचरण होईल, असें समजावयाचें कीं काय ? क्षत्रियांस उपनयन, वेदाध्ययन व इतरही धार्मिक विधि अवश्य सांगितले आहेत. परंतु या श्लोकाप्रमाणें पाहिलें तर त्यांची कांहींच गरज नाहीं; कारण ज्ञान व तप हीं ब्रह्मकर्में आहेत. अशीच गोष्ट इतर वर्णांच्या कर्मासंबंधींही ह्मणतां येईल. परंतु ज्याअर्थी, वैदिकसंस्कार हे तिन्ही वर्णांस अवश्य आहेत, त्याअर्थी, एकतर येथील चातुर्वर्ण्याच्या कर्मांचा उल्लेख केवळ एकांगी आहे, किंवा सांगितलेलें कर्म एवढेंच चातुर्वर्ण्याचें कर्म **श्रीकृष्णास** अभिप्रेत होतें, वेदविद्या वैदिकसंस्कार यांच्यावर त्याचा विश्वास नव्हता असें ह्मटलें पाहिजे. परंतु ‘ वेदानां सामवेदोऽस्मि, ’ अथवा ‘ त्रैविद्या मां सोमपाः पूतपापाः ॥ यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते । असें ह्मणणारा **भगवान्** चातुर्वर्ण्याच्या योजनेंत वेदाचें खूळ (!) मुळींच नाहीं, असें समजत होते, असें कसें ह्मणावें ? या ठिकाणीं हीही एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगती आहे कीं ब्राह्मण आणि इतर वर्ण यांच्यांतील मुख्य भेद जो अध्यापनाधिकार त्याचा तर या श्लोकांत कोठेंच मागमूस नाहीं. पौरोहित्यासंबंधानेंही तसेंच आहे. तेव्हां या श्लोकांतील कर्माचें वर्णन अपूर्ण असून विषयाच्या पुष्टीकरितां कांहीं विशेष दृष्टीनें तें मुद्दाम केलें आहे, असें ह्मणावें लागते.

स्वभावज कर्म सदोष असलें तरी टाकूं नये, असें ह्मटलें म्हणजे कोणालाही एक प्रकारची फूस दिल्यासारखीच होईल, व तिचा उपयोग अनैतिक व दुराचारी आचरण करण्याकडे करण्यांत येईल, असें वाटण्याचें कारण नाहीं. कारण येथें जो स्वभाव अभिप्रेत आहे, तो वाटेल त्याचा नसून सुव्यवस्थित अशा चातुर्वर्ण्यविशिष्ट अशा जीवांचाच आहे. आणि चातुर्वर्ण्यविशिष्ट जीव म्हटला म्हणजे, त्याची अनीतीकडे किंवा दुराचाराकडे स्वभावतः प्रवृत्ति होणें शक्य नाहीं,

असाच भगवंतांचा अभिप्राय आहे. कारण ९ व्या अध्यायामध्यें राजर्षि, ब्राम्हण, वैश्य, शूद्र यांचा उल्लेख करून शिवाय ‘ पापयोनयः ’ असा एक वेगळा वर्ग काढला आहे. हे अर्थातच चातुर्वर्ण्याबाहेरील होत. त्यांच्या स्वभावासंबंधीं भगवंत येथें बोलत नाहींत. याच्यावरही, “ मग ‘ अपिचेत् सुदुराचारो ’ असें कसें म्हटलें, ” असें कोणी म्हणेल. तर भक्तिमार्गाच्या दृष्टीनें तें सांगितलें असल्यामुळें आणि भक्तिमार्गाची आवश्यकता चातुर्वर्ण्याच्या दुरवस्थेंतच जास्त असल्यामुळें, त्या संकर कालांत ती गोष्ट शक्य आहे. त्याचप्रमाणें तें म्हणणेंही ‘ पापयोनयः ’ अशा सामान्य लोकांकरतांच आहे; असो.

आतां या संबंधाची एक शंका उरली. चातुर्वर्ण्याच्या कर्मांचें अठराव्या अध्यायांत विशेष दृष्टीनें मुद्दाम वर्णन केलें आहे, असें म्हटलें, तें कां ? या ठिकाणीं देखील, प्रकृतिज गुणांच्या वर्णनापुढें, एकदम चातुर्वर्ण्याचे स्वभावज गुण कसे आले, असें वाटतें, व विषय एकदम मध्येंच आल्यासारखा वाटतो; परंतु तसें नाहीं. त्याचप्रमाणें—‘ सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्,’ हाही, सिद्धांत, त्याचप्रमाणें ‘ स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ’ हेंही कानाला जरा चमत्कारिकच लागतें. परंतु प्रकृतिज आणि स्वभावज गुणांतील फरक लक्षांत ठेवला, आणि ग्रंथाचा शेवट येथें आला आहे, हें पाहिलें, म्हणजे अर्थ स्पष्ट होतो. हें सारेंच बोलणें चातुर्वर्ण्यविशिष्ट व्यक्तिबद्दल आहे, पापयोनी अशा लोकांबद्दल नाहीं, हें लक्षांत ठेवूनच यांतील ‘सदोष’ व ‘स्वभावनियत’ वगैरे शब्द समजले पाहिजेत. येथें जी ‘सदोषता’ म्हटली ती प्रकृतिज गुणांच्या दृष्टीनें होय. मनुष्याच्या स्वभावामध्यें राग, द्वेष, यांची व्यवस्था, त्याचप्रमाणें इच्छा, द्वेष, सुख, दुःख, चेतना, धृति इत्यादिकांचा संघात, ही व्यवस्था भाष्यांत म्हटल्याप्रमाणें ‘ जन्मान्तरकृतः धर्मादिसंस्कारः मरणकाले अभिव्यक्तः ’ अशा रीतीनें, प्रकृतीच्या नियमास अनुसरून आलेली असते. त्या सर्व शक्तींच्या द्वारें, प्रकृतीचें कांहीं कार्य व्हावयाचें असतें, म्हणून, त्या शक्ति आलेल्या असतात. तेव्हां आपल्या प्रकृतिगुणाप्रमाणें जरी तें कर्म सदोष दिसलें, किंवा तें करणें आपल्यास आवडत नसलें. तरी कर्तव्य म्हणून तें केलें पाहिजे; नाहींतर प्रकृतीच्या प्रवाहाच्या उलट आपला प्रयत्न झाल्यानें त्या गोष्टीमुळें अनर्थ होण्याचा संभव आहे.

विश्वामित्रानें आपत्तीच्या काळीं वाटेल तें करून जीव वांचवावा, व मग आणखी पुण्य करून, तें धुऊन काढावें, या तत्वाचा अवलंब करून, कुत्र्याच्या

मांसाची चोरी केली, तेव्हां त्या मांसाचा मालक जो व्याध त्यानें त्याला हेंच सांगितलें कीं, असा मार्ग पत्करणारा तूं खरा ब्राम्हण नसला पाहिजेस; कारण जीवाची एवढी प्रतिष्ठा ब्राम्हणास केव्हांही वाटणार नाहीं. वर्णव्यवस्थेच्या अत्युच्च काळीं, अति सुव्यवस्थेमुळें माणसांच्या स्वभावधर्मालाही इतकें स्थिरत्व आलें होतें; आणि त्यामुळें व्यावहारिक दृष्ट्या मनुष्याचे वर्ण ओळखण्याचें तें साधन झालें होतें. अर्जुनाच्या प्रकृतिधर्माप्रमाणें त्याच्या अंतःकरणांत अतिशय दया वसत होती, परंतु त्याचा स्वभाव जन्मांतर संस्काराप्रमाणें क्षत्रियाचा झाला होता. त्याच्या ठिकाणीं क्षात्राकर्मास अनुकूल अशी जी शक्ति विकसित झाली होती, त्याचप्रमाणें ईश्वरभाव, धृति, तेज, आणि विशेषतः ‘ युद्धेचाप्यपलायनम् ’ हें सर्व वाढलेलें होतें. अर्थात् या शक्तींचा उपयोग करण्याची वेळ आली असतां, ‘ तें सदोष आहे ’ असें त्याच्या सत्वप्रधान प्रकृतिगुणांमुळें त्याला जरी वाटलें, तरी त्या शक्ति वांया घालविण्याचा त्याला काय अधिकार होता ? आम्ही चौथ्या प्रकरणांत म्हटलें आहे कीं ‘ पहिल्या अध्यायांतील अर्जुनाच्या सर्व शंका अगदीं खऱ्या आहेत. त्या खोट्या आहेत, असें श्रीकृष्णांनीं कोठेंच म्हटलें नाहीं. पुढील सबंध भागांत, जणुं कांहीं अगदीं त्यांचा विसर पडल्यासारखें दाखविलें आहे. त्याचा उलगडा करण्याकरितां या ठिकाणीं स्वभावगुणांचा विस्तार केला आहे.

त्यांतील भावार्थ असा आहे कीं, सत्वप्रधान प्रकृति असल्यामुळें जरी तुला हें आवडत नाहीं, व जरी तूं म्हणतोस तें सोरें खरें आहे, तरी कांहीं म्हटलें तरी, हे दुष्परिणाम, कांहीं केलें तरी टळणें शक्य नाहीं. तेव्हां तुझ्या स्वभावाला अनुरूप असें कर्म करण्याचा प्रसंग उपस्थित झाला असतां त्या शक्तींचा उपयोग समाजास देणें, हेंच तुझें कार्य आहे. असें तूं जर न करशील तर तुझ्या ठिकाणचा हा दयाधर्म पाहून तुझ्या वर्णाविषयीं धर्मव्याधाप्रमाणेंच लोक म्हणूं लागतील, व दया जरी असली तरी ब्राम्हणाचा सारा स्वभाव तुझा नसल्यानें, क्षमा हा गुण तितक्या प्रमाणांत तुजजवळ नसल्यानें, अखेर तूं घोंटाळ्यांतच पडशील. जें कर्म अर्जुनाला सदोष वाटत होतें, तें तुझ्या प्रकृति आणि स्वभाव अशा दोन्ही गुणांस धरून नाहीं, प्रकृति गुणास विरुद्ध आहे, म्हणून तुला तें सदोष वाटतें तरी तें तूं टाकूं नकोस, कारण प्रकृति गुण हा मनुष्याच्या उन्नतीबरोबर शुद्ध होत जाणारा आहे, परंतु स्वभाव गुण हा प्रकृतीच्या योजनेस धरून तिचें कार्य करण्याकरतां आलेला आहे. म्हणून तुझ्या साऱ्या शंका खऱ्या असल्या तरी युद्ध करण्यांतच

तुझें जास्त हित आहे, असें सांगण्याकरतां हा विषय मुद्दाम शेवटीं आणला. म्हणूनच त्यांत चातुर्वर्णाच्या सर्व धर्मांचें वर्णन येण्याचें कारण नव्हतें. यांतील सदोष शद्ब, ' वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ' अशा प्रकारें सुप्रज्ञ झालेल्या चातुर्वर्ण्यविशिष्ट जीवाच्या सत्वरजतमादि प्रकृतिधर्माच्या अपेक्षेनें घ्यावयाचा. अशी प्रज्ञा प्रतिष्ठित होण्याकरितां आधीं जें कांहीं नीतीधर्माचें अनुष्ठान करावयाचें, त्या दृष्टीनें सदोष, असा घ्यावयाचा नाहीं.

सारांश कर्मसामर्थ्य या दृष्टीनें ह्मटलें तरी देखील लौकिक कर्माहून भिन्न अशा कांहींतरी दुसऱ्या कर्माच्या अभिप्रायानें येथील कर्म शद्ब वापरला आहे. तो काय आहे, हें आतां पाहूं. पण त्यांपूर्वी आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ज्याप्रमाणें १८ व्या अध्यांयांतील स्वभाव सांगतांना चातुर्वर्ण्यविशिष्ट लोकांनाच अनुसरून सांगितला आहे, त्याप्रमाणेंच १२ व्या श्लोकांतील ' मानुषे लोके , या शद्बांतील मनुष्यप्राणीही वर उल्लेखिलेले पापयोनी सोडून असलेलेच आहेत. ज्यांची शरीरें मनुष्यांची आहेत, परंतु आंत सर्व प्रकारचा पशुभावच भरलेला आहे, असे लोक माणसासारखे दिसले तरी, आंतील पशुभावामुळें ( Animal nature ) ते विशेष प्रकारचे पशुच होत, असें म्हटलें पाहिजे. अशा लोकांना उद्देशून वेदांत पशु असा शद्बच स्पष्टपणें वापरला आहे. तंत्रशास्त्रांत तर त्यांना पशुभावाचे असें स्पष्टच म्हटलें आहे. याच लोकांना गीतेंत पापयोनी असें ह्मटलें आहे. जसें चातुर्वर्ण्याखालील कोटी ह्मणून कर्माच्या क्षिप्रसिद्धिच्या विचारांत त्यांचा समावेश होऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें येथें मानुषेतर लोकांतील ज्या दिव्य योनी आहेत, व ज्यांच्या सापेक्षेनें क्षिप्र असा शद्ब येथें वापरला आहे, त्यांच्यांतही असाच एक भेद लक्षांत ठेवला पाहिजे. जशी इकडे मनुष्यकोटीहून पापयोनी ही खालची आहे, तशाच मनुष्येतर अनेक लोकांतील जीवांहून अधिकारसंपन्न अशा सिद्ध कोटी आहेत. त्यांना उद्देशूनही येथला उल्लेख नाहीं. कारण ते स्वतः पूर्ण असून, त्यांचे सामर्थ्य केवळ देवाप्रमाणेंच असल्यामुळें, आपल्या इच्छा कोणाच्याही साह्याशिवाय पूर्ण करून घेण्यास समर्थ असतात. एवढा भेद लक्षांत ठेवून मनुष्य व मनुष्येतर लोक यांच्या तुलनेच। विचार केला पाहिजे.

अत्यंत सूक्ष्मतर अशा परमाणूंच्या संयोगवियोगरूप क्रियेपासून मोठमोठ्या ब्रह्मांडाची घडामोड करणारी ही चैतन्य शक्ति देहधारी जीवांच्या ठिकाणीं चार प्रकारांनीं क्रिया करीत असते. तिचें वर्णन **श्रीअण्णासाहेब** यांच्या चरि-

त्रांत प्रथम खंडांत ९५ ते ९९ पानापर्यंत थोडक्यांत केलेलें आहे. त्यांपैकीं जिचा विनिमय जीवाला अनायासानें व जास्त स्वाधीनतेनें मनाजोगता करतां येईल, अशी शक्ति वाक् ही होय. आणि वाक् ही स्वतंत्र उत्पादक शक्ति आहे, हेंही त्याच ग्रंथाच्या चातुर्वर्ण्य प्रकरणांत दाखविलें आहे, आणि या ग्रंथांतही तें जास्त फोडून मांडलेलें आहे. तेव्हां त्याचा येथें विस्तार करण्याचें कांहीं कारण नाहीं. शक्तीचे जरी हे क्रियेच्या दृष्टीनें चार प्रकार असले तरी वस्तुतः शक्ति अशी एकच आहे. ह्मणून कोणत्याही एका रूपांत तिचा स्वाधीनतेनें उपयोग करण्याचें जमलें, ह्मणजे बाकीच्या प्रकारांत तिचा संयम होऊन इष्ट ती गोष्ट घडून येते. अगदीं मामुली व्यवहारांतील गोष्ट देखील या तत्वास सोडून घडत नाहींत.

चित्रकाराचें चित्त ज्यावेळीं चित्राच्या कल्पनेंत तन्मय होऊन जातें, त्या-वेळींच त्याचें चित्र अति उत्तम वठून लोकांत वेड लावते. इतर वेळेला काढलेलीं चित्रें शास्त्रदृष्टीनें कितीही उत्तम असलीं, तरी दुसऱ्यास तितकीं आकर्षित करूं शकत नाहींत. याचें कारण चित्र काढतांना झालेल्या चित्ताच्या सहज एकाग्रतेमुळें बुद्धि, प्राण आणि वाक यांचा सहज संयम होऊन, त्यांची शक्ति त्या चित्रांत ओतली गेलेली असते. एकादा मनुष्य अतिशय विचारपूर्ण, मुद्देसूद भाषण मोठ्या शिरा ताणून करतो, परंतु त्याचा श्रोत्यांच्या मनावर खरोखर कांहींच परिणाम न होतां, ते नुसते माना हालवून कोरडेच उठून जातात; आणि दुसरा एखादा साधे-पणानें नुसते दोन शद्बच सहज बोलून जातो, परंतु त्यानें वेड लागून मनुष्यांचीं आयुष्याचीं आयुष्यें बदलून जातात, याचें कारण तरी हेंच. त्याचा शद्ब प्राणशक्ति-युक्त असतो. या चार प्रकारच्या शक्ति कमीजास्त प्रमाणांत सर्व खाणींच्या जीवांत असतात. त्याप्रमाणें त्या मनुष्योत्तर लोकांतील जीवांतही आहेत; परंतु त्यांचें प्रमाण मात्र कमीजास्त असतें. यांतील शद्बशक्तीचें रहस्य ऋषींच्या परिश्रमानें मनुष्यास कळल्यामुळें मंत्रशास्त्राच्या द्वारें त्याला स्थळ काळाचा अडथळा दूर करून आपल्या कर्माचें फळ इच्छित काळांत मिळवितां येतें. या शद्बशक्तीचा उपयोग मनुष्योत्तर प्राण्यांना करून घेतां येत नसल्यामुळें त्यांच्यामध्यें तें एक वैगुण्य राहिलें आहे. शद्बशक्तीच्या रहस्यावरच मंत्र, वेद आणि चातुर्वर्ण्य यांची उत्पत्ति अवलंबून आहे. ह्मणून चातुर्वर्ण्य हा मनुष्यलोकांतला विशेष झाला.

आतां येथें अशी शंका येईल कीं, मनुष्योत्तर लोकांतील जीव हे सामर्थ्य ज्ञान व पवित्रता यांनीं मनुष्यापेक्षां श्रेष्ठ असतां, शद्बशक्तीचें रहस्य त्यांना कळणार

नाहीं, असें कसें होईल ? तें त्यांना कळत असलेंच पाहिजे. असें असूनही शब्द-शक्तीचा उपयोग त्यांना करून घेतां येत नाहीं, हें ह्मणणें कसें संभवतें ? या ठिकाणींच खरोखर मनुष्याच्या मनुष्यपणाचा खरा गौरव आहे. त्याच्या नरदेहाचें खरें अहोभाग्य आहे. शब्दशक्तीनें संकल्पाला प्रत्यक्ष स्थूल रूप देत असतां रसायन शास्त्रांतील Catalatical agent प्रमाणें मानवी शरीराची आवश्यकता आहे, हें आपण पाहिलेंच आहे. या स्थूल सृष्टींतील क्रिया शब्दशक्तीच्या साह्यानें चटकन् करून घ्यावयाची, ह्मणजे त्याला मनुष्यशरीरच पाहिजे. कारण मनुष्यशरीर हें इतर कोणत्याही शरीरापेक्षां परिपूर्ण आहे. God created man after his own image ही कांहीं नुसती कविकल्पना नाहीं. ह्मणून आपल्याकडे ‘ जें पिंडीं तें ब्रह्मांडीं ’ ह्मणतात. म्हहजे पिंड हे कितीही सूक्ष्म असले तरी केंद्र ज्याप्रमाणें अत्यंत सूक्ष्म असूनही त्यांत वर्तुळांतील सर्व रेषा असल्यामुळें वर्तुळपणानें परिपूर्ण आहे. त्याचप्रमाणें, ब्रम्हांडांतील सर्वशक्ति व रचना सूक्ष्म प्रमाणानें परंतु त्याच व्यवस्थित स्वरूपांत पिंडांत पूर्ण आहेत, असा योगादि अतींद्रिय शास्त्रांचा अनुभव आहे. म्हणूनच पिंड हें ब्रम्हांडाचा केंद्र होऊं शकतें. कारण वर्तुळांतील सर्व रेषा ज्यांत पूर्णपणें समाविष्ट होऊं शकतात तेंच केंद्र. मनुष्योत्तर इतर योनी ज्ञान व सामर्थ्य यांच्या बाबतींत मनुष्याहून केवढ्याही श्रेष्ठ असल्या तरी, तेथें सर्व गोष्टींचा समतोलपणा नसून कांहीं विशिष्ट प्रकारानेंच त्या वाढलेल्या असतात, आणि त्यांचीं शरीरेंही विशिष्ट तत्वांचीच बनलेलीं असतात. तेवढ्यापुरतें त्यांचें ज्ञान व सामर्थ्य मनुष्यापेक्षां अचाट असतें यांत शंका नाहीं, परंतु त्या व्यतिरिक्त इतर सर्व बाबतींत ते सर्वतोपरी लंगडे असतात. त्या बाबींची गरज पडली असतां त्यांना मनुष्य शरीराचें साह्य घ्यावें लागतें. ह्मणूनच तिसऱ्या अध्यायांत ‘ परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ’ अशी **भगवंतांनीं** व्यवस्था सांगितली. ह्मणजे एक तर, मनुष्यावर अवलंबून रहावें, किंवा मनुष्यशरीररूपी यंत्राची भासणारी गरज घ्यानासारख्या दुसऱ्या सायससाधनांनीं भरून काढावी, अशी त्यांची स्थिति आहे. ही अडचण मनुष्यास नाहीं हाच मनुष्यलोकाचा विशेष.

**‘ जीवो मृतस्य चरति स्वधाभिः ’** ह्मणून श्रुतींत ह्मटलें आहे, तें विशेषतः याच अर्थानें. कारण अगदीं जड शरीराला धरून प्रगट होणारी, परंतु जीवाच्या प्रत्यक्ष उपयोगी पडणारी, अशी शक्ति ‘ वाक् ’ हीच आहे, हें आपण पाहिलें आहे. ह्मणून या वाक्शक्तीच्या कर्मसामर्थ्याप्रमाणें चातुर्वर्ण्य विभाग पडला आहे.

ही वाक् ज्याप्रमाणें, जितक्या प्रमाणांत शरीरमात्रांत सिद्ध आहे, तितक्या प्रमाणांत ती वाक् आणि शरीर यांना धरून हा चतुर्वर्णविभागही आहे. ह्मणून इतर सर्व सृष्टिनियमांप्रमाणें तो सृष्टिसहोदर, स्वयंभू व नित्य आहे. शरीर धारण करणाऱ्या जीवमात्राच्या हक्काचा आहे. वैदिक लोकांसच लागू आहे, आणि आइसलँडमधील एस्किमोस नाहीं, असें नाहीं. पुण्यप्रताप वैदिक ऋषींनीं शद्बशास्त्राचें रहस्य ओळखून,' त्याचा आपल्या कार्याकडे नीट उपयोग केला, एवढेंच. शद्बाची ही उत्पादकता ओळखून तिच्या तत्वास अनुसरून, ज्या प्रकारानें मनुष्यास त्यांनीं ठरविलेलें जें मनुष्याचें ध्येय,-सर्वांकरितां सर्व, आणि सर्वांमिळती व्यक्ति-तें अबाधितपणानें साधतां येईल, आणि त्याकरतां व्यक्तीचा शक्य तितका जास्त उपयोग करून घेतां येईल, अशा धोरणानें, व्यक्तीच्या सुखदुःखचा व परिश्रमाचा विचार जवळजवळ सोडून देऊनच, जी समाजरचना बसविली गेली, तिचें नांव **चातुर्वर्ण्य**, असें सहजच पडलें. ह्मणून तें केवळ त्यांच्याच मालकीचें आहे, असें नांहीं. त्याच तत्वाला अनुसरून इतर कोणाही लोकांना आपली समाज रचना करतां येईल, व तिचें फळही तसेंच मिळेल. असो याप्रमाणें गुण-कर्म-विभाग आणि सृष्ट या पदांचे अर्थ स्पष्ट झालें ह्मणजे, त्यांना अनुसरून ज्यांच्यांत केवळ पशुभावच भरलेला आहे, असे या शक्तीच्या उपयोगास केवळ पारखे असे लोक सोडून देऊन, इतर अधिकारी लोकांचा विचार केला तर, त्यांचे मुख्य विभाग चारच पडतात. तें कसे, हें **श्रीअण्णासाहेब** यांच्या चरित्रांत चातुर्वर्ण्य प्रकरणांत थोडक्यांत सांगितलें आहे, त्यावरून समजून येईल. त्याचा उतारा येथें घेतल्यास जास्त विस्तार होईल ह्मणून तसें करीत नाहीं. त्यावरून पाहतां, नुसता गुण-कर्म-विभागच स्वयंभू नाहीं, तर तो चार प्रकारचाच नित्य आहे, हेंही लक्षांत येईल.

यावरही एक शंका अशी येते, कीं याप्रमाणें चातुर्वर्ण्य सर्वांच्या हक्काचें असलें, तरी, त्याचा फायदा घेण्याकरितां मनुष्याचीं शरीरें विशेष प्रकारानें कमवावीं लागतात; आणि या जगांत तर, कोणत्याही काळीं, चातुर्वर्ण्यविशिष्ठ नसलेला, परंतु पापयोनीही नाहीं, अशा प्रकारचा मनुष्यप्राण्यांचा फार मोठा वर्ग असतो. हल्लींच्या मानवजातींप्रमाणें वाक् शक्तीचा असा प्रत्यक्ष उपयोग करण्यास सामान्यतः पात्र नसलेली चतुर्वर्ण स्त्रीजात, व इतरही स्त्रीपुरुष, या वर्गांत मोडतात. तेव्हां, या वाक्शक्तीमुळें, मनुष्याच्या कर्माची सिद्धी त्याला लौकर करून घेतां येते, व त्यामुळें मोहांत पडून थोरल्या देवाकडे त्याचें लक्ष जात नाहीं,

या विधानाची व्याप्ति फारच संकुचित होते. व ' क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिः भवति कर्मजा, ' हा तर पूर्णसिद्धांत दिसतो. तेव्हां हें कसें? याचें उत्तर असें आहे कीं, आमच्या वरच्या प्रतिपादनामुळें ' क्षिप्रं हि मानुषे लोके ' हा सिद्धांत बाधित होण्याचें कांहींच कारण नाहीं. वैदिक लोक ज्याप्रमाणें शास्त्र जाणून, शास्त्राच्या तत्वास अनुसरून वाक्‌शक्तीचा इच्छेप्रमाणें उपयोग करूं शकतील, तसें जरी इतरांना करतां आलें नाहीं, तरी इतरांच्या क्रिया आणि संकल्प यांच्या संसिद्धींत वाक्‌शक्तीचा अनायासें उपयोग झालेलाच असतो. एवढेंच कीं, एकाची क्रिया जाणून झालेली असते, व त्याला या शक्तीचा उपयोग थोडासा स्वाधीनतेनें करतां येतो; व दुसऱ्याची न जाणून झालेली असते, आणि त्याला या शक्तीचा फायदा सहज घटनेनें मिळत असतो. याचा अनुभव कळून अथवा न कळून आल्यामुळें जगांतील यच्चयावत् आस्तिक समाजांत प्रार्थनेला अतिशय महत्व आलें. जे आस्तिक नसून केवळ नास्तिक आहेत, ते देखील, आपल्या संकल्पाची आणि क्रियेची जेव्हां मनांत चाळणा करतात, तेव्हां ती शद्बरूपानेंच घडते, व तिचा आघात शरीररूप यंत्रांत होऊन शद्बशक्तीचें कार्य होत असतें. कारण सामान्य सर्व जीवांत वाक् आणि मनस् हीं तत्वें व या शक्ती 'दुग्धांबुवत' संमिलित असतात व त्यांची बरीच वाढ होई-पर्यंत त्या परस्परांच्या आश्रयानेंच वाढतात व प्रगट होतात. शद्बशक्तीचें हें कार्य मध्यमेच्या व्यवहारांतच होत असतें. वैखरीनें फक्त हॉर्न लावून आवाज ऐकूं येईलसा करावा, त्याप्रमाणें, तें कार्य उघड करून दाखववावयाचें असतें, एवढेंच. ह्मणूनच मुक्या माणसांना देखील जरी तोंडांतून आवाज काढून बाह्य परिणाम दाखवितां येत नाहीं, तरी आपल्यापुरता या शक्तीचा पूर्ण फायदा मिळूं शकतो.

पूर्वी आपण पाहिलेंच आहे कीं, ' **चातुर्वर्ण्यं** ' या श्लोकांत **वर्ण, सृष्टं, गुणकर्मविभाग**, हे शद्ब महत्वाचे आहेत. गुणकर्मविभाग याचा खरा अर्थ काय असणें शक्य आहे, त्यांत कर्मशद्बाचा उपयोग कोणत्या कर्मशक्तीच्या अभिप्रायानें केला आहे, त्यामुळें चातुर्वर्ण्य हें सृष्टच कसें आहे, व तें चातुर्वर्ण्यच कां असलें पाहिजे, हें आपण पाहिलें. आतां मागें अर्धाच सोडून दिलेला वर्ण शद्बाचा इतिहास पाहूं, ह्मणजे त्यापासून आपणास काय माहिती मिळते, तें दिसून येईल. वर्ण हा शद्ब, जसा धात्वर्थाचा संबंध नसतांना जातीस लावण्यांत येतो, तसाच भाषेंतील मूलाक्षरें, ज्यांना इंग्रजींत Alphabets असें ह्मणतात, त्यांनाही लावण्यांत येतो; आणि तेथें देखील तो सरळ अर्थानें कां लावण्यांत यावा, हें सम-

जत नाहीं. त्यास तो अर्थ कसा आला, हें पाहण्याकरतां त्याच्या इतर भाईबंदांच्या जातकुळीचा तपास केला पाहिजे. या मूळशद्बांना सामान्य भाषेमध्यें अक्षरें अशी संज्ञा आहे, आणि मंत्रशास्त्रांत मातृका असें ह्मणतात. त्यांतील अक्षर हा शद्ब न क्षरति, कधीं नाश न पावणारें तें अक्षर, असा दाखविला जातो. परंतु ही मूळ व्युत्पत्ति तशी नसावी. लिहिण्याची कला जेव्हां प्रचारांत आली, तेव्हां शाईच्या किंवा दुसऱ्या कशाच्या साह्यानें लिहीत नव्हते हें उघड आहे. कशाच्या तरी अणकुचीदार टोकानें खोदून लिहिलें जात असे. अशा प्रकारचे ताडपत्री लेख हजारो उपलब्ध आहेत. **खाल्डियन** लोकांचे इष्टिकालेख देखील अशाच तऱ्हेचे आहेत. या लेखनाच्या मूळ प्रकाराला उद्देशून ' अक्षरेखन ' असें ह्मणत असत. (र ल चा अभेद प्रसिद्धच आहे. ) पुढें त्याचेंच अक्षर असें रूप बनलें. अशा तऱ्हेची आणखीही कांहीं शद्बाची उत्पत्ति लावतां येते.

शूक ह्मणजे कणीस अथवा कणसासारखें टोंकदार. अशा टोंकदार नाकाड्यानें, जमीन खणून * टाकतो तो ' शूकर. ' लिहिणें या क्रियेला लेखन हें नांवच अक्षलेखनावरून पडलें आहे. कारण लिख् ह्मणजे खणणें, कोरणें. पुढें ज्यावेळेला हा प्रकार जाऊन शाईसारख्या पदार्थांनीं लिंहू लागले, तेव्हां ' लिंप् ' या धातूचा उपयोग होऊन लिपी असा स्वतंत्र शद्ब झाला. सारांश, मूळ लिहिण्याची क्रिया ह्मणजे लेखन, आणि अक्षांच्या साह्यानें जें लेखिलें जातें, तें अक्षर; असा या शद्बाचा इतिहास आहे. × वर्ण शद्बाच्या इतिहासांत अशा तऱ्हेचें कांहींही आढळून

---

* ' क्रोडो भूदार इत्यपि ' । अमर. पवीर, कुंजर, कुलीर, वचर,नगर इत्यादि याचीं आणखीं उदाहरणें होत. ' पवी ' ह्मणजे अणकुचीदार टोंक, त्यानें भोंसकतो तो ' पवीर ' ह्मणजे भाला. कुंज ह्मणजे झाडी; ती उध्वस्त करितो तो ' कुंजर ' ह्मणजे हत्ती. कुली ह्मणचे हात. लांब हातांनीं पदार्थ कातरून टाकतो तो ' कुलीर ' ह्मणजे खेंकडा. वचसा ह्मणजे आवाजानें ( अर्थात कर्कश आवाजानें ) कान जसें कांहीं कोरतो तो ' वचर ' ह्मणजे कोंबडा. नगेषु म्हणजे डोंगरांत लेखिलेलें म्हणजे कोरून केलेलें पुर ( म्हणजे अर्थात डोंगरी किल्ला ) म्हणजे नगर. पुढें हा विशिष्ट अर्थ जाऊन पुर व नगर हे पर्याय शब्द झाले. ' नगा इव प्रासादा अस्त्यत्र ' ही कोशकारांची व्याख्या कशी ओढून ताढून आहे तें ध्यानांत येईलच.

× लिहिणें या अर्थाचा लाटीन शब्द Scriberro ( यावरून Scribe,

येत नाही. आतां, मंत्रशास्त्रांतील त्याचा सहोदर जो मातृका शद्ब, त्याचा इतिहास पाहूं. मातृका शद्ब हा मंत्रशास्त्राप्रमाणें मनस्+तृ+क अशा तीन अवयवांचा बनला आहे. मातृ=आई, आणि मात्रा=मोजण्याचें माप, या अगदीं सारख्या दिसणाऱ्या शद्बांशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. मातृशब्दाची संसिद्धि एक तर 'मा' ह्मणजे अवकाशामध्यें ह्मणजे अर्थात् गर्भाशयाच्या पोकळींत, तृ ह्म० रक्षण करते, ती अथवा 'मान् पूजायां' या धातूस 'तृच्' लागून 'न' च्या लोपानें झालेली आहे. आणि मात्रा शब्दांत मा=मीयते हा मूळ धात्वर्थ आहे. मंत्र शास्त्रांतील मातृका शद्ब मनस्+तृ+क असा झालेला आहे, हें वर सांगितलेंच आहे. शद्बसिद्धि होतांना मधला 'नस्' शब्द गळून जाऊन, त्याच्याजागीं 'अ' असा आदेश आला. आणि मातृका शब्द तयार झाला. अशा तऱ्हेचे कांहीं शब्द सिद्ध झालेले संस्कृतांत आढळतात. * पुनर्+रामा ह्मणजे पुनारामा हें त्याचेंच एक प्रचारांतलें उदाहरण आहे. वानर, चामुंड हीं याचीच उदाहरणें होत. बन+नर म्ह० जंगली माणूस यांतील न चा अ होऊन वानर शब्द झालेला आहे, व चंड+मुंड यांतील ड च्या जागीं अ येऊन, चामूमुंड व पुढें उच्चार सौकर्यार्थ चामुंड असा शब्द झाला. देवीस **चामुंडा** हें नांव पडण्याचें **दुर्गासप्तशतींत—**

**यस्मात् चंडं च मुंडं च गृहीत्वा त्वमुपागता**
**चामुंडेति ततो लोके ख्याता देवि भविष्यसि ।**

असें कारण सांगितलें आहे, त्याला धरूनच ही शब्दसिद्धि आहे.

त्याचप्रमाणें हा मातृका शब्द आहे. मनाची शक्ति, तृ म्हणजे प्राणशक्ति आणि कः म्हणजे तेज हीं तिन्ही जिच्यांत एकत्र झालीं आहेत, अशी वाक्

---

Script वगैरे इंग्रेजी शब्द बनले आहेत ) हा बहुतेक सं. 'अक्षर' व तेलगू 'रात' ( याचें तेलगू लिपींतील लेखन म्हणजे 'स्पेलींग' 'व्रात' असें आहे. 'व' लिहिण्यांत आहे उच्चारांत नाहीं. या पासूनच इंग्रेजी Write शब्द बनला श्रीअण्णा. च. खंड ३ पा. ४० ) या दोन शब्दांपासून बनला असावा. ( श्रीअण्णा च. खं. ३ पा. ३८ पहा. ) आरबी 'कुराण' शब्दाचें मूळ जें 'कुरा' म्हणजे वाचणें, तो 'कुरा' व त्याचे भाईबंद हिब्रू 'कारा' म्हणजे वाचण व 'निकारा' म्हणजे 'वाचन,' या शब्दांचाही संबंध या 'अक्षर' शब्दाशी असण्याचा संभव आहे.

* दादर, खापर वगैरे मराठी शद्बही याच वर्गांतील आहेत. दरदर ह्मणजे दादर; खरपर ह्मणजे खापर; लटपट ह्मणजे लापट.

ह्मणजे मातृका. मंत्रशब्दाची त्या शास्त्रांतील व्युत्पत्तीही याच अर्थाची आहे. मन व प्राण एकवटून केलेला उच्चार ह्मणजे मंत्र. मातृका शब्दाच्या अर्थावरून अकारादि बावन वर्णांचा उच्चार तेजयुक्त आहे, असें दिसतें **श्रीअण्णासाहेब** यांच्या चरित्रांत कोणत्याही प्रकारच्या ध्वनीस रंग असतो, ह्मणून सांगितलेलें आहे. त्याचाच थोडा जास्त विस्तार प्रस्तुत ग्रंथांत केला आहे. आकाश तत्वांतील आंदोलनसंख्या कर्णेंद्रियास ज्याप्रमाणें विशिष्ट स्वररूपानें ज्ञात होते, त्याप्रमाणेंच दृष्टी सूक्ष्म झाली असतां, विशिष्ट रंगाच्या तेजाच्या रूपानें नेत्रेंद्रियास भासते, असा याचा स्पष्ट अर्थ आहे. ह्मणून मंत्रशास्त्रास धरून, सिद्ध झालेल्या शरीरानें उत्पन्न केलली अकारादि जीं मूळ अक्षरें त्यांचें नांव मातृका. स्थूल उच्चारामध्यें देखील वेगवेगळ्या शरीरयंत्रामधून अकारादि मूलाक्षरें जरी तींच निघालीं, तरी त्यांच्या भिन्नभिन्न आंदोलनाप्रमाणें तीं आपल्या कानास वेगळ्या वेगळ्या रीतीनें प्रतीत होतात. व कित्येक प्रसंगीं, त्यांच्यावरून, उच्चारणाऱ्याच्या मनःस्थितीचाही बोध होतो. जशी उच्चारण्याच्या आघात वगैरे पद्धतीवरून कर्णेंद्रियास वेगळ्या वेगळ्या प्रकारची प्रतीति येते, तशीच अतींद्रिय शास्त्रानें दृष्टि सूक्ष्म केलेल्या लोकांना त्या शब्दांच्या वेगळ्या वेगळ्या रंगाची प्रतीति येते. म्हणूनच छांदस् भाषेत स्वराचें अतिशय महत्व आहे. *

---

* **श्री अण्णासाहेब** यांचा एक उतारा आहे. (च. खं. २ पा. २६३) The **Principles** of Grammer and Etymology of the Vaidik or Sanskrit words have been deeply rooted in the Subject matter of the Transcendental Science. तो किती सार्थ आहे तें यावरून दिसून येईल. ते पुढें म्हणतात कीं **Vaidik Language** and the **Vaidik People** being naturally co-eval, must be considered as being both of immense antiquity, Panini's Grammer as well as the Grammers of the **Rishis** who had preceded him could not, therefore, properly and legitimately discuss the principles and Etymology of the Vaidik or Sanskrit language.

पाणिनीविषयींच जेथ असें ह्मणावें लागतें तेथें पतंजली वगैरेबद्दल बोलावयासच नको! 'तुल्यास्य प्रयत्नः सवर्णः।' 'म्लेच्छ अव्यक्त शद्बे'। व विशेषतः 'अदर्शनं लोपः'। हीं सूत्रें आमच्या विषयाच्या दृष्टीनें फारच

संस्कृतांत क सारखें एकादें एकच अक्षर घेतलें, तर त्याचे वीस पंच-वीस अर्थ सांपडतात. व त्यांतील कित्येक तर कांहीं वेळां, प्रकाश व अंधार यांच्या इतके परस्पर विरुद्ध असतात. त्याचें कारण हेंच. स्वरास धरून विशिष्ट पद्धतीनें तो उच्चार केला ह्मणजे तसा अर्थ होतो. याचें अगदीं थोडक्यांत प्रत्यंतर प्रचलित मराठींतही मिळतें. ऊं, हूं, हं, छे, वा, इत्यादि शद्ब वेगवेगळ्या झटक्यानें ह्मटले ह्मणजे त्याचे वेगवेगळे अर्थ होतात, याचा प्रत्येकास अनुभव आहेच. तोच हं शद्ब खूप जडपणानें काढला ह्मणजे, काढणाऱ्याच्या मनाची खिन्नता व असंमति दाखवितो; आणि जरा चपळतेनें व उच्चाराचा शेवट लांबवून काढला ह्मणजे आश्चर्यद्योतक होतो. मंत्रशास्त्रामध्यें तोच उकार एकदां **विष्णुरूप** सांगितला जातो, व त्यालाच एकदां **महेश्वर** ह्मणण्यांत येतें. मंत्राचें बीज व शक्ति इत्या-दिकांच्या बाबतींत असेंच होतें. त्याच देवतेच्या एका मंत्रांत ऐं हें बीज सांगितलें जातें, तर एकांत तें शक्ति ह्मणविलें जातें. त्याचें रहस्य माहीत नसल्यामुळें आज-काल एका-क्षरी कोष व मंत्राशास्त्र हें सर्वच कांहीं तरी खूळ आहे, असें मानण्यांत येतें. परंतु या ग्रंथांतील त्रोटक विवेचनावरून व **श्रीअण्णासाहेब** पटवर्धन यांच्या चरित्रावरून वेदिक व संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास किती खोलपणानें किती प्रकारच्या अनेक दृष्टींनीं, किती गोष्टी लक्षांत ठेवून केला पाहिजे, आणि त्या अभ्यासाचें क्षेत्रही किती अफाट, विविध आणि मनोरम आहे,

---

महत्वाचीं आहेत. यांतील '**वर्ण**' व '**अदर्शन**' हे शद्ब साभिप्राय आहेत. '**वर्ण**' शद्बाचा मूलाक्षर ( Alphabet ) या अर्थानें उपयोग पाणिनीपूर्वी कोणी केलेला आमच्या आढळण्यांत आला नाहीं. पाणिनीनें तो किति यथार्थतेनें योजिला आहे ते आमच्या विवेचनावरून समजून येईल. त्याला अनुसरूनच त्यानें '**अदर्शनं लोपः**'। असें ह्मटलें आहे. कारण ती वस्तुस्थिति आहे. परंतु ही खुबी लक्ष्यांत न आल्यामुळें पतंजलीला ' नित्येषु शब्देषु सतोऽदर्शनस्य संज्ञा क्रीयते। न संज्ञया अदर्शनं भाव्यते ' असें ह्मणण्यावर व ' लोप ' म्हणजे प्रसक्तादर्शन या शंकेचें निराळ्याच रीतीनें समाधान करण्यावरच काम भागवून घ्यावें लागले आहे. शाखाभिन्नत्वाविषयींही तो असाच गोंधळला आहे. हें आपण प्रस्तुत ग्रंथांत पाहिलेंच आहे. ( पान. ६७ ) यावरून वैदिक संस्कृतीच्या चालत्या काळापासून पतंजली किती दूर होता हें दिसून येईल.

हें लक्षांत येईल.

**श्रीअण्णासाहेब** यांच्या चरित्रांत सांगितलेंच आहे कीं उच्चारल्या जाणाऱ्या शद्बाचें सामर्थ्य मापण्याचें त्यांचे नानाप्रकारचे रंग हें साधन आहे. अतींद्रिय शास्त्राच्या भरभराटीच्या काळांत या ताळ्याचा उपयोग करून घेतला जात असे. ह्मणून, वर्ण या रंगबोधक शद्बास मूलाक्षर असा अर्थ आला, आणि त्याचवरून पुढें, वर सांगितल्याप्रमाणें वाक्शास्त्राप्रमाणें होणाऱ्या मनुष्यजातीच्या चार मुख्य विभागास चतुर्वर्ण असें ह्मटलें गेलें. ह्मणजे चार प्रकारचे शब्द उच्चारणारे, अथवा चार रंगाची वाणी बोलणारे ते चतुर्वर्ण, असा त्याचा मूळचा अर्थ आहे, व एकदा तो शब्द मनुष्याच्या समूहास लावतां येऊं लागल्यावर, जाति असा त्याचा सहजच अर्थ झाला. तरी पण त्यांतही एक लक्षांत ठेवण्याजोगती गोष्ट आहे. आज आह्मी ज्यांना जाति ह्मणतों त्या अर्थानें त्याचा उपयोग मात्र संस्कृतांत कोठेंही केलेला नाहीं. ह्मणजे तो शद्ब केवळ जातिवाचक नसून, कोणत्याही कारणानें कां होईना, चार वर्णांचाच वाचक आहे, एवढी समज उपलब्ध असलेल्या सव संस्कृत वाङ्मयांत जणुं कांहीं मुकाट्यानें शिल्लक राहून गेली आहे.

याप्रमाणें वर्ण शब्दाचा इतिहास पाहिला असतांही त्यावरूनही चातुर्वर्ण्याची रचना ध्वनीशास्त्रास धरून केलेली आहे, असें दिसतें; आणि ह्मणून या परिशिष्टांत सांगितल्याप्रमाणें, कर्मशब्दाचा अर्थ **कर्मसामर्थ्य** असा घेतला पाहिजे, व तें कर्मसामर्थ्यही मनुष्यास वाणीरूप जें कर्म करतां येतें, त्या ध्वनीशास्त्रास धरून घेतला पाहिजे, हें लक्षांत येईल. याप्रमाणें या विषयाची थोडक्यांत मांडणी करून **श्रीअण्णा०** यांच्या चरित्रांत जी गोष्ट नुसती ध्वनित केली होती, आणि या ग्रंथांत जिचें नुसतें दिग्दर्शन केलें आहे, तिची या परिशिष्टांत थोडी सविस्तर मांडणी करून दाखविली आहे. तिच्यावरून वर्ण हे चारच कां असले पाहिजेत, चातुर्वर्ण्य हें मनुष्यकृत आणि केवळ मानवी व्यवहाराच्या सोईकरतां रचलेलें नसून ईशसृष्ट आहे, व इतर सर्व सृष्टिनियमांप्रमाणें स्वयंभू आणि नित्य असून, त्याला धरून अतींद्रिय शास्त्रांच्या तत्वावर आपल्या समाजाची जी विशिष्ट घडी बसविली, तें पूर्वीचें चें चातुर्वर्ण्य, व तें नष्ट होऊं नये ह्मणून त्याच्या रक्षणार्थ जे संस्कार व विधिनिषेध त्याच्या मागें लावून दिले, त्याचें नांव वर्णाश्रमधर्म, या साऱ्या गोष्टी लक्षांत येतील. जे त्याचे अभिमानी ह्मणवीत असतील त्यांनीं त्याच्यासंबंधीं सर्व विचार वरील सर्व प्रकारच्या गोष्टींवर

विश्वास ठेऊन, त्यांच्या अनुरोधानें केला पाहिजे. वरील सर्व गोष्टींवर ज्यांचा विश्वास नसेल, ते स्वतःस कितीही वैदिकधर्मी ह्मणवीत असले, तरी वेदबाह्य असल्यामुळें, त्यांना वर्णाश्रमासंबंधीं कोणताही फेरफार सुचविण्याचा काडीइतकाही अधिकार नाहीं. त्यांनीं स्वतःस उघड उघड वेदबाह्य ह्मणवून घेऊन, एका धर्माचा मनुष्य दुसऱ्या धर्मांतील संस्थांवर ज्याप्रमाणें बेधडकपणें तुटून पडतो, त्याप्रमाणें खुशाल करावें, हें त्यांना उचित आहे. परंतु इतका इमानदारपणा आजकाल फार क्वचित् सांपडतो. तेव्हां, खरोखर वर्णाश्रमाभिमानी ह्मणविणाऱ्या लोकांनीं या नवीन शाक्यसिंहांना भाळून न जातां, आपलीं डोकीं ठिकाणावर ठेवावी, व स्वतःचें कर्तव्य करण्यांतही कुचराई करूं नये, एवढाच या लेखनाचा हेतु आहे.



# परिशिष्ट. २



ग्रंथ लिहून झाल्यावर प्रकाशनाच्या विवंचनेंत असतां मॉडर्न रीव्ह्यूचें एका अंकांत त्यास पोषक असा मजकूर आढळला. तो खाली•उतरून घेतला आहे. त्यावरून श्रीअण्णासाहेब यांचें चरित्रांत ' वर्ण व ध्वनि हे एकमेकांचे ताळे आहेत ' म्हणून म्हटलें आहे तें किती यथार्थ आहे तें ध्यानांत येईल.

## The Music of the Atoms

### *A New Application of Sir C. V. Raman's Scientific Discovery.*

Avery interesting application of a scientific discovery of Sir C. V. Raman was recently demonstrated in America. On April 17 last Dr. Donald H. Andrews of Johns Hopkins University played the hidden music of alcohol and other chemical substances in a Science Service radio talk over the nation wide network of the Columbia Broadcasting System, at Washington.

The music of the spheres, which up till now existed entirely in the poet's imagination, said Dr. Andrews, is being approached in a tangible way by recent developments in science and indeed was actually transposed and played by him as chords and runs on the piano in the course of his talk.

Sir Chandrasekhara V. Raman of Calcutta, India, has recently given physicists a new way of listening to, or really seeing, the music of the atoms.

The Raman spectrum, said Dr. Andrews, shows us that a molecule, such as one unit of water, is really a little musical instrument, much like a harp, playing its own characteristic tune.

" Of course you do not hear it if you hold a glass of water up ear because the tune is pitched many millions of times higher than the highest note on a piano or violin, " Dr. Andrews said. " In fact, *it is really light and not sound that is given off.* By photographing this light, however, we can detect the notes that are present, and can transpose them to a lower frequency just as you shift a chord from the top to the bottom of the piano. In this way the atomic music can be brought down to a range where we can hear it, and play it on any familiar instrument. "

The chords of water, grain alcohol, wood alcohol, chloroform, benzene, gasoline, sulphuric acid were played in turn by Dr. Andrews.

Alcohol had rather a sweet-sounding chord, but chloroform, like wood alcohol, was harsh. Gasoline gave a very modernistic chord extending over the entire range of the keyboard. Benzene was rather melancholy. Sulphuric acid was also very modern.

The spectra or chords of several hundred different chemical compounds have been photographed and analysed.

These experiments also provide much new material for the musicians if they care to use it. Dr. Andrews closed his talk by playing a piece composed by Abram Moses, formerly of the Peabody Institute of Music in Baltimore. The composition was based on the chords of water, grain alcohol and wood alcohol. ( इटालीक्स आमचे आहेत. )

Modern Review. August 1931, *page 218.*



# परिशिष्ट. ३



या ग्रंथांतील ६० व्या पानावर व्यक्त सृष्टीचा क्रम योगशास्त्राच्या दृष्टीनें कसा असला पाहिजे तें सांगितलें आहे. मूळ एक शक्तिकेंद्र अथवा बिंदु. त्याचें व्यक्त स्वरूप कला, नाद अथवा ज्योति हे एकाच कलेच्या प्रतितीचे दोन भिन्न पर्याय व अशा अनेक बिंदु संघातांचें विश्व असाच तो असू शकेल. ह्मणून आह्मी बिंदु, नाद, कला, ज्योति असें ह्मटलें आहे. बिंदु गतिमान झाला म्हणजे रेषा उत्पन्न होते. गति जेवढी आहे तेवढी वर्तुळाकार असल्यानें गतिमान् बिंदु म्हणजे कला. म्हणजेच वर्तुळ अर्थात अर्वाचीन शास्त्रांत ज्यांना विद्युत्कण ( positive and negative charges ) म्हणतात ते. चालणाऱ्या एकाच चाकाचे पाहणाऱ्याच्या सापेक्षतेनें जसे डावे उजवे असे दोन पर्याय होतात, तसे प्रतीति भेदानें नाद व ज्योति हे एकाचेच दोन प्रकार, व अशा कलांचा अथवा विद्युत्कणांचा संघात म्हणजे सृष्टी असा आमच्या प्रतिपादनाच्या दृष्टीनें नकाशा तयार होतो. म्हणूनच, बिंदु कला नाद ज्योति असें न म्हणतां ‘ बिंदुर्नादकला-ज्योतिः ’ असें म्हटलें आहे. मुद्रणदोषानें ६० पानांवर त्यांतील विसर्ग गळून गेले आहेत. असो. तंत्र वगैरे शास्त्रांनीं आपआपल्या दृष्टींनीं याच संज्ञा निरनिराळ्या क्रमांनीं उपयोगांत आणिल्या आहेत. योगशास्त्रांत शरीराचा अत्यंत संबंध असल्यानें व योगशास्त्र आणि तंत्रशास्त्र यांचा अत्यंत अभेद असल्यानें आम्ही त्याच संज्ञा घेऊन हा क्रम दाखविला आहे, इतकेंच.

‘ ध्वनि आणि प्रकाश या उत्पादक शक्ति असून त्यांचें परिस्परांत रूपांतर करितां येतें ’ अथवा श्रीअण्णासाहेब यांचे चरित्रांत ह्मटल्याप्रमाणें ‘ There exists *homogenity* and *correspondence* between the external objects and *internal* states of consciousness etc. Appearing *in the forms* of notions, sensations, passions etc, On the one hand’ & the sound.........on the other hand. ( च. खं. ३ पान २३. ) आणि ‘ all kinds of powers being various modes or degrees of motion are found to be interchangeable. ’ अथवा ‘ Thus the whole universe was a sort of congelation of sound. Thus the



ज्ञानांत या सर्वांचा असंकर असणें, त्यांची वाटेल तशी ह्मणजे पृथक्रूपें प्रतीति घेतां येणें व ह्मणून त्यांची वाटेल तशी धडामोड करणें,
करतां येणें यालाच नांव मुक्ति, जीवन्मुक्ति वगैरे. ती अर्थात् निष्क्रिय स्थिति नव्हे, तर 'निजानिर्धार स्वानंदविलास'
आहे येथें 'जाणते' वगैरे पदवींस अवसर नाहीं.
केवळ
विवर्त
( शिव + शक्ति ) महामुक्ति. ( 'सर्वविषयं सर्वथा अविषयम् अक्रमम्' अशीज्ञानघनता )
विवर्तबिंदु [ हा नादकलाज्योतिरूप आहे.
Microcosm ]
बिंदुसंघात [ व्यक्तसृष्टि ]
Macracosm
विवर्तबिंदुची केवळ नादरूप प्रतिति=नाम. येथें क्रम उत्पन्न झाला.
केवळ ज्योतिरूप प्रतिति=रूप. येथें क्रम उत्पन्न झाला.
प्रणव
मातृका
चारीवाणी: पद
दिक् व काल
मनस्तत्व अथवा दिक् व काल यांच्या सापेक्षतेनें कलांच्या प्रतितिचे भिन्न भिन्न पर्याय
पंचतन्मात्रें व त्यांची पुढील प्रजा; अर्थ
ऋक् ( पद आणि अर्थ यांचा असंकरित ) संबंध राखणारी वाणी
वाक् ( पद व अर्थ यांचा संकरीत संबंध )
सूक्ष्म सृष्टी
स्थूल सृष्टी
वेद, मंत्र, राग वगैरे
सर्वभूतरुत
हिरण्य गर्भ
विराट्
मनुष्योत्तर अनेक कोटी
[ पद व अर्थ यांच्या संकर व असंकरांच्या प्रमाणाप्रमाणें. ]
मनुष्याखालील अनेक जीव कोटी .
पद व अर्थ संबंध अजिबात तुटलेला
नरदेह
[ पद आणि अर्थ यांची ह्मणजे त्यांच्या सर्व प्रजांची समप्रमाणांत सांगड हीच याची अपूर्वता; विवर्तापासून उत्पन्न झालेले भिन्न भिन्न प्रवाह येथें समप्रमाणांत एकवटून अभिन्न होऊं शकतात; अर्थात प्रकृतिस्थ शरीर असेल तर; याचेच नांव 'देहे तें देवे' अथवा God created man after his own image ! ]
ज्ञानांत सर्वांचा संकर असणें,
पृथक् प्रतीति नसणें, अर्थात् त्यांची धडामोड न करतां येणें, असेल
तर ध्यास लागणें ह्मणून षड्विकारमय असणें याचें नांव बद्धता.

gifted individuals of the Vaidik race early recognized that sound was itself an independant creative power.'(च. खं. ३ पान ८.) हे आमच्या प्रतिपादनांतील मुख्य विषय आहेत व त्याला धरूनच परिशिष्ट १ ' यांत जें देहें तें देवें ' ही मराठी अथवा ' God created man after his own image ' ही इंग्रेजी, या म्हणींत अतिशय सत्य आहे असें म्हटलें आहे. तें स्पष्टपणें समजण्यापुरता केवळ तेवढ्यासच धरून आकृति व नकाशा देत आहों. त्यावरून स्पष्ट कल्पना येईल.




परापर सृष्टी

**आकृतीचा खुलासाः—** केवळ ज्ञानघनता ह्मणजे कैवल्य. मर्यादित ज्ञान ह्मणजे विवर्तबिंदु. बिंदु गतिमानच असतो. ( ह्मणून ' सर्वे गत्यर्थधातवः ज्ञानवाचकाः ) गति वर्तुळाकारच असते. गतिमान बिंदूच्या ह्मणजे कलांच्या अनंत वर्तुळांचे अस्तित्व ह्मणजे परापर सृष्टी. या अचिंत्य, अखंड गतीच्या अनित्यतेंत केंद्रबिंदूची जी नित्य स्थिर भासमानता तीच ' **माया.** ' गतीच्या आंदोलनांची अथवा कलांची जाणीव जाणत्यास लहान मोठ्या अंशात्मक भागांत दाखविल्या-प्रमाणें भिन्न प्रकारांनीं होऊं शकेल. हेच आमचे पंचविषय अथवा जगाचें भासमान स्वरूप.

—※—

# या ग्रंथांत उल्लेखिलेल्या ग्रंथांची सूची.



—:—

# या ग्रंथांत उल्लेखिलेल्या व्यक्तींची सूची.



समाप्त.

वैदिकसंस्कृतिमालेचें दुसरें पुष्प

# वैदिक संस्कृतीची पुनर्घटना



पृ० २६० ] ले. अप्रबुद्ध [ किं. २ रु.

आपण कोणत्याही मताचे असा, हा ग्रंथ वाचल्याखेरीज आपला

वैदिक संस्कृतीचा अभ्यास पूर्ण होणार नाहीं.

**समर्थसेवक श्री० शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात :**

" कांहींशा प्रतिकूल मनोवृत्तींत ग्रंथ वाचण्यास सुरवात केली पण कळविण्यास आनंद वाटतो कीं वाचनाचा शेवट अनुकूल मनोवृत्तींत झाला . . . . सर्व हिंदु समाजाचे हल्लीं महात्माजींनीं घुसळण सुरू केलें आहे. तेव्हां अशा सामाजिक व धार्मिक खळबळीच्या काळीं अशा ग्रंथाची आवश्यकताच होती. . . . . एकंदर ग्रंथ विचाराला चेतना देणारा आहे . . . . सर्वथैव आदरणीय आहे."

मिळण्याचें ठिकाण :—

वि. के. पाळेकर, वलीभाई चाळ,

वॉकर रोड, नागपूर